श्रीः

जगद्गुरुशंकराचार्यप्रणिता

# शतश्लोकी.

( वेदान्तकेसरी )

टीका, अन्वय, अर्थ व विवरण

यांसह.

हा ग्रंथ

विष्णु वामन बापट

व

दामोदर विष्णु गद्रे वैद्य

यांनीं तयार केला

तो

मुंबईत 'शारदाक्रीडन' छा० छापून प्रसिद्ध केला.

सन १९०२.

क़िंमत १ रुपया.

# प्रस्तावना.

श्रीमज्जगद्गुरु परमपूज्य शंकराचार्यकृत शतश्लोकीचें सान्वयार्थ मराठी विवरण मी लिहावें अशी माझी योग्यता नसल्यामुळें माझे मित्र रा. रा. दामोदर विष्णु गद्रे वैद्य यांची व माझी कांहीं विलक्षण योगानें ओळख होऊन परस्पर स्नेह जडेपर्यंत हा ग्रंथ मी करीन असें माझ्या स्वप्नींही नव्हतें. पण सर्वच मानवि कृत्यांना ईश्वरप्रेरणेची अवश्यकता असल्यामुळें सर्वसाक्षी ईश्वरानें वरील गद्रे वैद्यांना निमित्त करून त्यांच्या द्वारा मला प्रेरणा केली. ह्या सद्गृहस्थांनीं मला प्रस्तुत कामांत सर्वप्रकारें सहाय करण्याचें अभिवचन दिल्यामुळेंच माझ्या हातून आज हें कृत्य कसेंबसें पार पडलें आहे.

सर्व लौकिकवैदिक क्रिया दृष्टफला व अदृष्टफला अशा दोन प्रकारच्या आहेत. ज्यांचें फल तत्क्षणींच किंवा ह्या जन्मीं मिळतें त्या दृष्टफला व ज्यांचें फल उशीरानें किंवा परलोकीं मिळतें त्या अदृष्टफला होत. भोजनाचें तृप्ति हें दृष्ट फल व अश्वमेध यज्ञाचें स्वर्ग हें अदृष्ट फल होय. वेदानें अशा दोन्ही प्रकारच्या क्रिया सांगितल्या आहेत. वेदान्तप्रतिपादित उपासनादि कर्मे दृष्टफलक आहेत. पण त्यांचें अनुष्ठान पूर्णपणें झालें पाहिजे. पोटभर अन्न न मिळाल्यास जशी त्या भोजनापासून तृप्ति होत नाहीं, त्याचप्रमाणें उपासना पूर्ण न घडल्यास तिचें फळही पूर्ण मिळत नाहीं. वेदान्तशास्त्र प्रथम उपासनाप्रधान व नंतर ज्ञानप्रधान आहे. उपासनेनें चित्तदोष नष्ट होतात व त्यामुळें तें चित्त अति शांत (निर्वृत्तिक) होतें. आणि ह्या प्रमाणें चित्त शांत झालें असतां अंतःकरणांत ज्ञानाचा उदय होतो. ह्या० अर्थात् वेदान्तशास्त्राचें फल दृष्ट आहे. उपासना करितां करितां उपासकाचें चित्त शांत झालें असतां तो शमदमादि ज्ञानाच्या अंतरंग साधनांनीं संपन्न होतो; व क्रमाक्रमानें शमादि गुण हा त्याचा स्वभावच होऊन जातो. त्यामुळें त्याला ज्ञानप्राप्ति होते व ज्ञानामुळें

शमादिकांची उत्तरोत्तर अधिकच वृद्धि होते; आणि अशा योग्यतेचा उपासक जगद्वंद्य होतो, हें सर्वप्रसिद्ध आहे. प्रारब्धकर्मक्षयापर्यंत जरि हा व्यवहार करितो तरि ज्ञानांत मग्न होऊन गेल्यामुळें त्याला त्यापासून सुखदुःख होत नाहीं; व तो या व्यवहारांत राहूनच परमसुखानुभव घेतो, इत्यादि गोष्टी बहुतेकांना ऐकून ठाऊक असतात. पण त्यांचा अनुभव मात्र किती धन्य पुरुषांना येत असेल तें ईश्वराला माहित. कारण आम्ही वेदान्ताच्या फलाचें विस्तृत वर्णन जितक्या गोड शब्दांनीं करितों, त्याच्या एकलक्षांश प्रमाणानेंही त्याच्या उपायांचें अनुष्ठान करीत नाहीं. वेदान्तशास्त्रावर प्रचंड ग्रंथ लिहिणें किंवा तद्विषयक व्याख्यानें देणें किंवा पृष्ठसंख्येवर ज्ञानप्रमाण ठरविणें हें जितकें सोपें आहे, तितकेंच जर वेदान्तफल किंवा निदान त्याचा अंश तरि प्राप्त होणें सोपें असतें तर आजकाल ( म० ह्या विद्याकल्पांत ) किती तरि पुरुष कृतकृत्य झाले असते. पण तसें झाल्याचें कोठेंही दिसत नाहीं. याला काय कारण असावें? असा जर एक क्षण विचार केला तर असें वाटतें किं केवळ शब्दमय वेदान्त जरि आजकाल सर्वत्र पसरलेला आहे, तरि तो योग्य रीतीनें अनुष्ठानारूढ झालेला नाहीं. औषधाला जसें पथ्य तसेंच वेदान्तज्ञानाला तदुपायानुष्ठान परम साधक आहे. शिवाय वेदान्तवाक्यजन्य अपरोक्षज्ञान म्हणजे वृत्तिज्ञान (वैषयिक ज्ञान) नव्हे तर तें स्वरूपज्ञान आहे. वैषयिक ज्ञान सेंद्रिय व स्वरूपज्ञान अतींद्रिय असतें. पण हा प्रचंड भेद वेदान्ताध्ययन परंपराप्राप्त असल्या वांचून समजत नाहीं. आणि ह्यामुळेंच योग्य गुरुपरंपरेनें अध्ययन न करणारे अनेक विद्वान् ' अहो ज्ञानाला वर्णाश्रमादि नियम कशाला पाहिजेत. ज्ञान हें हवें त्यानें प्राप्त करून घ्यावें ' इत्यादि भ्रामक विधानें करितात. त्यामुळें अध्ययननियमांचा लोप, परंपराविच्छेद, अयोग्य अध्ययन, अर्थविपर्यय इत्यादि अनर्थ आजकाल सर्वत्र घडून येत आहेत. अनेक दुष्ट संस्कारांमुळें आधुनिक विद्वान्, पूर्वाचार्यांची अवज्ञा करून स्वमतानुकूल शास्त्राचें ग्रहण व स्वमतप्रतिकूल शास्त्राचा अव्हेर करून

मनसोक्त शब्दार्थ करितात. उदाहरणार्थ—श्रीमत् वेदान्तभाष्यकारांनीं 'आचारहीनं न पुनन्ति वेदाः' इत्यादि अनेक श्रुतिस्मृत्युक्त वचनांना अनुलक्षून 'यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाचरणीयं नाचरणीयं' इत्यादि अनेक प्रकारें मोठ्या आदरानें सांगितलें आहे. पण तें आमच्या यथेच्छ वर्तनाला बाधक असल्यामुळें आम्ही अप्रमाण मानतों. म्ह० अप्रत्यक्षपणें आम्हीं त्यांचा अपमान करितों. तसेंच प्रसंगविशेषीं परमार्थ दृष्टीनें 'मोक्षाला वर्णाश्रमादिकांची अपेक्षा नाहीं. कोणत्याही जातीच्या, वर्णाच्या व देशांतील योग्य अधिकाऱ्याला त्याची प्राप्ति करून घेतां येते' असें जें त्यांनीं म्हटलें आहे तें मात्र आम्हांला प्रमाण वाटतें; पण त्याच्याच उलट उत्तर मीमांसेंत शूद्राला वेदाध्ययनाचा अधिकार नाहीं असें जें सप्रमाण सिद्ध केलें आहे तें पाहून आम्ही परप्रकाशी लोक त्यांना 'ब्राह्मणपक्षपाती' म्हणतों. पण हें बरें नव्हे. कारण वेदान्तवाक्यजन्यज्ञानसाक्षात्कार होईपर्यंत ज्ञान शब्दाचा खरा अर्थ आह्मांला समजणें शक्य नाहीं. ह्मणून जर तो समजून घेणें असेल तर तो ज्यांना पूर्ण अवगत होता अशा आत्मानुभवी श्रेष्ठ आचार्यांचाच आश्रय केला पाहिजे. तसे योग्य आचार्य दुर्मिळ असल्यास पूर्वाचार्यप्रतिपादित अनुभवरूप शास्त्रें अक्षरशः प्रमाण मानिलीं पाहिजेत. आणि तसें जर न केलें तर ज्ञानप्रतिपत्ति तर दूरच राहिली पण नुस्ता तिचा खरा खरा अर्थही समजणें अत्यंत दुर्घट होईल. असें आहे ह्मणूनच 'मी वेदान्त पुष्कळ वाचला व ऐकला पण माझें समाधान होत नाहीं' असें ह्मणणारें आजकाल बरेच लोक आढळतात. अगोदर आह्मां प्राकृत विषयी जनांचा वेदान्त, मत्स्यादि जलचरांच्या स्थलवर्णनाप्रमाणेंच आहे. शिवाय आमच्या योग्यतेचीं जीं कांहीं संध्यावंदन, पूजन, अध्ययन, श्रवण, स्मरण इत्यादि साधनें, पूर्व त्रिकालज्ञ आचार्यांनीं सांगून ठेविलीं आहेत तींही आह्मी 'ऊः त्यांत काय आहे' असें ह्मणून सोडणार; आहारविहाराचाही विशेषसा नियम

वाळगणार नाहीं; आणि गृहस्थाश्रमाला अशक्य अशा योगाचें मात्र अवलंबन करणार, मग आमचें समाधान होणार कसें ? सारांश वेदान्तज्ञान जरि दृष्टफलक आहे ( ह्म० त्याचें मुक्ति हें फल जरि ह्या देहांतच मिळण्यासारखें आहे ) तरि तें आह्मांला स्वर्गादिकेंच परोक्ष झालें आहे; व असें आहे त्याअर्थी वेदान्तग्रंथाचें मराठी भाषांतर केल्यानें तरि लोकांना कांहीं विशेषसा लाभ होणार आहे असें नाही. पण प्रस्तुतकालीं हा एक निर्वाहाचा धंदा होऊन राहिला आहे; व त्या उद्देशानेंच मी तरि हें मला योग्य नसलेलें काम आरंभिलें आहे. कारण पूर्वीच्या आमच्या ग्रंथकारांचें ज्ञान किती असे याचा विचार केला कीं, माझ्या सारख्याचे तर डोळे फिरतात. वेदान्तासारख्या अनुभव्यगम्य विषयांवर लिहिणारे तर बहुतेक सर्वही यतिश्रेष्ठ असल्यामुळें त्यांच्यापुढें उभें रहाण्याचीही आपली योग्यता नाहीं असें खास वाटतें. पण कालमानाप्रमाणें आज उदरभरण हें आमचें मुख्य कर्तव्य झाल्यामुळें स्वतःची योग्यायोग्यता न पहातां थोड्याशा द्रव्य लोभानें पंडित काय ह्मणतील. इकडे लक्ष्य न देतां मुकाट्यानें. खालीं मान घालून वेळेनुसार ग्रंथकारही व्हावें लागतें.

ह्या शतश्लोकीच्या भाषांतरांत अनेक दोष राहिले आहेत. विशेषतः पहिल्या २४ पानापर्यंत तर माझें शरीर त्यावेळीं स्वस्थ नसल्यामुळें बऱ्याच चुका मला मागून आढळल्या व त्या मी शुद्धिपत्रांत नमूद केल्या आहेत. त्याप्रमाणें पुस्तक वाचण्यापूर्वी शुद्ध करून वाचल्यास विशेष अडचण पडणार नाहीं. काही पारिभाषिक शब्दांची सार्थ यादीही पुढें जोडिली आहे. हा माझा प्रयत्न वेदान्तविषयपारंगतांकरितां किंवा तत्पराङ्मुखांकरितां किंवा संस्कृतज्ञ विद्वानांकरितां नसून वेदान्तरहस्य समजून घेण्याची दृढ

१ प्रस्तुत संज्ञेला मी अयोग्य आहे अशी माझी दृढ समजूत असल्यामुळेंच हा शब्द लिहितांना भीतीनें माझ्या अंगावर कांटा उभा राहिला.

२ येथें फक्त अक्षरांच्या व शब्दांच्या चुका मात्र घेतल्या आहेत. कानामात्रा वगैरे सरकेलल्या चुका घेतल्या नाहींत.

इच्छा करणाऱ्या, श्रद्धालु व केवल मराठी वाचकांकरितां आहे. म्हणजे ह्या माझ्या कृतीचा झालाच तर त्यांना कांहीं उपयोग होईल. असें आहे तरि सुज्ञ व तज्ज्ञ विद्वानांनीं मजवर उपकार करून माझ्या चुका मला दाखविल्यास मी त्या मोठ्या प्रेमळ व शुद्ध अंतःकरणानें ग्रहण करीन. सारांश ग्रंथकार असें लोकांनीं मला म्हणावें ह्मणून मी या कठिण कृत्यांत प्रवृत्त झालों नसून मला जें समजलें आहे किंवा मी दुसऱ्यांना जें समजवीत आहें त्यांत चुका किती आहेत हेंही मला समजावें व अन्य कोणाला नाहीं तरि निदान मला यापासून लाभ व्हावा ह्मणून मी हें कृत्य आरंभिलें आहे.

प्रथमतः शतश्लोकी समजून घेण्याची रा. वैद्यांनीं आपली इच्छा मला दर्शविली; व त्याप्रमाणें तो उत्तम व पूज्य ग्रंथ आम्ही वाचीत असतां तो मराठींत लिहून काढावा व ईश्वरकृपेनें संपूर्ण झाल्यास छापवून प्रसिद्ध करावा असें ठरलें. त्याप्रमाणें सुमारें ९० श्लोक लिहिले व पुढील ग्रंथ माझ्या हातून पूर्ण होईल असें वाटूं लागतांच तो छापून काढण्याच्या विचारास आम्ही लागलों. पण द्रव्यसामग्री आह्मां उभयतांपाशींही नसल्यामुळें दरिद्र्याच्या मनोरथाप्रमाणेंच ह्या आमच्या संकल्पाची वाट होणार होती. पण रा. रा. मोरेश्वर रामचंद्र काळे बि. ए. यांनीं हा ग्रंथ आपल्या छापखान्यांत छापवून देण्याचें पतकरून एक प्रकारें द्रव्यसहाय केलें व त्यामुळें आह्मां उभयतांनाही आजन्म ऋणी करून ठेविलें आहे. त्यांनीं आगाऊ छपाईचे पैसे न मागतां व पुढेंही आम्ही पुस्तकें विकून सोयीनें देऊं तसे घेण्याचें आह्मांला वचन दिल्यामुळें, ह्या ग्रंथप्रसिद्धीचें सर्व श्रेय त्यांना आहे.

ह्या ग्रंथांत श्लोक, आनंदगिरींच्या नांवानें प्रसिद्ध असलेली टीका*, अन्वय, शब्दशः अर्थ व स्पष्टीकरणाकरितां विवरण अशी व्यवस्था केली आहे. रा. गद्रे हे चांगले कवीही आहेत. त्यामुळें त्यांनीं समश्लोकी

* ह्या टीकेंत श्रुतींच्या पुढें तिचें भाष्यही दिलेलें आहे. पण त्याचा सर्व सारांश श्लोकांत व टीकेंत आला असल्यामुळें तें भाष्य या टीकेंतून कमी केलें आहे.

करण्यास आरंभ केला होता, व तीं वेळीं तयार झाली असती तर अर्थाच्या जागीं त्या मराठी श्लोकाचीच मी योजना केली असती. पण दैववशात् कांहीं अडचणी आल्यामुळें तो उद्देश तसाच राहिला. शेवटीं ज्या ईश्वराच्या कृपेनें हें विकट काम माझ्या सारख्याच्या हातूनही यथामति पार पडलें. त्या सच्चिदानंदरूप रामचंद्रपदकमलीं ही माझी अल्पकृति अर्पून तद्द्वारा मी भगवान् शंकराचार्याविषयींची माझी पूज्यबुद्धि व्यक्त करितों.

त्रि. वा. बापट धाउलवल्लीकर.

# विषयानुक्रमणिका ।



श्रीः

श्रीमच्छंकराचार्यप्रणीता

# शतश्लोकी.

**सटीका, सान्वयार्था, महाराष्ट्रविवरणसमेता च ।**

---

दृष्टांतो नैव दृष्टस्त्रिभुवनजठरे सद्गुरोर्ज्ञानदातुः ।
स्पर्शश्चेत्तत्र कल्प्यः स नयति यदहो स्वर्णतामश्मसारम् ॥
न स्पर्शत्वं तथापि श्रितचरणयुगे सद्गुरुः स्वीयशिष्ये ।
स्वीयं साम्यं विधत्ते भवति निरुपमस्तेन वालौकिकोपि १

टीकाः—ज्ञानदातुः सद्गुरोः त्रिभुवनजठरे दृष्टांतो नैव दृष्टः। क्षुद्रविद्योपदेष्टॄणां गुरूणां दृष्टांतः कथंचिदुपलभ्येत परंतु "नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते" इत्युक्तत्वाज्ज्ञानदातुः श्रीगुरोः दृष्टांतस्त्रिभुवनजठरान्तर्वर्तिषु देवादिलोकेषु नानाविधविचित्रवस्तुषु नैव दृष्टः । अथ मनाक् साम्यदर्शनेन स्पर्शनेन स्पर्शः पाषाणः दृष्टांतत्वेन कल्प्यः कल्पनीयश्चेत्तथापि न घटते इत्याह स नयतीति। स स्पर्शोऽश्मसारं लोहं यद्यपि स्वर्णतां नयति प्रापयति तथापि स्पर्शत्वं न प्रापयति स्वसदृशं न करोति । सद्गुरुस्तु श्रितचरणयुगे स्वीयशिष्ये स्वीयं साम्यं विधत्ते तेन कारणेन स्पर्शादिदृष्टांतानर्हत्वाद्गुरुर्निरुपमो दृष्टांतशून्यः । अथवा अलौकिकोपि प्रपंचातीतोपि न दृष्टः । आत्माकारत्वात् "ज्ञानी त्वात्मैव मे मतमिति" भगवद्वचनात् ॥ १ ॥

**अन्वयः**—त्रिभुवनजठरे ज्ञानदातुः सद्गुरोः दृष्टांतः नैव दृष्टः । तत्र स्पर्शः कल्प्यः चेत् ( तथापि स न घटते ) अहो यत् (यद्यपि) सः अश्मसारं स्वर्णतां नयति तथापि स्पर्शत्वं न ( नयति ) । सद्गुरुः (तु) श्रितचरणयुगे स्वीयशिष्ये स्वीयं साम्यं विधत्ते तेन निरुपमः भवति । अलौकिकोऽपि वा (दृष्टान्तः न दृष्टः )

**अर्थः**—या त्रिभुवनांत ज्ञानदात्या गुरूंना ( शोभेल असा ) दृष्टांतच मिळत नाहीं. आतां त्यांना परिसाची उपमा जर दिली, (तर तीही योग्य होत नाहीं.) कारण अहो जरी परिस लोखंडाला स्वर्णत्व देतो तरी परिसत्व देत नाहीं. (परंतु) सद्गुरु, चरणयुगुलाचा आश्रय करणाऱ्या आपल्या शिष्याला

**स्वतःचें साम्य देतात; आणि त्यामुळेंच ते निरुपम आहेत. अथवा (त्यांना योग्य असा) प्रपंचातीत(अलौकिक)दृष्टांतही मिळत नाहीं.**

**विवरणः**—श्रीमज्जगद्गुरु परमपूज्य आचार्य प्रथमतः सद्गुरूंची योग्यता व माहात्म्य ह्या पहिल्या श्लोकांत सांगतात. कारण "ज्याची देवाप्रमाणें गुरूंवर परम भक्ति असेल त्यालाच तत्त्वप्रकाश होतो" अशी श्रुति आहे. ज्ञानदान करणाऱ्या सद्गुरूंना शोभेल असा दृष्टांत ह्या त्रिभुवनामध्यें कोठेंही मिळत नाहीं. व्यावहारिक क्षुद्र विद्या शिकविणाऱ्या गुरूंना योग्य असा दृष्टांत कदाचित् मिळूं शकेल परंतु प्रत्यक्ष भगवानांनीं "न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते" (ज्ञानासारखी पवित्र वस्तु या जगांत नाहीं.) अशा प्रकारें ज्या ज्ञानाच्या पवित्रतेविषयीं थोरवी वर्णिली आहे, त्या ज्ञानाचें दान करणाऱ्या सद्गुरूंना तर ह्या नाना चित्रविचित्र वस्तूंनीं भरलेल्या त्रिभुवनांत एकही दृष्टांत आढळत नाहीं. आतां कदाचित् परिस लोखंडाला सुवर्णता देतो म्हणून त्याचा दृष्टांत देऊं म्हटलें, तर तोही योग्य होत नाहीं. कारण परिस लोखंडाला जरी सुवर्णत्व म्हणजे पूर्व स्थितीपेक्षां उच्चत्व देतो, तरी आपलें परिसत्व देत नाहीं. म्हणजे त्याला अनुग्राह्य (ज्याच्यावर अनुग्रह करावयाचा अशा) वस्तूला स्वतःसारखें करितां येत नाहीं. पण सद्गुरूंच्या चरणद्वयाचा आश्रय करून रहाणाऱ्या शिष्याला सद्गुरु स्वसाम्य देतात; म्हणजे ते शिष्याला आपल्याप्रमाणेंच धन्य करून सोडितात; आणि म्हणूनच त्यांना नाना-प्रकारच्या विचित्र वस्तूंनीं भरलेल्या ह्या देवादि तिन्ही लोकांत योग्य अशी उपमा मिळत नाहीं. तसेंच प्रपंचातीत असाही त्यांना योग्य दृष्टांत मिळत नाहीं. कारण ते आत्मरूप झालेले असतात. भगवानांनींही "ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ज्ञानी तर माझा आत्माच आहे" असें सांगितलें आहे. सारांश सद्गुरूंच्या संगतीवांचून व ते प्रसन्न होऊन त्यांचा अनुग्रह झाल्यावांचून कोणाही साधकाला कृतार्थ होतां येत नाहीं. गुरूला शरण गेल्याशिवाय व शरण गेल्यानंतरही शिष्याचा अधिकार किती आहे याविषयीं त्यांचा निश्चय झाल्या-शिवाय ते कधींही तत्त्वाचा उपदेश करित नाहींत. पण त्यांनीं एकदां तत्त्वोपदेश केला कीं तो शिष्यही सद्गुरूंच्या योग्यतेचा होतो.

तस्मात् गुरूपसदन (म्हणजे गुरूंना शरण जाणें,) गुरुसेवा व तद्द्वारा त्यांची प्रसन्नता हींच परमपुरुषार्थप्राप्तीचीं उत्कृष्ठ साधनें होत.

यद्वच्छ्रीखंडवृक्षप्रसृतपरिमलेनाभितोन्येपि वृक्षाः ।
शश्वत्सौगंध्यभाजोप्यतनुतनुभृतां तापमुन्मूलयंति ॥
आचार्याल्लब्धबोधा अपि विधिवशतः सन्निधौ संस्थितानां
त्रेधा तापं च पापं सकरुणहृदयाः स्वोक्तिभिः क्षालयंति २

टीकाः—अथ श्रीगुरुसन्निधानमात्रेणैव शिष्यः कृतार्थतामेति किं पुनरुपदेशादित्याह । यद्वच्छ्रीखंडेति । श्रीखंडवृक्षो मुख्यश्चंदनवृक्षस्तस्मात्प्रसृतो यः परिमलस्तेनाभितः समंततः अन्येपि ये वृक्षास्ते शश्वन्निरंतरं सौगंध्यभाजो भवंति । अथ न केवलं सौगंध्यभाजः किंतु अतनुतनुभृतां बहूनां सर्वजातीयानां लोकानां तापं उन्मूलयन्ति । बहूनामित्यतिशयितत्वमव्ययं । तद्वदाचार्यात् विधिवशात् भाग्यवशात् लब्धबोधाः संतः यदृच्छया सन्निधौ संस्थितानां सर्वजनानां सकरुणहृदयाः यथाधिकारं कर्मोपासनाज्ञानकांडनिरूपिकाभिः स्वोक्तिभिः त्रेधा आध्यात्मिकाधिभौतिकाधिदैविकभेदेन त्रिविधं तापं च कायिकवाचिकमानसिकभेदेन त्रिविधं पापं क्षालयंति उन्मूलयंति । विधिवशादितिपदेन बोधलब्धेर्दुर्लभत्वं सूचितम ॥ २ ॥

**अन्वयः**—यद्वत् श्रीखंडवृक्षप्रसृतपरिमलेन अभितः अन्ये अपि वृक्षाः शश्वत् सौगंध्यभाजः (भवन्ति) (न केवलं सौगंध्यभाजः किंतु ) अतनुतनुभृतां तापं अपि उन्मूलयन्ति. (तद्वत्) आचार्यात् विधिवशातः लब्धबोधाः अपि सकरुणहृदया : (संतः) स्वोक्तिभिः सन्निधौ संस्थितानाम् त्रेधा तापं च पापं क्षालयन्ति.

**अर्थः**—ज्याप्रमाणें चंदनवृक्षापासून पसरलेल्या परिमलानें जवळ असलेले दुसरेही वृक्ष निरंतर सुगंधयुक्त होतात;( व इतकेंच नव्हे तर ) पुष्कळ लोकांचा तापही नाहींसा करितात; त्याचप्रमाणें दैवयोगानें आचार्यांपासून ज्यांना ज्ञान प्राप्त झालें आहे असे पुरुषही दयार्द्र अंतःकरणानें युक्त होत्साते स्वतःच्या वाणीनें, आपला आश्रय करून रहाणाऱ्यांचे त्रिविध ताप व त्रिविध पापें नाहींशीं करितात.

**विवरणः**—आतां ह्या दुसऱ्या श्लोकामध्यें, केवळ श्रीगुरूंच्या सांनिध्यानेंही शिष्य कृतार्थ होतो; मग उपदेशानें होईलच हें काय सांगावें ! असें चंदनाचा दृष्टांत देऊन आचार्य प्रतिपादन करितात. मलयगिरीवर सर्वच चंदनाचे वृक्ष नसतात. खरा चंदन कोठें

एकादाच असतो. त्याच्यापासून सर्वतः पसरणाऱ्या सुगंधानें आसपासचे दुसरे वृक्षही निरंतर सुगंधयुक्त होतात. केवळ ते सुगंधयुक्त होतात इतकेंच नव्हे, तर सर्वजातीच्या अनेक प्राण्यांचे ताप नाहींसे करितात. ह्मणजे मुख्य चंदनाच्या छायेनें, सुगंधानें व उटीनें ज्याप्रमाणें उष्ण दिवसांमध्यें प्राण्यांना आल्हाद वाटतो त्याचप्रमाणें ह्या सांनिध्यानें चंदनत्व प्राप्त झालेल्या वृक्षांच्याही छाया, उटी व सुगंध यांच्या योगानें सर्वत्रांचे ताप नष्ट होतात. ह्या श्लोकांतील "अतनु" ह्या पदानें लोकांतील तारतम्य भाव घालविला आहे. ह्मणजे ते वृक्ष प्राण्यांच्या जाती वर्ण इत्यादिकांकडे न पहातां सर्वांचें सारखें समाधान करितात. त्याचप्रमाणें दैववशात् आचार्यांपासून ज्यांना उपदेश मिळाला आहे असे दयार्द्र अंतःकरणाचे सत्पुरुष, कांहीं कर्मधर्मसंयोगानें आपला आश्रय करून रहाणाऱ्या साधकांचे आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक असे तीन ताप, व कायिक वाचिक आणि मानसिक अशीं तीन प्रकारचीं पापें ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें कर्म, उपासना किंवा ज्ञान यांचा उपदेश करणाऱ्या स्वतःच्या वाणीनेंच नाहींशीं करितात. "विधिवशतः" या पदानें सद्गुरूपासून, ज्ञानप्राप्ति होणें अत्यंत दुर्लभ आहे हें सुचविलें आहे.

आत्मानात्मप्रतीतिः प्रथममभिहिता सत्यमिथ्यात्वयोगात्
द्वेधा ब्रह्मप्रतीतिर्निगमनिगदिता स्वानुभूत्योपपत्त्या ॥
आद्या देहानुबंधाद्भवति तदपरा सा च सर्वात्मकत्वा-
दादौ ब्रह्माहमस्मीत्यनुभव उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात् ३

टीका:—अथात्मप्रतीतिप्रकारमाह। आत्मानात्मेति। प्रथमं मूलतः तत्त्वविचारे क्रियमाणे सत्यं मिथ्या चेति कोटिद्वयमेवासीत्। तथा च सत्यमिथ्यात्वयोगादात्मानात्मप्रतीतिश्च। "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्मेति श्रुतेः" सत्यं ज्ञानं। मिथ्या तद्विपरीतमज्ञानं। एवं सत्यस्य ब्रह्मणः प्रतीतिर्द्वेधा निगमनिगदिता वेदोक्ता। अथ तामेवाह स्वेति। स्वानुभूत्या उपपत्त्या चैवं द्वेधा प्रतीतिः। तत्राद्या स्वानुभूत्या या प्रतीतिः सा देहानुबंधात् शरीरानुबंधेन भवति। तथोपपत्त्या या प्रतीतिः सा सर्वात्मकत्वात्समष्टिरूपात्। अथास्य हेतुमाह आद्याविति। आदौ देहाद्यवच्छेदेन ब्रह्माहमस्मीत्यनुभवं उदिते सति पश्चात्तदनन्तरं सर्वं खल्विदं ब्रह्मेत्युपपत्त्यात्मप्रतीतिर्भवति ॥ ३ ॥

अन्वयः—प्रथमं सत्यमिथ्यात्वयोगात् आत्मानात्मप्रतीतिः अभिहिता स्वा-

मुभूत्या उपपत्त्या (च इति) द्वेधा ब्रह्मप्रतीतिः निगमनिगदिता। आद्या (या प्रतीतिः) सा देहानुबंधात् तदपरा च (या) सा सर्वात्मकत्वात् भवति। आदौ ब्रह्माहमस्मि इति अनुभवे उदिते (सति) पश्चात् खलु इदं ब्रह्म (इति आत्मप्रतीतिः भवति).

**अर्थः—प्रथमतः सत्यत्व आणि मिथ्यात्व यांचे योगानें आत्मा आणि अनात्मा यांचा अनुभव सांगितला आहे. स्वतःच्या अनुभवानें व युक्तीनें अशी दोन प्रकारांनीं ब्रह्मप्रतीति होते असें वेदामध्यें सांगितलें आहे. प्रथमतः जी प्रतीति होते ती देहाच्या योगानेंच होते. त्याचप्रमाणें दुसरी उपपत्तीनें जी प्रतीति होते, ती परमेश्वराच्या सर्वात्मकतेमुळें होते. सारांश प्रथम मी ब्रह्म आहें असा अनुभव आल्यानंतर हें सर्व ब्रह्म आहे असा अनुभव येतो.**

**विवरणः**—आत्म्याची प्रतीति कशी व केव्हां होते हें ह्या श्लोकांत आचार्यांनीं सांगितलें आहे. प्रथमतः विचार करूं लागलें असतां सत्य व मिथ्या अशा दोन कोटि आपल्या पुढें उभ्या रहातात. यास्तव सत्यत्वाचे योगानें आत्म्याची प्रतीति, व मिथ्यात्वाचे योगानें अनात्म्याची प्रतीति येते. "सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म" या श्रुतीप्रमाणें पाहिलें असतां सत्य हें ज्ञान व मिथ्या हें तद्विपरीत अज्ञान होय. त्या सत्यमिथ्यात्वाच्या योगानें सत्य ह्मणजे आत्मा व मिथ्या ह्मणजे तदितर सर्व जडवर्ग अशी दोनप्रकारची प्रतीति प्रत्येक विचारवंताला प्रथमतः होते; आणि असें झालें असतां ब्रह्माचा साक्षात्कारही दोन प्रकारांनीं होतो. एक स्वतःच्या अनुभवानें व दुसरा युक्तीनें. असेंच वेदांनींही सांगितलें आहे. त्यांतील स्वानुभवसिद्ध अशी जी आद्य प्रतीति ती शरीरसंबंधानें ह्मणजे स्थूलदेहापासून अंतःकरणापर्यंत सर्व कार्यकरणसंघात व आत्मा यांच्या अनुषंगानें होते; व दुसरी युक्तिद्वारा होणारी जी प्रतीति ती परमेश्वराच्या समष्टीरूपामुळें होते. सृष्टींतील प्रत्येक व्यक्ति ही व्यष्टि व त्या सर्व व्यक्तींचा समुदाय ही समष्टि. हिलाच सर्वज्ञ, परमेश्वर, हिरण्यगर्भ सूत्रात्मा इत्यादि ह्मणतात. ईश्वर सर्व चराचर पदार्थांचा समुदाय आहे. ह्मणूनच तो सर्वात्मकही आहे. अर्थात् माझ्यामध्यें जें तत्त्व आहे तेंच सर्वत्र आहे. अशा युक्तिद्वारा ही प्रतीति येते. तात्पर्य पूर्वी देहद्वारा मी ब्रह्म आहें असा साक्षात्कार झाला असतां

तदनंतर हें सर्वही दृश्यजात ब्रह्मच आहे असा युक्तिद्वारा ( अनुमानानें ) साक्षात्कार होतो. सारांश “ एकमेवाद्वितीयं ब्रह्म ” असा साक्षात्कार होण्यापूर्वी मीच ब्रह्म आहें असा ह्या देहामध्येंच अनुभव आला पाहिजे.

**आत्मा चिद्वित्सुखात्मानुभवपरिचितः सर्वदेहादियंता ।**
**सत्येवं मूढबुद्धिर्भजति ननु जनो नित्यदेहात्मबुद्धिम् ॥**
**बाह्येस्थिस्नायुमज्जापलरुधिरवसाचर्ममेदोयुगंत-**
**र्विण्मूत्रश्लेष्मपूर्णं स्वपरवपुरहो संविदित्वापि भूयः ॥ ४ ॥**

टीका:—एवमुक्तं शमाद्येनात्मप्रतीतिमभिधायेदानीं विशेषतो निरूपयति आत्मा चिद्विदिति। आत्मा चिद्वित्सुखात्मा वर्तते चित् चैतन्यं वित् ज्ञानं सुखं परमानंदः नवेतत्त्रयमप्यात्मा स्वरूपं यस्य स तथा। न केवलं एवं विधात्मस्वरूपं उपनिषद्वाक्यैरेवज्ञातव्यमित्याह अनुभवेति। किंभूतः आत्मा अनुभवपरिचितः अनुभवेन परिचितः निरंतराभ्यासेन ज्ञातः। अथ तमेवानुभवमाह सर्वदेहादि-यंतेति। सर्वे च ते देहादयश्च इंद्रियप्राणास्तेषां यंता चालकत्वेन देहादिनियंता जाग्रत्सु इंद्रियनियंतृत्वेन स्वप्नरूपः सुषुप्तावानंदरूप इत्यवस्थात्रयेप्यनुभूयत इत्यर्थः। अहो इत्याश्चर्ये एवं सत्यपि मूढबुद्धिर्जनः अनित्यश्चासौ देहश्च तस्मात्मबुद्धि देह एव आत्मेति मनुते। अथ देहाप्यात्मत्वकल्पनार्हो भविष्यतीति चेत्तन्याह बाह्य इति। देहबाह्य अस्थीनि च स्नायवश्च सूक्ष्मशरीरमज्जा च पलं मांसं रुधिरं रक्तं वसा चर्म मेदोयुक् अंतः विण्मुत्रश्लेष्मपूर्णं एवंविधं जुगुप्सा-रूपं स्वपरवपुः स्वकीयं परकीयं वा शरीरं विदित्वापि भूयो भूयो देहात्मबुद्धिं भजत इति महदाश्चर्यमित्यर्थः ॥ ४ ॥

अन्वयः—चिद्वित्सुखात्मा आत्मा अनुभवपरिचितः ( तथा ) सर्व देहादि-यंता। ननु एवं सति (अपि) मूढबुद्धिः जनः अनित्यदेहात्मबुद्धिं भजति अहो स्वपरवपुः बाह्ये अस्थिस्नायुमज्जापलरुधिरवसाचर्ममेदोयुक् तथा अंतर विण्मूत्रश्लेष्मपूर्णं (इति) संविदित्वापि भूयः ( देहात्मबुद्धिं भजते इति महदाश्चर्यं)।

**अर्थः—आत्मा सच्चिदानन्दरूप आहे व त्याचा अनुभवानें परिचयही झालेला आहे. तसेंच तो सर्व देहादिकांचा नियंता आहे. खरोखर असें आहे तरी मूढबुद्धिजन अनित्य जो देह त्याचे ठिकाणीं आत्मबुद्धि ठेवितात. पण अहो आपलें किंवा दुसऱ्याचें शरीर बाहेर अस्थि, शिरा, मांस, वसा, चर्म व मेद यांनीं आणि आंत विष्ठा, मूत्र व श्लेष्मा यांनीं भरलेलें आहे; हें जाणूनही पुनः ते त्याच ठिकाणीं आत्मबुद्धि ठेवितात हें केवढें आश्चर्य आहे.**

**विवरणः**—याप्रमाणें आचार्यांनीं पूर्वश्लोकांत नामनिर्देशानें दोन प्रकारची आत्मप्रतीति सांगितली. आतां पुढें "आत्माचिद्वित्सुखात्मा" या श्लोकामध्यें तिचें पूर्वीपेक्षां अधिक स्पष्ट निरूपण करितात. परमात्म्याचें सच्चिदानन्दरूप केवल उपनिषद्वाक्यांवरूनच जाणतां येतें असें नव्हे, तर आपल्या नेहमींच्या अनुभवानेंही ही गोष्ट आपल्या प्रत्ययाला येते. तो आत्मा देह, इंद्रियें व प्राण यांचा चालक, भासक व नियामक आहे; तो देहाला क्रिया करण्याची शक्ति देतो ह्मणून चिद्रूप, इंद्रियांच्या द्वारा विषयोपभोग घेतो ह्मणून ज्ञानरूप, व निद्रावस्थेमध्यें केवल आनंदाचाच अनुभव घेतो ह्मणून आनंदरूप आहे; ह्याप्रमाणें तिन्ही अवस्थांमध्यें प्रत्येक प्राण्याला अनुभव येतो. असें आहे तरी मूर्ख पुरुष ह्या अनित्य देहालाच आत्मा असें मानितो पण हें अगदीं अयोग्य आहे. कारण बाह्यभागीं अस्थि, मांस, रक्त इत्यादिकांनीं व आंत विष्ठामूत्रादिकांनीं भरलेलें जें श्वानाचें किंवा दुसऱ्याचें शरीर तें अत्यंत अमंगल व निंद्य आहे असें जाणूनसुद्धां पुनः त्यालाच आत्मा समजून त्याची शुश्रुषा करणें हें केवढें आश्चर्य आहे !! सारांश निंद्य शरीर व अत्यंत पवित्र आत्मा यांचें त्रिकालींही ऐक्य होणें शक्य नाहीं.

देहस्त्रीपुत्रमित्रानुचरहयवृषास्तोषहेतुर्ममेत्थं ।
सर्वे स्वायुर्नयन्ति प्रथितमलममी मांसमीमांसयेह ॥
एते जीवंति येन व्यवहृतिपटवो येन सौभाग्यभाज-
स्तं प्राणाधीशमंतर्गतममृतममुं नैव मीमांसयंति ॥५॥

टीकाः—अथ पुनराश्चर्यमेव दर्शयन्नाह देहस्त्रीपुत्रेति । अमी सर्वे लोकाः इहास्मिन् जगति इत्थं मांसमीमांसया मांसविचारेण अलं पूर्णं स्वायुर्नयंति स्वकीयमायुः परिकल्पयंति । किंभूतमायुः प्रथितं वंशविज्ञानादिगुणैः ख्यातमपीत्यर्थः । इत्थं कथमित्याह देहेत्यादि । देहः स्वदेहः, स्त्री, पुत्रः, मित्रं, अनुचरः सेवकः, हयः अश्वः, वृषः बलीवर्दः, एते मम तोषहेतवो भवंति इत्यभिमानेन । तथा एते पुष्टाः कृशा वा इति भरणपोषणरक्षणादिभिः इदं तोषानुबंधेन स्वायुर्नयंति देहभृतामिदमेव प्रयोजनमिति मत्वा व्यर्थं व्ययीकुर्वंति । अथ गूढमात्मतत्त्वं तैः परमप्रयोजनत्वेन कथं ज्ञेयं तत्र तेषां नापराधः किंतु तदज्ञानमाहात्म्य । अथ तदेवाह एतदिति । एते देहस्त्रीपुत्रादयः येन कृत्वा जीवंति तथा येन सौभाग्यं सौंदर्यं भजंति मृतशरीरे तथादर्शनादित्यर्थः । तं अंतर्गतं

अंतर्यामित्वेन स्थितं प्राणाधीशं प्राणमुख्यं अमृतं म्रियमाणेषु देहेषु अमरणशीलं अमुं अनुभवैकवेद्यं नैव मीमांसयंति न विचारयंति इति महदाश्चर्यमित्यर्थः । ९

**अन्वयः**—देहस्त्रीपुत्रमित्रानुचरहयवृषाः मम तोषहेतुः इत्थं सर्वे प्रथितं अलं स्वायुः इह मांसमीमांसया नयन्ति । (किंतु) एते येन जीवन्ति (तथा) येन व्यवहृतिपटवः (भवन्ति तथा येन) सौभाग्यभाजः (भवन्ति) तं अमुं प्राणाधीशं अंतर्गतं अमृतं नैव मीमांसयन्ति ।

**अर्थः**—देह, स्त्री, पुत्र, मित्र, सेवक, अश्व, व वृषभ हे सर्वही मला संतोष देणारे आहेत, असें समजून हे सर्व लोक आपलें प्रसिद्ध असें संपूर्ण आयुष्य ह्या व्यवहारामध्यें मांसमीमांसा करीत घालवितात. परंतु हे सर्व (स्त्रीपुत्रादिक ) ज्याच्या योगानें जीवंत रहातात, ज्याच्यामुळें व्यवहारदक्ष होतात, आणि ज्याच्यामुळें सौंदर्यादि गुणसंपन्न होतात, त्या ह्या सर्वांतर्गत व मरणधर्मरहित अशा प्राणेश्वराची कधींच मीमांसा करीत नाहींत.

**विवरण:**—श्रीमत् आचार्य लोकांच्या अयोग्य वर्तनाकडे पाहून पुनः आश्चर्यानें ह्मणतातः–हे अखिल लोक, देहादिक सर्वहि मला आनंद देणारे आहेत, अशा अभिमानानें आणि त्याचप्रमाणें देहादि पुष्ट किंवा कृश झालें असतां मीच पुष्ट किंवा कृश झालों आहें असें खोटेंच मानून आपलें कुल, शील, विद्या यांनीं प्रसिद्ध असलेलें सर्व आयुष्य ह्या मांसाचा विचार करण्यांत व्यर्थ घालवितात. ह्मणजे ते स्वसंबद्ध अशा दुसऱ्या सर्व वस्तु व प्राणी माझे आहेत, यांच्या स्वास्थ्यानें मला सुख होणार, मला एकट्याला सुख होण्याकरितां जगांतील अनंत प्राण्यांना अनंत क्लेश झाले तरी कांहीं हरकत नाहीं, अशा विवंचनेंत आपलें अमोल्य आयुष्य घालवितात; परंतु हे सर्व देहस्त्रीपुत्रादिक ज्याच्यामुळें जीवंत रहातात, ज्याच्या योगानें मोठे व्यवहार कुशल होतात, आणि ज्याच्या योगानें सौंदर्यवान्, पराक्रमी, शूर, वीर इत्यादि विशेषणांना पात्र होतात, त्या सर्वांच्याही अंतर्यामीं असणाऱ्या व देहादिक नष्ट झाले तरी नष्ट न होणाऱ्या ह्या स्वानुभवसिद्ध मुख्य आत्म्याचा कधींच विचार करीत नाहींत; हें केवढें आश्चर्य आहे !! बुद्धीला मोह पडला असतां तिच्यामध्यें सदसद्विवेकशक्ति रहात नाहीं; आणि त्यामुळेंच खऱ्याला खोटें व खोट्याला खरें असें ती मानिते. सर्व प्राकृत पुरुषांना मोह पडल्यामुळें त्यांना सद्रूप आत्म्याचा विसर पडतो व ते असत्य

अनात्म्याच्या ठिकाणींच अभिमान ठेवितात. ह्यांत आश्चर्य एवढेंच कीं त्यांस ह्या आत्म्याचा सर्वदां अनुभव येत असूनही त्याच्याविषयीं थोडातरी विचार करावा असें त्यांना कधीं चुकूनही वाटत नाहीं.

कश्चित्कीटः कथंचित्पटुमतिरभितः कंटकानां कुटीरम् ।
कुर्वंस्तेनैव साकं व्यवहृतिविधये चेष्टते यावदायुः ॥
तद्वज्जीवोपि नानाचरितसमुदितैः कर्मभिः स्थूलदेहम् ।
निर्मायात्रैव तिष्ठन्ननुदिनममुना साकमभ्येति भूमौ ॥६॥

टीका:—अथ देहात्मसाहचर्यं दृष्टांतेन प्रदर्शयति कश्चिदिति । यथा कश्चित्पटुमतिः कीटः कथंचित् निजकफोद्भूतसूत्रनिचयैः कंटकानां कुटीरं कुर्वन् व्यवहृतिविधये व्यवहारसिद्ध्यर्थे यावदायुश्चेष्टते इतस्ततः पर्यटति तद्वज्जीवोपि नानाचरितसमुदितैः अनेकविधानि चरितानि क्रियमाणसंचितानि तेभ्यः समुदितैः प्रारब्धकर्मभिः स्थूलदेहं शरीरं निर्माय विरचय्य ततः तत्रैव देहे तिष्ठन्नमुना देहेन साकं सहैव अनुदिनं भूमावभ्येति पर्यटति । अयमर्थः कंटककुटीरवदचेतनो देहः स्वतो न चलति मृतशरीरे चलनादर्शनात् ।अतः तस्य कश्चिच्चालको वक्तव्यः स एव जीवः । यथा च रथाश्वन्यायवच्चालकव्यतिरेकेण देहो न चलति तथा देहव्यतिरेकेण तस्य चालकत्वं न युज्यते इत्युभयोःसाहचर्यम् ६

**अन्वयः**—कश्चित् पटुमतिः कीटः कथंचित् अभितः कंटकानां कुटीरं कुर्वन् तेनैव साकं व्यवहृतिविधये यावदायुः चेष्टते । तद्वत् जीवोऽपि नाना-चरितसमुदितैः कर्मभिः स्थूलदेहं निर्माय अत्रैव तिष्ठन् अमुना साकं अनुदिनं भूमौ अभ्येति ।

**अर्थ:**—कोणी एक बुद्धिमान् कीटक मोठ्या प्रयत्नानें आपल्या सभोंवतीं कांट्यांचें घर करून त्या सहवर्तमानच व्यवहार होण्याकारितां सर्व आयुष्यभर क्रिया करीत असतो—त्याच प्रमाणें प्राणी सुद्धां नानाप्रकारच्या आचरणांनीं उत्पन्न झालेल्या कर्मांनीं स्थूल देह निर्माण करून, त्यामध्येंच राहून, त्यासहवर्तमान प्रतिदिवशीं पृथ्वीवर संचार करितो.

**विवरण:**—आतां देह आणि आत्मा यांचें साहचर्य दृष्टांतानें दृढ करितात. ज्याप्रमाणें एकादा बुद्धिवान् किडा आपल्या कफापासून उत्पन्न केलेल्या धाग्यांनीं आपल्याभोंवतीं मोठ्या प्रयत्नानें कांट्यांचें घरटें करून खानपानादिक व्यवहार करण्याकरितां सर्वजन्मभर त्या घरट्या सहवर्तमानच इकडे तिकडे फिरत असतो; त्याचप्रमाणें प्राणी

अनेक जन्मामध्यें अनेक आचरणें केल्यानें त्यांपासून होणाऱ्या प्रारब्ध कर्मानें स्थूल देह तयार करून व त्या देहामध्येंच राहून त्याच्याच सहवर्तमान प्रतिदिनीं पृथ्वीवर पर्यटण करित असतो. म्हणजे जन्मभर त्या स्थूल देहाला न सोडितां सर्व स्थूल व्यवहार करितो. तात्पर्य असें कीं त्या कांठ्यांच्या घराप्रमाणेंच असणारा हा अचेतन देह स्वतः कोणतीही चेष्टा करित नाहीं. कारण आत्म्याचा शरीरापासून वियोग झाला असतां काष्ठासारखें पडणारें शरीर कोणतीच चेष्टा करीत नाहीं, हें प्रत्यक्षसिद्ध आहे. त्याअर्थी ह्या जड देहाकडून अनेक क्रिया करविणारा कोणी तरी चालक हा असलाच पाहिजे व तो चालक जीवच होय. जसें रथ जड असल्यामुळें स्वतः त्याला चलनादिक क्रिया करितां येत नाहींत पण त्याला अश्व जोडला असतां तो रथ वेगानें चालूं लागतो व रथ नसून केवल अश्व असला तरीही रथक्रिया होत नाहीं त्याच न्यायानें कोणी चालक नसेल तर देहाची चेष्टाही होणार नाहीं. तात्पर्य ह्या दोघांचें नित्य साहचर्य आहे.

स्वीकुर्वन् व्याघ्रवेषं स्वजठरभृतये भीषयन्यश्च मुग्धान् ।
मत्वा व्याघ्रोहमित्थं सनरपशुमुखान् बाधते किंनु सत्त्वान् ॥
मत्वा स्त्रीवेषधारी स्त्र्यहमिति कुरुते किं नटो भर्तुरिच्छां ।
तद्वच्छारीर आत्मा पृथगनुभवतो देहतो यः स साक्षी ॥७॥

टीका:—अथ प्राप्तोऽपि देहः पारमार्थिको न भवति किंतु अविद्याकल्पितत्वात् कृत्रिमोऽस्ति इति तदनुरूपं न कार्यमिति दृष्टान्तेन प्रदर्शयति स्वीकुर्वन्निति । यः कश्चित्पुरुषः स्वजठरभृतये भिक्षया स्वोदरपूरणाय कृत्रिमव्याघ्रवेषं स्वीकुर्वन् तेन मुग्धान् बालिशांश्च भीषयंस्त्रासयन्नास्ते सः अहं व्याघ्रः इत्थं मत्वा नरपशुमुख्यान्सत्त्वान् प्राणिनः बाधते किंनु । व्याघ्रवेषं कृत्रिमं जानन् तूष्णीमास्ते व्याघ्रवेषानुरूपं कर्म करोतीत्यर्थः । अथैतदेव पुनर्दृष्टान्तेन प्रकटयति मत्वेति । स्त्रीवेषधारी नटः अहं स्त्रीति मत्वा भर्तुरिच्छां कुरुते किं स्त्रीवेषानुरूपैर्हावभावैरन्यान्पुरुषान् प्रलोभयति परंतु स्वयं स्त्रीति मत्वा रमणयोगेच्छां न करोति । तद्वच्छारीरः शरीरावच्छिन्न आत्मा देहतो देहानुभवेन पृथगस्ति यतः स साक्षी तटस्थः । तेन देहानुरूपा चेष्टा न कार्या स्वरूपानुरूपमेव स्यात्कर्तव्यमित्यर्थः ॥ ७ ॥

**अन्वयः**—यः (कश्चित् पुरुषः) स्वजठरभृतये व्याघ्रवेषं स्वीकुर्वन् मुग्धान् भीषयन् (आस्ते सः) अहं व्याघ्रः इत्थं मत्वा सनरपशुमुखान् सत्वान् बाधते

किंतु ? तथा स्त्रीवेषधारी नटः अहं स्त्रीति मत्वा भर्तुरिच्छां कुरुते किं ? तद्वत् शारीरः आत्माः देहतः यः अनुभवतः पृथक् अस्ति सः साक्षीः ।

**अर्थः—जो (कोणी एकादा पुरुष) आपलें उदर भरण्याकरितां वाघाचा वेष घेऊन अज्ञ बालकांना भिववीत असतो, तो मी व्याघ्र आहें असें मानून मनुष्य पशु इत्यादिकांसहवर्तमान इतर प्राण्यांना पीडा करितो काय? किंवा स्त्रीवेष घेतलेला नट मी स्त्री आहें असें मानून पतीची इच्छा करितो काय? त्या प्रमाणेंच शरीराभिमानी आत्मा जो अनुभवानें देहाहून निराळाच आहे, तो साक्षी (ह्मणजे पहाणारा—अर्थात् देहाचा व त्याचा कांहीं संबंध नाहीं.)**

विवरणः—याप्रमाणें देहात्मसाहचर्य सिद्ध झालें. परंतु तदन्वयें जीवाला देह जरी प्राप्त झाला असला तरी तो पारमार्थिक (सत्य) नव्हे; तर तो अविद्येनें कल्पित असल्यामुळें कृत्रिम आहे ह्मणून देहाला अनुसरून आत्म्याचें वागणें कधींही योग्य होणार नाहीं; असें येथें दृष्टांतानें आचार्य निश्चित करतात. एकादा पुरुष भिक्षा मागून पोट भरण्याकरितां वाघाचा वेष घेतो; आणि त्या वेषानें अज्ञ बालकादिकांना भिववीत रस्त्यांतून फिरत असतो. पण तो, माझ्या वेषानुरूप मी खरोखरच व्याघ्र आहें असें समजून प्राणिमात्रांची खऱ्या वाघाप्रमाणें हिंसा करितो काय? छे: कधींच नाहीं. तर तो माझा हा व्याघ्रवेष माझ्या खऱ्या स्वरूपाहून निराळा आहे असें जाणून आपल्या वेषाला शोभेल असें (वाघासारख्या उड्या मारणें, ओरडणें, हातवारे करणें इत्यादि) कर्म करीत असतो. हीच गोष्ट आणखी एका दृष्टांतानें आचार्य स्पष्ट करितात. स्त्रीचा वेष घेणारा नट विषयेच्छा परिपूर्ण करून घेण्याकरितां भर्त्याची इच्छा कधीं तरी करितो का? कधींच नाहीं. तर तो आपल्या स्त्रीवेषाला अनुरूप असे नेत्रविलास हस्तपादादिकांचें विन्यास इत्यादि हावभाव करून अन्य पुरुषांना मात्र लोभ उत्पन्न करितो. परंतु स्वतः मी स्त्री आहें असें समजून पुरुषसंगमेच्छा कधींच करीत नाहीं. त्याचप्रमाणें शरीरानें युक्त असणारा आत्मा देहाहून पृथक् आहे असा ज्या-अर्थीं अनुभव येतो त्याअर्थीं तो देहादिकांच्या क्रियांचा साक्षी आहे. ज्याप्रमाणें व्याघ्रवेषधारी किंवा स्त्रीवेषधारी पुरुष आपण व्याघ्र

किंवा स्त्री नसून केवळ त्यांचे वेष घेणारे आहों असें पक्के समजत असून स्ववेषानुरूप चेष्टा करीत असतात; त्याचप्रमाणें शरीरोपाधिक आत्मा, अनुभवानें मी शरीराहून पृथक् आहें असें समजल्यानंतर, देहवेषानुरूप चेष्टा करीत असूनही स्वतःच्या साक्षीरूपाला विसरत नाहीं. सारांश देह पारमार्थिक नाहीं त्याअर्थी प्राकृत पुरुषाप्रमाणें तद्नरूप चेष्टा न करितां स्वस्वरूपाचें नेहमीं भान ठेवून व्यवहार करीत असावें.

स्वंबालं रोदमानं चिरतरसमयं शांतिमानेतुमग्रे ।
द्राक्षं खार्जूरमाम्रं सुकदलमथवा योजयत्यंबिकास्य ॥
तद्वच्चेतोतिमूढं बहुजननभवान्मौढ्यसंस्कारयोगा-
द्बोधोपायैरनेकैरवशमुपनिषद्बोधयामास सम्यक् ॥ ८ ॥

टीकाः—अथ बहुप्रकारैरात्मप्रतीतिं दर्शयंत्याः श्रुतेः कौशलमाह । स्वंबालमिति । अंबिका माता चिरतरसमयं रोदमानं स्वंबालं शांतिमानेतुं तूष्णींभावं प्रापयितुं अस्य बालकस्याग्रे द्राक्षं खार्जुरमाम्रं सुकदलं वा योजयति । येन केनाप्यभीष्टफलेनायं रोदनादुपशमं प्राप्नोत्वित्यर्थः । तद्वद्बहुजननभवान्मौढ्यसंस्कारयोगादवशं चंचलं सदतिमूढमज्ञानोपहतं चेतः उपनिषत्सम्यग्यथाधिकारं अनेकैर्बोधोपायैरात्मज्ञानोपायैर्बोधयामास । आत्मप्रतिपत्तौ बहुषूपायेषु प्रोक्तेषु सत्सु कोपि प्रतिफलिष्यतीत्यर्थः ॥ ८ ॥

**अन्वयः**—चिरतरसमयं रोदमानं स्वंबालं शांतिमानेतुं अस्य अग्रे अंबिका द्राक्षं खार्जुरं आम्रं अथवा सुकदलं योजयति । तद्वत् उपनिषद् बहुजननभवात् मौढ्यसंस्कारयोगात् अवशं सत् अतिमूढं चेतः अनेकैः बोधोपायैः सम्यक् बोधयामास ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें पुष्कळ वेळपर्यंत रडत असलेलें आपलें बालक उगें रहावें ह्मणून त्याची आई त्याच्या पुढें द्राक्ष खजूर आंबा किंवा उत्तम केळें ठेविते, त्याचप्रमाणें उपनिषदांनीं, अनेक जन्म घेतल्यामुळें व त्यांतील अनेक मूढ संस्कारामुळें चंचल झालेल्या मनाला, अनेक बोधोपायांनीं उत्तम उपदेश केला आहे.

**विवरणः**—ह्या श्लोकांत आत्मज्ञान होण्याकरितां अनेक उपाय योजणाऱ्या श्रुतिमातेचें कौशल्य दाखविलें आहे. एकादि माता, पुष्कळ वेळपर्यंत कशाकरितां तरी हट्ट घेऊन रडणाऱ्या आपल्या बालकाचें समाधान करण्याकरितां त्याच्या पुढें द्राक्षखर्जूरादिक

गोड पदार्थांपैकीं कांहीं पदार्थ टाकिते; आणि त्यांपैकीं एकाद्या तरी आवडीच्या पदार्थानें त्याचें समाधान व्हावें अशी तिची इच्छा असते. त्याचप्रमाणें अनादिकालापासून अनेक जन्म घेतल्यामुळें, व प्रत्येक जन्मांत अनेक मूढ संस्कार झाल्यानें अत्यन्त चंचल झालेल्या ह्या अज्ञानमय अंतःकरणाला श्रुतिमातेनें ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें अनेक ज्ञानोपायांनीं बोध केला आहे. त्या अत्यंत कारुणिक माउलीचा आत्मज्ञानाविषयीं अनेक उपाय सांगण्यामध्यें हाच हेतु कीं, त्यांपैकीं एकाद्याचा तरी स्वीकार करून प्राण्यानें कृतार्थ व्हावें. लौकिक माता. आपल्या मुलाचा संताप दूर होऊन त्याला शांति मिळावी म्हणून जसें अनेक मिष्ट पदार्थांचें आमिष दाखविते, त्याचप्रमाणें श्रुतिमाउलीनेंही त्रिविध तापांनीं संतप्त झालेल्या मानवाला निरतिशय शांति प्राप्त व्हावी म्हणून भजन, पूजन, यम, नियम, ध्यान, धारणा, श्रवण, मनन इत्यादि साधकाच्या इच्छेप्रमाणें व अधिकाराप्रमाणें अनेक उपाय योजिले आहेत.

यत्प्रीत्या प्रीतिपात्रं तनुयुवतितनूजार्थमुख्यं स तस्मा-
त्प्रेयानात्माथ शोकास्पदमितरदतः प्रेय एतत्कथं स्यात् ॥
भार्याद्यं जीवितार्थी वितरति च वपुः स्वात्मनः श्रेय इच्छं-
स्तस्मादात्मानमेव प्रियमधिकमुपासीत विद्वान्न चान्यत् ९

टीकाः—अथात्मनः सर्वापेक्षया प्रियत्वमाह यत्प्रीत्येति । यस्माद्वक्ष्यमाणाद्विषयजातात्सकाशात्स आत्मा प्रेयान्परमप्रेमास्पदं भवति । सकः तनुयुवतितनूजार्थमुख्यं यद्विषयजातं तद्यत्प्रीत्या प्रीतिपात्रं भवति यस्य प्रीतिर्यत्प्रीतिस्तया सर्वं प्रीतिपात्रं । अत्रायमर्थः सुखदुःखान्यतरसाक्षात्कारो भोगः स तु आत्मन्येव युज्यते अतो विषयभोगार्थं प्रवृत्तस्य प्रथममात्मप्रतीतिर्निर्दिष्टा । तया मूलभूतया उक्तं विषयजातं प्रीतिपात्रं भवति । तत्रापि प्रथमं तनुः शरीरं भोगसाधनत्वात् । ततो भोगेष्वंतरंगा युवतिः । ततः उभयप्रीतिजन्यस्तनूजः पुत्रः । ततस्तन्निर्वाहकोर्थः द्रव्यं । ततोप्यर्थसाध्यमन्यदन्नपानवस्त्रताम्बूलादिकं प्रीतिपात्रं भवति । तथा च मुख्या प्रीतिरात्मनः तदधीना गौणी प्रीतिरन्येषामिति प्रत्यक्षसिद्धमस्ति । एवं यस्य मुख्या प्रीतिः स एवात्मा प्रेयानित्यर्थः । भवत्वात्मा प्रेयांस्तथापि विषयजातमपि प्रीतिपात्रत्वादुपास्यमेवेत्यागतामित्याशंक्य विषयेषु प्रीतिपात्रत्वं प्रातिभासिकं तन्न पारमार्थिकं दुःखपात्रत्वमेवास्तीत्याह इतरदिति । इतरद्विषयजातं शोकास्पदमित्यनुभवसिद्धं आदिमध्यावसानेषु यद्दुःखं तत् दुःखास्पदमेव । उक्तं च "अर्जने रक्षणे नाशे क्षयरो विषयो

भवेत् । सुखार्थे सज्जते तव मूढधीरिति विस्मयः" इति एवं अन्वयव्यतिरेकाभ्यां दुःखास्पदमेतदिव्यपवर्गात प्रेयः कथं स्यात्न स्यादेवेत्यर्थः । तस्मात्कारणाद्विद्वान् पंडितःअधिकंयथा भवति तथा प्रियं प्रियतममात्मानमेवोपासीत न चान्यच्छरीराद्यं । अथात्मनः सर्वेभ्योधिकप्रियत्वं प्रकटयति भार्याद्यमिति । जीवितार्थी पुमान् भार्यादि वितरति पुत्रवित्ताद्यमपि दत्वा स्वात्मानं रक्षति । "आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपीत्युक्तत्वात्" । अथ शरीरेप्यात्मत्वनिषेधार्थमाह वपुरिति । आत्मनो जीवस्य श्रेयः सुकृतामिहार्थमिच्छन्वपुर्वितरति भृगुपातेन गंगाप्रवेशेन क्षात्रधर्मेण वा शरीरमर्पयति एवमात्यंतिकं प्रियत्वं आत्मनएव शरीरादीनामापेक्षिकमित्यर्थः ॥ ९ ॥

अन्वयः—यत्प्रीत्या तनुयुवतितनूजार्थमुख्यं प्रीतिपात्रं ( भवति ) सः आत्मा तस्मात् प्रेयान् । अथ इतरत् शोकास्पदं । अतः एतत् प्रेयः कथं स्यात् । जीवितार्थी भार्याद्यं वितरति । स्वात्मनः श्रेयः इच्छन् वपुः ( वितरति ) तस्मात् विद्वान् आत्मानमेव अधिकं प्रियं उपासीत । न चान्यत् ।

अर्थः—ज्याच्या प्रीतीनें शरीर, स्त्री, अपत्य, व सर्वही विषयजात हीं प्रीतिपात्र होतात, तो आत्मा त्या सर्वांहून जास्त प्रेमास्पद आणि त्याहून अन्य सर्वही शोकास्पद होय; तेव्हां तें प्रीतिपात्र कसें होणार ? स्वतःचे जीवित रहावें म्हणून भार्यापुत्रमित्रादिकांना सोडतो व आत्म्याच्या कल्याणाची इच्छा करून शरीराचाही त्याग करितो. तस्मात् विद्वान् पुरुषानें सर्वांपेक्षां अधिक प्रिय असलेल्या आत्म्याचीच उपासना करावी. अनात्म्याची करूं नये.

विवरणः—आत्मा सर्वांपेक्षां जास्त व खरा प्रीतिपात्र आहे; हें ह्या नवव्या श्लोकांत आचार्यांनीं दाखविलें आहे. ज्या आत्म्याच्या प्रीतिद्वारा शरीरादि सर्वही विषयजात प्रीतिपात्र होतें, तो आत्माच खरें प्रेमाचें स्थान होय. सुख किंवा दुःख यांपैकीं कशाचा तरी अनुभव येणें याला भोग असें म्हणतात. तो भोग आत्म्यालाच होणें युक्त आहे; म्हणून विषयभोग घेण्याकरितां प्रवृत्त झालेल्या पुरुषाला प्रथमतः आत्म्याचीच प्रतीति होते. आणि त्या मूलभूत आत्मप्रतीतिद्वारा सर्व विषय प्रिय होतात. त्यांतही शरीर हें भोगसाधन असल्यामुळें त्याचे ठिकाणीं प्रथम प्रेम जडतें. तदनंतर भोगांतील उत्तम भोग जी स्त्री तिच्यावर प्रीति बसते. पुढें स्त्रीपुरुषांच्या प्रेमापासून उत्पन्न होणाऱ्या पुत्राविषयीं प्रेम उत्पन्न होतें. त्यानंतर या सर्वांचा निर्वाह व्हावा, म्हणून द्रव्यार्जनाविषयीं प्रेम

उत्पन्न होतें; आणि शेवटीं द्रव्यापासून साध्य होणारे अन्नपान-वस्त्रतांबूलादिक पदार्थ आवडूं लागतात. एकंदरींत आत्म्याची प्रीति मुख्य व त्याच्या अपेक्षेनें अन्य सर्वांविषयींची प्रीति गौण हें प्रत्यक्षसिद्ध आहे. तात्पर्य ज्याच्याविषयी खरी व मुख्य प्रीति तो आत्माच सर्वांपेक्षां जास्त प्रियकर होय. आतां आत्मा सर्वांपेक्षां जास्त प्रिय जरी असला, तरी प्राण्यांची विषयांविषयींची प्रीति सर्वदा अनुभवास येते. तेव्हां त्यांचा उपभोग घेण्यास कोणता प्रत्यवाय आहे अशी शंका येते खरी; पण विषयांविषयींची जी प्रीति आपल्या अनुभवाला येते ती खरी प्रीति नव्हे तो प्रीतीचा भास होय. विषयांचें खरें स्वरूप दुःख हेंच आहे. असें आचार्यांनीं " इतरत् " इत्यादि पदांनीं सुचविलें आहे. उत्पत्ति, स्थिति, व लय या तीन अवस्थांमध्यें जें दुःखद तें सर्वदा दुःखरूपच असतें असा न्याय आहे. शिवाय सर्व अनात्मजात दुःख देणारें आहे ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. " अर्जने रक्षणे नाशे क्लेशदो विषयो भवेत् सुखार्थं सज्जते तत्र मूढधीरिति विस्मयः" । विषय प्राप्त करून घेतांना, प्राप्त झाल्यानंतर त्याचें रक्षण करितांना, व तो नष्ट झाला असतांना क्लेश देतो पण मूढबुद्धि पुरुष त्याचे ठिकाणीं सुखाकरितां आसक्त होतो, हें मोठें आश्चर्य होय; असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. ह्या वचनाप्रमाणें व अन्वयव्यतिरेकन्यायानें सर्व विषयजात दुःखास्पद आहे असें सिद्ध झालें असतां त्याच्याविषयीं प्रेम कसें वाटणार ? आतां आत्मा सर्वांपेक्षां अधिक प्रिय कसा हें " भार्याद्यं " इत्यादि चरणांत सांगितलें आहे. स्वतः जींवंत रहावें अशी इच्छा करणारा पुरुष, भार्यापुत्रमित्रादिकांचाही त्याग करून स्वतःचें रक्षण करितो. शिवाय " आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपि " अशी लौकिक म्हणही आहे. फार काय पण शरीरसुद्धां आत्मा नव्हे असें 'वपुः' इत्यादि पदांनीं सांगतात. स्वतःचें अत्यंत कल्याण व्हावें म्हणून लोक स्वशरीराचेंही गंगेमध्यें संतर्पण करून किंवा क्षात्रधर्माप्रमाणें तें धारातीर्थी ठेऊन स्थूलदेहाचा नाश करून घेतात. त्याअर्थी शरीरापेक्षां आत्मा अधिक प्रिय आहे; व त्याच्याकरितां शरीरादिक अन्य सर्व अनात्मजात प्रिय वाटत असतें.

तस्मात् विद्वान् पुरुषानें सर्वापेक्षां अत्यंत प्रिय असणाऱ्या आत्म्याचीच सेवा करावी; व देहादिक जडवर्गाची परिणामीं निष्फळ होणारी सेवा करूं नये.

यस्माद्यावत्प्रियं स्यादिह हि विषयतस्तावदस्मिन्प्रियत्वं ।
यावद्दुःखं च यस्माद्भवति खलु ततस्तावदेवाप्रियत्वम् ॥
नैकस्मिन्सर्वकालेऽस्त्युभयमपि कदाप्यप्रियोपि प्रियः स्या-
त्प्रेयानप्यप्रियो वा सततमपि यतः प्रेय आत्माख्यवस्तु १०।

टीका:—अथापेक्षिकं प्रियत्वं विविच्याह यस्मादिति । इह विषयभोगे यस्माद्भार्यादिविषयतः सकाशाद्यावत्सुखं भवति तावदेवास्मिन्विषये प्रियत्वं । तथा तस्माद्भार्यादिविषयतः यावद्दुःखं तावदेवास्मिन्नप्रियत्वं भवति । एवमुभयमपि प्रियत्वं अप्रियत्वं वा एकस्मिन् विषये सर्वदा नास्ति।यतः कदाचिदप्रियोपि कार्यवशात् प्रियः स्यात् ।तथा कदाचित् प्रेयानपि भार्यादिविषयः निमित्तवशेन कालवशेन वा अप्रियः स्यात् । ततः आत्माख्यवस्तु सततमपि प्रेयः अत्र मूलं श्रुतिः "न वा अरे पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया भवंत्यात्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवंति" तथा "तदेतत्प्रेयः पुत्रात्प्रेयो वित्तात्प्रेयोन्यस्मात्सर्वस्मादंतरतरं यदयमात्मा स योन्यमात्मनः प्रियं ब्रुवाणं ब्रूयात्प्रियं रोत्स्यतीति ईश्वरोह तथैव स्यादात्मानमेव प्रियमुपासीत । स य आत्मानमेव प्रियमुपास्ते न हास्य प्रियं प्रमायुकं भवतीति"। भाष्यं "याज्ञवल्क्यो मैत्रेयीं प्रति वदति अरे मैत्रेयि पुत्राणां कामाय पुत्राः प्रिया न भवंति किंतु आत्मनस्तु कामाय पुत्राः प्रिया भवंति । प्रथमतः स्वीय आत्मा प्रियः स्यात्तर्हि तदर्थे पुत्रा मृग्यंते यथा पुत्राय कदलीफलेन भाव्यमिति रथ्यां गतस्य मुख्या पुत्रप्रीतिरेवोद्दिष्टा तदर्थं फलादेः तद्वन्मुख्यात्मप्रीतिस्तदर्थं पुत्रादिप्रीतिः। एवमात्मप्रीतिशेषत्वेनैव सर्वेषां प्रीतिः । अथ तदेवाह तत्र तत्र वित्तपुत्रयोरेषणा अतिप्रेयस्त्वेन दुस्त्यजा । अथ तदेतदात्माख्यं वस्तु पुत्रात्प्रेयः स्वभावतः पुत्रः प्रेयांस्तदपेक्षयाप्येतत्प्रेय इत्यर्थः। तथैव वित्तादपि प्रेयः । अथ किं प्रत्येकं वक्तव्यं अन्यस्मादपि सर्वस्मादपि प्रीतिपात्रात्प्रेयः। नहि केवलं वाङ्मात्रेणास्य प्रियत्वं । अतो युक्तिमाह—अंतरतरमिति । यद्यस्मात्कारणात्सोयमात्मा अंतरतरः भवति अंतरतरमित्यांतरतरं पुत्रादि ततोप्यांतरं। युक्त्यंतरमाह—अन्यमिति । अथात्मनः सकाशादन्यमप्रियतममिति ब्रुवाणं पुरुषं प्रति इति ब्रूयात् इतीति किं तथाभिमतं यत् पुत्रवित्तादि प्रियं तद्रोत्स्यति शोकास्पदं भवति उत्पत्तिस्थितिविनाशादिकालत्रयेपि दुःखहेतुत्वात् । एवं यस्माद्दुःखं भवति तत्कथं प्रियत्वेन गण्यते । तदुक्तं भगवता-"ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते। आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुध इति" ।तथा विषया दुःखहेतवः । ह-इति किमर्थं ईश्वरः किं तथैव स्यान्नैवेत्यर्थः । तस्मादात्मानमेव प्रियमुपासीत न पुत्रादि । एवं य आत्मानमेवोपास्ते अस्य ह इति निश्चयेन प्रियं पुत्रवित्तादिकं प्रमायुकं प्रमाविषयो न भवति न स्फुरति घृतास्वादे तैलभक्षणवदित्यर्थः। तदुक्तं भगवता—"यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः" इति ॥ १० ॥

**अन्वयः**—इह हि यस्मात् विषयतः यावत् प्रियं ( भवति ) तावत् अस्मिन् प्रियत्वं। यावत् यस्माच्च दुःखं भवति खलु ततः तावत् एव अप्रियत्वं सर्वकाले एकस्मिन् उभयमपि न अस्ति। कदापि अप्रियोपि प्रिय प्रेयान् अपि अप्रियो वा स्यात् यतः ( ततः ) सततमपि आत्माह्यवस्तु प्रेयः।

**अर्थः—व्यवहारामध्यें ज्या विषयांपासून जेवढें सुख होत असतें, तेवढेंच त्याच्या ठिकाणीं प्रियत्व असतें आणि ज्याच्या पासून जेवढें दुःख होतें तेवढेंच त्याच्या ठिकाणीं अप्रियत्व असतें. सर्व कालीं एकाच वस्तूच्या ठिकाणीं प्रीति आणि अप्रीति हीं दोन्हीं कधींही रहात नाहींत. कारण प्रसंगोपात्त अप्रिय वस्तूही प्रिय होते व प्रिय वस्तूही अप्रिय होते. असें आहे त्याअर्थीं सतत प्रिय अशी आत्मा हीच एक वस्तु आहे.**

**विवरणः**—शरीरादिक अनात्म वस्तूंच्या ठिकाणचें प्रेम, आत्म्याच्या प्रेमामुळें कसें हें स्पष्ट करून येथें सांगतात. विषयांचा उपभोग घेत असतां ज्या भार्यादि विषयांपासून जोंपर्यंत पुरुषाला सुख होत असतें तोंपर्यंतच त्याचें त्या विषयांच्या ठिकाणीं प्रेम असतें. तसेंच त्याच भार्यादि विषयांपासून जसें जसें दुःख होऊं लागतें तसें तसें ते अप्रिय होऊं लागतात. सारांश प्रियत्व व अप्रियत्व हीं एकाच विषयाच्या ठिकाणीं सर्वदा कधींच नसतात. कारण केव्हां केव्हां अप्रिय वस्तूही कांहीं कारणानें प्रिय होते, आणि तसेंच एकादेवेळीं अत्यंत प्रिय असे भार्यादि विषयही, अप्रिय आचरणादि निमित्तानें आणि शरीरव्यथा इत्यादि कालपरत्वें अप्रिय होतात. पण आत्म्याची गोष्ट तशी नाहीं. त्या अर्थीं सर्वदा हीच एक खरी प्रिय वस्तु होय. ह्या श्लोकांतील प्रतिपादनाला आधारभूत अशी बृहदारण्यकामध्यें 'न वारे पुत्राणां कामाय पुत्राःप्रियाः "इत्यादि श्रुति आहे. त्या श्रुतिवरील आचार्यकृत भाष्याचें तात्पर्य येथें दिलें असतां श्लोकार्थ स्पष्ट होईल ह्मणून तें येथें दिलें आहे. याज्ञवल्क्य मैत्रेयीला ह्मणतात कीं, हे मैत्रेयी, पुत्रांची इच्छा पूर्ण होण्याकरितां पुरुषाला पुत्र प्रिय होत नसतात, तर आत्म्या(स्वतः)ची इच्छा पूर्ण होण्याकरितां ते प्रिय होतात. प्रथमतः स्वतःचा आत्मा जर प्रिय असेल तर मग त्याच्याकरितां पुत्र हवेसे वाटतात. आपल्या पुत्राकरितां एक केळें घ्यावें, असें बाजारांत गेलेल्या पुरुषाला वाटतें. ह्या ठिकाणीं, पुत्राची प्रीति मुख्य;

आणि पुत्राकरितां फलादिकांच्या ठिकाणची प्रीति गौण असते तसेंच आत्म्या विषयींची प्रीति मुख्य आणि त्याच्याकरितां पुत्रादिकांची प्रीति गौण होय. सारांश आत्मप्रीतीच्या शेषत्वानें बाकी सर्वांचे ठिकाणीं प्रीति असते. त्या त्या पुत्र वित्तादिकांविषयींच्या एषणा (इच्छा) सोडणें अति कठीण आहे. ही आत्माख्य वस्तु खरोखरच पुत्राहून अतिप्रिय आहे. कारण स्वभावतः जरी पुत्र प्रिय वाटत असला तरी आत्म्याशीं त्याची तूलना करून पाहिली असतां आत्माच अधिक प्रिय वाटतो. तसेंच वित्तादि सर्व विषयांहूनही आत्मा अधिक प्रिय आहे. ही गोष्ट केवळ शब्दसिद्ध आहे असें नव्हे, तर युक्तितःही ती सिद्ध होते. हा आत्मा सर्वांच्याही अंतर आहे; व पुत्रमित्रादि सर्व विषय बहिर आहेत. ही एक युक्ति; व दुसरी युक्ति अशी कीं, आत्म्यापेक्षां पुत्रवित्तादि अधिक प्रिय आहेत असें ह्मणणाऱ्या पुरुषाला असें विचारावें कीं, तुला अभिमत असलेले हे पुत्रवित्तादिक विषय जर जास्त प्रिय, तर त्यांच्या उत्पत्ति, स्थिति व नाश या तिन्ही कालामध्यें त्यांच्यापासून तुला शोक कां होतो. ज्यांच्यापासून दुःख होतें ते प्रिय असें ह्मणणें कधीं तरी शहाणपणाचें होईल का? भगवंतांनींही गीतेमध्यें सांगितलें आहे कीं "ये हि संस्पर्श॰ रमते बुधः । अर्जुना, जे इंद्रियें व विषय याच्या संसर्गानें होणारे भोग ते सर्वही दुःखमूलकच आहेत, तसेंच ते उत्पत्तिविनाशशील आहेत; आणि ह्मणून त्यांच्या ठिकाणीं सुज्ञ पुरुष कधींही रममाण होत नाहीं". सारांश सर्वही विषय दुःखाला कारण होणारे आहेत; ह्मणून सर्वदा सर्वांत अधिक प्रिय असणाऱ्या आत्म्याविषयीं आदर बुद्धि ठेऊन पुत्रादि अनात्म्याविषयीं अनादर करावा. याप्रमाणें जो आत्म्याचीच उपासना करितो त्याला विषय प्रिय वाटत नाहींत. ज्या प्रमाणें पुरुष घृताची रुची समजेपर्यंत तैल भक्षण करित असतो, त्याप्रमाणेंच आत्मानुभव येईपर्यंत हे पुत्रादि प्रिय वाटतात. भगवंतांनींही "यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः । ज्याची प्राप्ति झाली असतां अन्य कोणताही लाभ त्याहून अधिक वाटत नाहीं" असें ह्मटलें आहे.

श्रेयः प्रेयश्च लोके द्विविधमभिहितं काम्यमात्यंतिकं च ।
काम्यं दुःखैकबीजं क्षणलवविरसं तच्चिकीर्षंति मंदाः ॥
ब्रह्मैवात्यंतिकं यन्निरतिशयसुखस्यास्पदं संश्रयंते ।
तत्त्वज्ञास्तच्च काठोपनिषदभिहितं षड्विधायां च वल्याम् ॥

टीकाः—अथात्र कठशाखोपनिषदं संवादयति—श्रेय इति । लोके श्रेयः प्रेयश्च द्विविधमभिहितं प्रोक्तं । श्रेयः सुकृतसाधनं प्रेयः प्रेमास्पदं । यत् द्वेधा काम्यमात्यंतिकं च काम्यं श्रेयः फलोद्देशेन क्रियमाणमुपयाचितादिकं च । आत्यंतिकं मोक्षसाधनं । तथा प्रेयोऽपि काम्यं जायापुत्रादि आत्यंतिकं आत्माख्यं । तत्र श्रेयः प्रेयो वा यत्काम्यं तद्दुःखैकबीजं दुःखनिदानं तर्हि तत्र लोकानां प्रवृत्तिः कथं दृश्यत इत्यत आह क्षणलवविरसं शुक्तिकारजतवन्नामिषमात्रदृष्टिरम्यं तन्मंदाः मूर्खाश्चिकीर्षंति वांछंति । तथा आत्यंतिकं श्रेयः प्रेयो वा ब्रह्मैव यतो निरतिशयसुखस्यास्पदं तत्त्वज्ञाः संश्रयंते । इत्येतत्प्रमेयं कठवल्ल्युपनिषदि अभिहितं । अथ कठोपनिषदः बहुधा पठिताः संति प्रकृते एतत्प्रमेयं कुत्र स्थले निरूपितमस्तीत्याह षड्विधायां च वल्याम् ॥ ११ ॥

**अन्वयः**—लोके काम्यं आत्यंतिकं च ( इति ) श्रेयः प्रेयश्च द्विविधं अभिहितं । दुःखैकबीजं क्षणलवविरसं काम्यं तत् मंदाः चिकिर्षंति । ब्रह्मैव आत्यंतिकं । यत् निरतिशयसुखस्यास्पदं ( यत् ) तत्त्वज्ञाः संश्रयंते तच्च काठोपनिषदभिहितं ( कुत्र इति चेत् ) षड्विधायां च वल्याम् ।

**अर्थः**—या जगामध्यें काम्य आणि आत्यंतिक असें श्रेय व प्रेय दोन प्रकारचें सांगितलें आहे. त्यांतील काम्य हें केवळ दुःखालाच कारण असून त्याचें रमणीयत्व क्षणिक असतें; व मूढ पुरुष तें करण्याची इच्छा करितात. ब्रह्म हेंच आत्यंतिक होय. जें ( हें ब्रह्म ) निरतिशय सुखाचें स्थान असून ज्याचा तत्त्वज्ञ पुरुष आश्रय करितात, तें कठोपनिषदामध्यें सांगितलें आहे. ( कोठें ह्मणाल तर ) षड्वल्लीमध्यें ( सांगितलें आहे ).

**विवरणः**—आत्मा सर्वांत अधिक प्रिय आहे ह्याविषयीं काठोपनिषदाचेंही प्रमाण देतात. लोकांमध्यें प्रसिद्ध असलेलें जें श्रेय ह्मणजे पुण्यसाधन, व प्रेय ह्मणजे प्रीतिपात्र, तें काम्य आणि आत्यंतिक असें दोन प्रकारचें आहे. फलाच्या उद्देशानें जें कर्म करितात तें काम्य श्रेय होय; आणि जें मोक्षसाधन तें आत्यन्तिक श्रेय होय. त्याचप्रमाणें जायापुत्रादिक हें काम्य प्रेय, व आत्मा

(ज्ञ० हा शरीरेंद्रियसमूह) आत्यंतिक प्रेय होय. यांपैकीं काम्य श्रेय किंवा प्रेय केवळ दुःखालाच कारण होत असतें. असें जर आहे तर लोकांची तेथें प्रवृत्ति कशी होते? अशी शंका कोणी घेतील ह्मणून सांगतात तें काम्य भ्रमानें शुक्तिकेच्या ठिकाणीं भासणाऱ्या रजताप्रमाणें अगदीं थोडा वेळपर्यंत मोठें रमणीय दिसत असतें, आणि ह्मणून परिणामाकडे लक्ष्य न देणारे मंदपुरुष त्याचा स्वीकार करितात. त्याचप्रमाणें आत्यंतिक श्रेय किंवा प्रेय जें ब्रह्म तें निरतिशय सुखाचें स्थान आहे; आणि तत्त्वज्ञ पुरुष त्याचाच अंगीकार करितात. हाच सिद्धांत कठोपनिषदामध्येंही सांगितला आहे. पुष्कळ कठशाखा असल्यामुळें सहा वल्लींनीं युक्त असलेल्या कठोपनिषदांत हें सांगितलें आहे असा आचार्यांनीं श्लोकांत स्पष्ट उल्लेख केला आहे.

आत्मांभोधेस्तरंगोस्म्यहमिति गमने भावयन्नासनस्थः ।
संवित्सूत्रानुविद्धो मणिरहमिति वा चेंद्रियार्थप्रतीतौ ॥
दृष्टोस्म्यात्मावलोकादिति शयनविधौ मग्न आनंदसिंधा-
वंतर्निष्ठो मुमुक्षुः स खलु तनुभृतां यो नयत्येवमायुः १२

टीका:—अथ ब्रह्मैकत्वभावनया निष्पन्नस्यांतर्निष्ठस्य स्वरूपं श्लोकद्वयेनाह—आत्मांभोधेरिति । एवं निरूपितप्रकारेण यो मुमुक्षुरायुर्नयति परिकलयति सोंऽतर्निष्ठ इत्युच्यते । अथ किं कुर्वन्नायुः परिकलयतीत्याह आत्मेति । गमने अहमात्मांभोधेस्तरंग इति भावयन् स्थानांतरचलने सति यथा तरंगो बाह्याभ्यंतरतो जलमय एव सन्नितस्ततश्चलति एवमहं जीवोऽप्यगाधस्यात्मसमुद्रस्य तरंग इवास्मीति भावयन् गच्छतीत्यर्थः । "क्रीडत्सूर्मिरपामिवेति श्रुतेः" । अथासनस्थो यथास्थितो मुमुक्षुः संवित्सूत्रानुविद्धो मणिरहमस्मीति भावयन् संविद्रूपं यत्सूत्रं तेनानुविद्धः प्रोतः अहं जीवलक्षणो मणिः अस्मीति भावयन्नास्ते "मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव" इति भगवद्वचनात् । एवं देहव्यापारेंऽतर्निष्ठत्वं दर्शयन् इदानीं इंद्रियव्यापारेंऽतर्निष्ठत्वं निरूपयति । इंद्रियार्थप्रतीतौ सत्यां आत्मावलोकादात्मदर्शनान्ममेदानीं आत्मदर्शनं वृत्तमिति मत्वा हृष्टोस्मीति भावयन् अथेंद्रियोपरमं त्वाह शयनविधाविति । शयनविधौ सुषुप्तिकालांते अहमानंदसिंधौ मग्नोभूवमिति भावयन् ॥ १२ ॥

अन्वयः—गमने अहं आत्मांभोधेः तरंगः (इति भावयन्) आसनस्थः संवित्सूत्रानुविद्धः मणिः अहं अस्मि (इति भावयन्) इंद्रियार्थप्रतीतौ आत्मावलोकात् हृष्टोस्मि (इति भावयन्) शयनविधौ आनंदसिंधौ मग्नः च (इति भावयन्) यः मुमुक्षुः एवं आयुः नयति स खलु तनुभृतां अंतर्निष्ठः ।

**अर्थः—गमन प्रसंगीं मी आत्मसमुद्राचा एक तरंग आहें अशी भावना करून, आसनावर बसला असतां ज्ञानरूप सूत्रा-मध्यें ओंविलेला मी एक मणी आहें अशी भावना करून, विषय-प्रतीति घेत असतां आत्मदर्शन झाल्यानें मी अत्यंत आनंदित झालों आहें अशी भावना करून, व निद्रावस्थेमध्यें मी आनंद-समुद्रामध्यें निमग्न झालों आहें अशी भावना करून जो मुमुक्षु ह्याप्रमाणें आपलें आयुष्य घालवितो, तो खरोखर प्राण्यांमध्यें अंतर्निष्ठ होय.**

विवरणः—हें सर्वही ब्रह्म आहे अशा भावनेनें सिद्ध झालेल्या अंतर्निष्ठ पुरुषाचें स्वरूप बारा आणि तेरा अशा दोन श्लोकांमध्यें सांगितलें आहे. प्रसंगविशेषीं इकडे तिकडे गमन करित असतां, ज्याप्रमाणें पाण्याची लाट बाह्याभ्यंतर जलमयच असून इकडे तिकडे फिरते त्याप्रमाणें, मी जीव सुद्धां ह्या पारावारशून्य आत्म-समुद्राच्या बाह्याभ्यंतर तन्मयच असल्यामुळें लाटेसारिखा आहें, अशी भावना करीत गमन करितो. " क्रीडन्नूर्मिरपामिव "ह्मणजे उद-काच्या लाटेप्रमाणें क्रीडा करणारा अशी श्रुतिही आहे. त्याचप्रमाणें आसनावर स्वस्थ बसला असतां आत्मस्वरूपभूत ज्ञानरूप सूत्रा मध्यें ओंविलेला मी जीवरूपी ( माळेंतील मण्याप्रमाणें ) एक मणी आहें अशी भावना करीत असतो. "मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव " सुत्रामध्यें जसे माळेचे मणी ओंविलेले असतात त्या-प्रमाणें हें सर्व दृश्यजात माझे ठिकाणीं ओंविलेलें आहे. असें भगवं-तांचेंही ह्मणणें आहे. ह्याप्रमाणें देह व्यापार करित असतां मुमुक्षु अंतर्निष्ठ कसा असतो हें दाखऊन आतां त्याचा इंद्रियव्यापार चालला असतांही तो अंतर्निष्ठच असतो हें दाखवितात. ज्याअर्थी कोणताही अनुभव आत्म्याच्या ज्ञानकलेवांचून होणें शक्यच नाहीं त्याअर्थी त्या त्या इंद्रियांच्या विषयांचा अनुभव घेत असतां मला ह्यावेळीं आत्म्याचेंच दर्शन झाल्यामुळें मी अत्यंत संतुष्ट झालों आहे अशी भावना करीतो; व निद्रावस्था संपल्यानंतर मी आनंदसमु-द्रामध्यें एवढा वेळपर्यंत निमग्न होतों अशी भावना करितो. सारांश ह्याप्रमाणें जो मुमुक्षु आपलें आयुष्य घालवितो त्यालाच अंतर्निष्ठ असें ह्मणतात. ह्या श्लोकांत स्थूल देहाच्या व्यवहारानें जाग्रदवस्था;

विषयानुभवानें स्वप्न किंवा सूक्ष्मावस्था आणि निद्रावस्थेनें कारणावस्था दाखवून ह्या तिन्ही अवस्थांमध्यें अंतर्निष्ठ पुरुष आत्मानुसंधान कसें ठेवितो हें सुचविलें आहे.

वैराजव्यष्टिरूपं जगदखिलमिदं नामरूपात्मकं स्या-
दंतःस्थप्राणमुख्यात्प्रचलति च पुनर्वेत्ति सर्वान् पदार्थान्।
नायं कर्ता न भोक्ता सवितृवदिति यो ज्ञानविज्ञानपूर्णः।
साक्षादित्थं विजानन् व्यवहरति परात्मानुसंधानपूर्वम् १३

टीकाः- अथ द्वितीयश्लोकमाह-वैराजमिति। ज्ञानं शास्त्रोत्थं विज्ञानं अनुभवः ताभ्यां पूर्णो यः पुमान् भवति स साक्षादित्थं इति विजानन् आत्मानुसंधानपूर्वं व्यवहरति। किमित्याशंक्याह—वैराजेति। अयमेतदुक्तं भवति आत्माकारान्तःकरणवृत्तिः पुमान् यदा बाह्यदृष्टिर्भवति तदा नामरूपात्मकं अखिलं समग्रं विचित्रं जगत् स्थूलसमष्टिरूपस्य विराजो ब्रह्मणो व्यष्टिरूपमिति पश्यन्कूटस्थाभिन्नसूत्राद्व्यतिरिक्तः सन् व्यवहरति तथा व्यष्टिरूपं जगत् अंतःस्थप्राणमुख्याच्चिद्रूपात् प्रचलति व्यापारं करोति तथा तस्मादेव संविद्रूपात्पदार्थान्वेत्तीति विजानन् तदनुसंधानपूर्वकमेव व्यवहरति। तथायमात्मा सवितृवत् सूर्यवत् न कर्ता चालकत्वेऽपि कर्तृत्वाभिमानशून्यः तथा न भोक्ता पदार्थग्राहकत्वेऽपि भोक्तृत्वाभिमानशून्यः। तद्वद्व्यवहरतीत्यर्थः॥ १३॥

अन्वयः—इदं अखिलं नामरूपात्मकं जगत् वैराजव्यष्टिरूपं स्यात् पुनश्च अंतःस्थप्राणमुख्यात् प्रचलति (तथा तस्मादेव) सर्वान् पदार्थान् वेत्ति सवितृवत् न अयं कर्ता न भोक्ता इति ज्ञानविज्ञानपूर्णः यः (भवति स) साक्षात् इत्थं विजानन् आत्मानुसंधानपूर्वं व्यवहरति।

अर्थः—हें सर्वही नामरूपात्मक जगत् विराटस्वरूप परमात्म्याच्या व्यष्टिरूप आहे; आणि पुनः सर्व जगद्व्यवहार त्यांतील चैतन्यामुळें होतो. त्या चैतन्यद्वाराच सर्व पदार्थांचें ज्ञान होतें. तसेंच सूर्याप्रमाणें हा कर्ता किंवा भोक्ता नव्हे. अशा परोक्ष व अपरोक्ष ज्ञानानें जो पूर्ण असतो तो प्रत्यक्ष हें असें आहे असें जाणून आत्मानुसंधानपूर्वक सर्व व्यवहार करितो.

विवरणः—ज्याची आत्मरूप अंतःकरणवृत्ति झालेली आहे तो पुरुष ज्यावेळीं बाह्यदृष्टि होतो, म्हणजे प्रारब्ध कर्मानुरूप व्यवहार करूं लागतो, त्यावेळीं नामरूपात्मक हें सर्वही विचित्र जगत् स्थूल समष्टिरूप विराटस्वरूप परमात्म्याचें व्यष्टिरूप आहे (म्हणजे त्याची ही एक आकृति आहे) अशी भावना करून जगांतील

कोणत्याही प्राण्याची किंवा पदार्थाची निंदा किंवा त्यांचा मत्सर न करितां व्यवहार करितो. त्याचप्रमाणें हें सर्वही व्यष्टिरूप जगत् ( म्ह० विराटरूप परमात्मा ) अंतस्थ चिद्रूप मुख्य प्राणाच्या योगानें व्यापार करितें, तसेंच त्या चैतन्यामुळेंच सर्व पदार्थांना जाणतें; असें जाणून त्या परमात्म्याच्याच ठिकाणीं तो अनुसंधान ठेऊन व्यवहार करितो. तसेंच हा आत्मा सूर्याप्रमाणें सर्वांना चेतना देणारा असला तरी कर्तृत्वाभिमानशून्य असल्यामुळें कर्ता नव्हे, व सर्व पदार्थांचा अनुभव घेत असूनही भोक्तृत्वाभिमानशून्य असल्यामुळें तो भोक्ताही नव्हे, इत्यादि शास्त्रोत्पन्न ज्ञानानें व साक्षात् अनुभवानें जो पुरुष पूर्ण झालेला असतो, तो हें असेंच आहे असें निश्चयानें जाणून, सर्वदा आत्म्याचकडे अनुसंधान ठेऊन व्यवहार करितो.

नैर्वेद्यं ज्ञानगर्भं द्विविधमभिहितं तत्र वैराग्यमाद्यं ।
प्रायो दुःखावलोकाद्भवति गृहसुहृत्पुत्रवित्तैषणादेः ॥
अन्यज्ज्ञानोपदेशाद्यदुदितविषये वांतवद्धेयता स्या-
त्प्रव्रज्यापि द्विधा स्यान्नियमितमनसां देहतो गेहतश्च १४

टीकाः—अथ द्विप्रकारं वैराग्यमाह—नैर्वेद्यमिति। तत्र विज्ञानोपायं वैराग्यं द्विविधमभिहितं प्रोक्तं । अथ तस्य द्वैविध्यमाह एकं नैर्वेद्यं अपरं ज्ञानगर्भं निर्वेदात् दुःखादुत्पन्नं नैर्वेद्यं तदेवाह आद्यं नैर्वेद्यं गृहादिसुहृत्पुत्रवित्तैषणादेः प्रायः दुःखावलोकाद्भवति । यत्तदग्रे दुःखजनकं भविष्यतीति वृश्चिकस्पर्शवत् दुःखदर्शनान्नाद्रियते आदृतमपि त्यज्यते । अथ ज्ञानगर्भं वैराग्यमाह अन्यदिति । अन्यत् द्वितीय ज्ञानोपदेशाद्भवतीति । प्रथमं दुःखदर्शनादिस्तूक्तं अनंतरं आत्मातिरिक्तं सर्वं दुःखरूपं इत्याद्युपदेशादुक्तविषयं सुहृत्पुत्रकलत्रादिके वांतवद्धेयता स्यात् । यथा जुगुप्सा वांते जाते सति पुनस्तद्ग्रहणेच्छा न भवति तद्वत् विषयवैरस्यज्ञानात्पुनर्विवेकिनः तद्ग्रहणेच्छा नोत्पद्यते । तदुक्तं वासिष्ठे—"बुध्वाप्यत्यंतवैरस्यं यः पदार्थेषु दुर्मतिः । बध्नाति वासनां भूयो नरो नासौ स गर्दभ इति" । अथ प्रव्रज्यापि द्विविधा भवति । प्रथमं गेहतः गृहात्प्रव्रज्या । अपरा देहतश्च देहाभिमानशून्यत्वमेव देहतः प्रव्रज्येत्यर्थः ॥ १४ ॥

अन्वयः—( वैराग्यं ) नैर्वेद्यं ज्ञानगर्भं ( च इति ) द्विविधमभिहितं तत्र आद्यं वैराग्यं प्रायः गृहसुहृत्पुत्रवित्तैषणादेः दुःखावलोकात् भवति । अन्यत् ज्ञानोपदेशात् ( भवति ) यत् उदितविषये वान्तवत् हेयता स्यात् ( तथा ) नियमितमनसां प्रव्रज्या अपि देहतः गेहतः च इति द्विधा स्यात् ।

**अर्थः--वैराग्य नैर्वेद्य आणि ज्ञानगर्भ अशा दोन प्रकारचें आहे. त्यांपैकीं पहिलें जें नैर्वेद्य नांवाचें वैराग्य तें बहुत करून गृह, सुहृत्, पुत्र, वित्त इत्यादिकांच्या इच्छेमुळें प्राप्त होणाऱ्या दुःखाचा अनुभव आला असतां होतें. दुसरें जें ज्ञानगर्भ नांवाचें वैराग्य तें ज्ञानोपदेशामुळें प्राप्त होतें. कारण पुत्रादिकविषय प्राप्त झाले असतां ते वान्ति प्रमाणें त्याज्य होतात. तसेंच आत्मसंयमी लोकांचा देहापासून व गेहापासून असा संन्यास सुद्धां दोन प्रकारचा आहे.**

**विवरणः**—आचार्य या चवदाव्या श्लोकांत दोन प्रकारचें वैराग्य सांगतात. वैराग्य हा ज्ञानाचा उपाय आहे. तें वैराग्य दोन प्रकारचें सांगितलें आहे. त्यांतील एकाला नैर्वेद्य ह्मणजे दुःखापासून उत्पन्न झालेलें व दुसऱ्याला ज्ञानगर्भ ह्मणजे ज्ञानमाहात्म्यानें प्राप्त झालेलें असें ह्मणतात. प्रथम जें नैर्वेद्य, तें गृह, सुहृत्, पुत्रैषणा, वित्तैषणा, इत्यादिकांपासून बहुतकरून प्राप्त होणाऱ्या दुःखापासून उत्पन्न होतें. दुःख होऊं नये ह्मणून वृश्चिक इत्यादिकांना जसा कोणी स्पर्श करित नाहींत, त्याचप्रमाणें परिणामीं ज्यांच्यापासून दुःख होतें अशा पुत्रवित्तादिकांचे ठिकाणीं विचारवान् पुरुष आदर ठेवित नाहींत. आणि यदा कदाचित् त्यांचा त्यांविषयीं प्रथम आदर असला, तरी ते मग तो मोठ्या प्रयत्नानें सोडितात. दुसरें जें ज्ञानगर्भ वैराग्य, तें केवल ज्ञानोपदेशानें उत्पन्न होतें. प्रथमतः गृह पुत्र इत्यादिक दुःखमय आहेत, असा अनुभव आल्यानें वैराग्य होतें असें सांगून, आणि आतां आत्म्याहून अन्य असें सर्व अनात्मजात दुःखरूप आहे असा गुरूपदेश झाल्यानें पूर्वोक्त विषय वान्तिप्रमाणें त्याज्य होतात, असें सुचविलें आहे. ज्याप्रमाणें वान्ति झाली असतां पुनः तिचें भक्षण करावें अशी इच्छा होत नाहीं, त्याप्रमाणेंच विषय हे अत्यंत नीरस आहेत असें ज्ञान झाले असतां विवेकी पुरुषाला पुनः ते ग्रहण करण्याची इच्छा होत नाहीं. योगवासिष्ठामध्यें "बुध्वाप्यत्यन्तवैरस्यं यः पदार्थेषु दुर्मतिः। बध्नाति वासनां भूयो नरो नासौ स गर्दभः॥ जो मूढ पुरुष हे सर्वही सृष्ट पदार्थ अत्यंत नीरस आहेत असें जाणूनही पुनः त्यांच्या ठिकाणीं दृढ वासना ठेवितो तो मनुष्य नव्हे तर गर्दभ होय" असें सांगितलें आहे. संन्यासही दोन प्रकारचा

आहे. एक स्त्री, पुत्र, वित्तइत्यादिकांचा त्याग करून शास्त्रोक्त रीतीनें गृहांतून निघून संन्यास करणें, व दुसरा देहविषयक अभिमानाचा संन्यास (यथाविधि त्याग) करणें. देहाभिमानशून्य होणें हाच देहतः संन्यास होय. सारांश शिखासूत्राचा त्याग करून, भगवीं वस्त्रें धारण करून, सर्व लौकिक स्वत्वाचा त्याग करून, यति धर्मानें कोठें तरी रहाणें या लौकिक संन्यासाला गृहतः संन्यास, व गृहादिकांप्रमाणेंच प्रत्यक्ष स्वशरीराच्या ठिकाणचाही अभिमान सोडून विदेहावस्थेमध्यें रहाणें याला देहतः संन्यास असें ह्मणतात.

**यः कश्चित्सौख्यहेतोस्त्रिजगति यतते नैव दुःखस्य हेतो-**
**र्देहेहंता तदुत्था स्वविषयममता चेति दुःखास्पदे द्वे ॥**
**जानन्रोगाभिघाताद्यनुभवति यतो नित्यदेहात्मबुद्धि-**
**र्भार्यापुत्रार्थनाशे विपदमथपरामेति नारातिनाशे ॥ १५॥**

टीकाः—अथ द्विप्रकारं वैराग्यं तत्र विज्ञानोपायवैराग्यमुपदेशप्रकारेणाह—यःकश्चिदिति। त्रिजगति लोकत्रयेऽपि यःकश्चित्पुरुषः सौख्यहेतोः सुखं भूयादिति यतते प्रयत्नं करोति परंतु दुःखस्य हेतोर्नैव यतते एवं सति या देहे अहंता तथा तदुत्था देहाहंतार्थमुत्पन्ना स्वविषयममता चेति द्वे दुःखास्पदे दुःखस्थाने भवतः। एवं जानन्नपि नित्यदेहात्मबुद्धिः पुरुषः रोगाभिघातादि अनुभवति। रोगा ज्वरादिः अभिघातः शस्त्रताडनादिः एवं देहाभिमानिबुद्ध्या रोगाभिघातादि दुःखमनुभवति तथा भार्यापुत्रादिषु ममताभिमानविषये तन्नाशेन परामुत्कृष्टां विपदं एति प्राप्नोति परंत्वहंताममताशून्यो दुःखी न भवति। यथा अरातेर्वैरिणो नाशे सति ममताशून्यत्वाद्दुःखी न भवति। तथा च यत्राहंता ममता वा तत्रैव दुःखसाहचर्यमिति धूमवह्निसाहचर्यवत्सर्वानुभविक-मित्यर्थः ॥ १५ ॥

**अन्वयः**—त्रिजगति यःकश्चित् सौख्यहेतोः यतते नैव दुःखस्य हेतोः (एवंसति) देहे अहंता तदुत्था स्वविषयममता च इति द्वे दुःखास्पदे भवतः; यतः अनित्यदेहात्मबुद्धिः (ततः एवं) जानन् (अपि) रोगाभिघातादि अनुभवति (तथा) भार्यापुत्रार्थनाशे अथ परां विपदां एति। परंतु अरातिनाशे (विपदां) न (एति)।

**अर्थः**—या त्रैलोक्यामध्यें कोणीही पुरुष सौख्याकरितां यत्न करित असतो; दुःखाकरितां नव्हे तरी देहाचे ठिकाणीं असलेली अहंता, व तद्द्वारा उत्पन्न होणारी स्वसंबद्ध विषयममता हीं

**दोन दुःखस्थानें आहेत. पण मनुष्य अनित्य देहाचे ठिकाणीं आत्मबुद्धि ठेवित असल्यामुळें असें जाणत असूनही सर्वदा रोगादिकांचे प्रहार अनुभवितो; व भार्यापुत्रादि विषय नष्ट झाले असतांही तो मोठ्या विपत्तीमध्यें पडतो. पण शत्रूचा नाश झाला असतां त्याला दुःख होत नाहीं.**

**विवरणः**—ह्या पंधराव्या श्लोकामध्यें द्विविध वैराग्यापैकीं ज्ञानाला कारण होणाऱ्या वैराग्याचा उपदेशरूपानें निर्देश करितात. या त्रिभुवनांत कोणीही जरी पुरुष झाला तरी तो स्वतःला सुख व्हावें या हेतूनेंच यत्न करीत असतो; दुःख व्हावें म्हणून कधींही कोणी प्रयत्न करित नाहीं. पण ह्याप्रमाणें सुखाकरितांच प्रयत्न करीत असतांही देहाचे ठिकाणीं असलेली अहंता आणि त्या देहाचें हित व्हावें म्हणून उत्पन्न झालेली विषयममता हीं दोन दुःखोत्पत्तीचीं स्थानें आहेत; आणि हें जाणत असूनही अनित्य देह हाच मी असा निश्चय ठेवणाऱ्या प्राकृत पुरुषाला ज्वरादि रोगांपासून असह्य पीडा सहन कराव्या लागतात. म्हणजे देहाचे ठिकाणी अहंता ठेवल्यानेंच केवळ त्याला हें दुःख अनुभवावें लागतें. तसेंच भार्यापुत्रादि विषयांच्या ठिकाणीं ममता ठेविल्यानें त्यांचा नाश झाला असतांही या पुरुषाला अत्यंत यातना सहन कराव्या लागतात. पण ज्याप्रमाणें शत्रूच्या ठिकाणीं ममता नसल्यामुळें त्याच्या नाशानें कोणीही पुरुष दुःखी होत नाहीं, तसाच देह व तत्संबंधी विषय यांच्या ठिकाणीं ममता न ठेवणारा पुरुष दुःखी होत नाहीं. सारांश ज्याठिकाणीं अहंता किंवा ममता त्याठिकाणीं दुःख. असें ह्यांचें साहचर्य धूर व अग्नि यांच्या साहचर्याप्रमाणें सिद्ध झालें.

तिष्ठन् गेहे गृहेशोप्यतिथिरिव निजं धाम गंतुं चिकीर्षुर्गेहस्थं दुःखसौख्यं न भजति सहसा निर्ममत्वाभिमानः ॥
आयात्रायास्यतीदं जलदपटलवद्यातृ यास्यत्यवश्यं ।
देहाद्यं सर्वमेव प्रविदितविषयो यश्च तिष्ठत्ययत्नः॥१६॥

टीकाः—अथ गृहाद्बहिः प्रव्राजितुमशक्तस्य विवेकिनोऽपि पुरुषस्य मोक्षोपायमाह—तिष्ठन्निति । गृहेशो गृहस्थः गेहे तिष्ठन्नपि गेहस्थं दुःखसौख्यं न भजति न स्पृशति । क इव गृहे तिष्ठन्नतिथिरिव मार्गस्थ इव किंभूतोऽतिथिः निजं

धाम गंतुं चिकीर्षुः स्वं ग्रामं गंतुमिच्छुः क्षणमपि वासस्थलं ग्रामस्य अस्मात् श्वोगंताऽद्यगन्तास्मीति कृतनिश्चयस्य यथा निस्पृहत्वं तथैव प्रकृतेऽपीत्यर्थः किंभूतो गृहस्थः निर्ममस्वाभिमानः ममताभिमानशून्यः तर्हि स्थितेषु गतेषु वा विषयेषु कथमुदासीन इत्याह—आयात् आगमिष्यद्देहादि पदार्थजातमवश्य-मायास्यत्येव। तथा यातृ गमिष्यद्वस्तु यास्यत्येव। किंवत् जलदपटलवत् जलदपटलं स्वप्रयत्नेन नायाति विधिवशादायातमपि स्वप्रयत्नेन न निर्गच्छति एवं इत्थं प्रविदितविषयः प्रविदितः अन्वयव्यतिरेकेण ज्ञातः विषयो येन स तथाभूतः पुरुषः अयत्नः सन् गृहे तिष्ठति ॥ १६ ॥

**अन्वयः**—गृहेशः गेहे तिष्ठन् अपि निजं धाम गंतुं चिकीर्षुः अतिथिः इव निर्ममत्वाभिमानः सन् गेहस्थं दुःखसौख्यं सहसा न भजति। (विषयेषु स कथं उदासीनो भवति इत्याह) इदं सर्वं एव देहाद्यं जलदपटलवत् अवश्यं आयातृ आयास्यति यच्च यातृ (तत्) यास्यति (इति) प्रविदितविषयः अयत्नः सन् तिष्ठति.

**अर्थः**—स्वग्रामाला जाण्याची इच्छा करणाऱ्या एकाद्या अतिथीप्रमाणें गृहस्थ गृहांत रहात असूनही अहंता व ममता यांनीं रहित असल्यामुळें गृहांतील सुखदुःखांनीं कधींही सुखी किंवा दुःखी होत नाहीं. तर मेघपटलाप्रमाणें हें सर्वही देहादि विषयजात, जें अवश्य येणारें असेल तें येईल, व जें जाणारें असेल तें जाईल; ह्याप्रमाणें यथार्थज्ञानी होऊन कांहींही प्रयत्न न करितां घरीं रहातो.

**विवरणः**—आतां संन्यास करून गृहत्याग करणें जरी अत्यंत अवश्य आहे तरी शरीरादिकांच्या पारतंत्र्यामुळें संन्यास करावयास अशक्त असलेल्या विवेकी पुरुषाला गृहांत राहूनही मोक्षोपायाचें अनुष्ठान करितां यतें असें येथें आचार्य सांगतात. ज्याप्रमाणें आपल्या स्वतःच्या गांवाला जाण्याची इच्छा करणारा अतिथि मार्गामध्यें कांहीं काल विश्रांति घेण्याकरितां एकाद्या गृहामध्यें उतरला असतां तेथील सुखदुःखांनीं सुखी किंवा दुःखी न होतां मी या ठिकाणाहून आज किंवा उद्यां अवश्य जाणार आहें असा निश्चय करून असतो; त्याप्रमाणें एकादा गृहस्थ घरांत राहून सुद्धां सर्व विषयांविषयीं अहंता व ममता सोडल्यामुळें संसारविषयक कोणत्याही सुखदुःखांनीं सुखी किंवा दुःखी होत नाहीं. तरमग विषयांची प्राप्ति झाली असतां किंवा त्यांचा नाश झाला असतां तो कसा उदासीन रहातो हें पुढील श्लोकार्धांत सांगितलें आहे. ज्याप्रमाणें मेघसमूह यदृच्छेनें उत्पन्न होतो व लय

पावतो, त्याप्रमाणें देहादि सर्वही विषयजात जें अवश्य येणारें असेल तें येईल व जाणारें असेल तें जाईल असें जाणतो; व अन्वयव्यतिरेकानें ज्याला सर्व विषयांचें ज्ञान झालें आहे, तो विद्वान् पुरुष, सुखप्राप्तीकरितां किंवा दुःखपरिहाराकरितां कांहींच यत्न न करितां घरांत रहातो. सारांश स्वतःच्या देहाविषयीं अभिमान व तत्प्रयुक्त ममता सोडून जरी एकादा विद्वान् पुरुष शरीरादिकांच्या अशक्ततेमुळें यतिधर्माचा आश्रय न करितां घरांत राहिला तरी तो मोक्षमार्गापासून भ्रष्ट होत नाहीं.

शक्त्या निर्मोकतः स्वाद्बहिरहिरिव यः प्रव्रजन् स्वीयगेहा-
च्छायां मार्गद्रुमोत्थां पथिक इव मनाक् संश्रयेद्देह संस्थाम्॥
क्षुत्पर्याप्तं तरुभ्यः पतितफलमयं प्रार्थयेद्भैक्ष्यमन्नं ।
स्वात्मारामं प्रवेष्टुं स खलु सुखमयं प्रव्रजेद्देहतोपि ॥ १७ ॥

टीकाः—अथ प्रागुक्तां द्विविधां प्रव्रज्यां पृथगनुवदति— शक्त्येति यः पुरुषः शक्त्या वैराग्यबलेन स्वीयगेहात्सकाशात्सर्पो यथा बलेन निर्गच्छति कंचुकं त्यक्त्वा बहिर्याति तथा पुत्रकलत्रादिस्नेहानुबंधेन दुस्त्यजादपि स्वगृहाद्बलेन प्रव्रजति। तथा यः देहसंस्थां जीवनोपायं मनाक् संश्रयेत् । अनुष्ठानसिद्धिप्रयोजनमात्रमिति कृत्वा आहारादिकसंस्थां श्रयेत् । क इव मार्गद्रुमोत्थां छायां पथिक इव अग्रे गंतव्यमस्तीति द्रुमच्छायायां क्षणं विश्रमते न तु ममास्थां करोति । अथ देहधारणार्थं निर्वाहमाह—तरुभ्य इति । तरुभ्यः सकाशात्क्षुत्पर्याप्तं भैक्ष्यमन्नं प्रार्थयेत् न संग्रहबुद्ध्या। किंभूतमन्नं पतितफलमयं वातादिना पतितानि यानि फलानि तन्मयं न तु फलच्छेदनेन। अथ देहाभिमानमपि त्यजेदित्याह स पुरुषः सुखमयं सुखस्वरूपं स्वात्मारामं प्रवेष्टुं देहतोपि प्रव्रजेत् देहाभिमानशून्यस्सन्नेव देहतः प्रव्रजनमित्यर्थः ॥ १७ ॥

**अन्वयः—** अहिः स्वात् निर्मोकतः शक्त्या बहिः इव यः स्वीयगेहात् प्रव्रजन् मार्गद्रुमोत्थां छायां पथिक इव मनाक् देहसंस्थां संश्रयेत् । क्षुत्पर्याप्तं तरुभ्यः पतितफलमयं भैक्ष्यं अन्नं प्रार्थयेत् । सुखमयं स्वात्मारामं प्रवेष्टुं स खलु देहतः अपि प्रव्रजेत् ।

**अर्थः—ज्याप्रमाणें सर्प मोठ्या शक्तीनें आपल्या काते ( जीर्णत्वचे ) पासून बाहेर निघतो, त्याप्रमाणें पुरुषानें स्वतःच्या घरांतून मोठ्या प्रयत्नानें बाहेर पडून, ज्याप्रमाणें मार्गस्थ मार्गांतील वृक्षाचे छायेचा थोडावेळ आश्रय करितो, त्याप्रमाणें कांहीकाळ देहाचा आश्रय करावा. केवळ क्षुधा शांत**

**होण्यापुरतीं वृक्षावरून पडलेलीं फळें (हेंच उत्तम भिक्षान्न) ह्याच भैक्ष्य अन्नाची त्यानें प्रार्थना करावी. आणि (शेवटीं) अत्यंत आनंदमय असा जो स्वतःचा आत्मा त्यामध्यें प्रवेश करण्याकरितां देहापासूनही निघून जावें (देहाभिमान सोडावा.)**

**विवरणः**—आतां पूर्वी निर्दिष्ट केलेल्या दोन प्रकारच्या संन्यासाचा अनुवाद करितात. सर्प जसा आपली कात टाकतांना मोठ्या सामर्थ्यानें आपल्या जीर्णत्वचेंतून बाहेर निघतो, त्याप्रमाणेंच जो पुरुष, पुत्र कलत्र इत्यादिकांचे ठिकाणीं अनादिकालापासून प्रेम जडल्यानें त्यांचा त्याग करणें अत्यंत दुर्धट आहे तरी, मोठ्या धीरानें त्यांचा व स्वगृहाचा त्याग करून संन्यास करितो; ज्याप्रमाणें मार्गस्थ पुरुष मला अद्याप पुढें जावयाचें आहे असा विचार करून विश्रांतीकरितां क्षणभर त्या मार्गांतील वृक्षछायेचा आश्रय करितो, त्याप्रमाणें परमपुरुषार्थरूपी पुढील गांवाकडे मला जाणें आहे, इकडे लक्ष्य ठेऊन त्याच्या उपायांचें अनुष्ठान होण्याकरितां थोडा-वेळ ह्मणजे प्रारब्ध कर्माचा क्षय होईपर्यंत जो या शरीराचा आश्रय करितो; तसेंच परम पुरुषार्थाच्या उपायांचें अव्याहत अनुष्ठान व्हावें ह्मणून शरीररक्षण अत्यंत आवश्यक असल्यामुळें क्षुधाशांति होईल इतक्याच. वृक्षांवरून पडलेल्या फलरूपी भिक्षान्नाची अपेक्षा करितो ह्मणजे फलसंग्रहाची इच्छा न ठेवितां वाऱ्याच्या योगानें जीं फळें वृक्षावरून भूमीवर पडलेलीं असतील त्यांच्याच योगानें क्षुधाशांति करून घेतो व स्वतः आपल्या हातानें जो फलच्छेद करित नाहीं; त्यानें आनंदमय अशा आपल्या स्वतःच्या आत्मारामा-मध्यें प्रवेश करण्याकरितां ह्मणजे स्वस्वरूपाला मिळण्याकरितां गृहाप्रमाणें देहालाही सोडून निघून जावें. देहाच्या ठिकाणचा अभि-मान सर्वथैव सोडणें हाच देहसंन्यास होय.

कामो बुद्धावुदेति प्रथममिह मनस्युद्दिशत्यर्थजातं।
तद्गृह्णातींद्रियास्यैस्तदनधिगमतः क्रोध आविर्भवेच्च॥
प्राप्तावर्थस्य संरक्षणमतिरुदितो लोभ एतत्त्रयं स्या-
त्सर्वेषां पातहेतुस्तदिह मतिमता त्याज्यमध्यात्मयोगात्१८

टीका:--इदानीं कामक्रोधलोभाः सर्वेषां पातहेतवो भवंतीत्याह--काम इति । मूलभूतः कामोऽभिलाषः प्रथमं बुद्धावुदेति । ततो मनसि अर्थजातं पदार्थजातं रूपरसादि तन्मध्ये अमुकेन भवितव्यमिति उद्दिशति संकल्पविषयं करोति । ततस्तत्पदार्थजातं इंद्रियास्यैश्चक्षुरादींद्रियमुखैर्गृह्णाति ग्रहीतुं यतते । एवं कृतेऽपि यत्ने तदनधिगमतः तेषां अनधिगमः अनेकांतरायैरप्राप्तिस्तदा क्रोध आविर्भवति । "कामात्क्रोधोऽभिजायते" इति भगवद्वचनात् । अथ दैववशादर्थस्य प्राप्तौ नानोपायैस्तद्रक्षणार्थे या मतिः स्वीयत्वाभिमानः स एव लोभ उदितः । एवमेतत्त्रयं कामक्रोधलोभरूपं सर्वेषां जीवानां पातहेतुः सकलदुःखरूपसंसारकारणमित्यर्थः । तस्मादेतन्मतिमता पुरुषेण त्याज्यं । कुतः अध्यात्मयोगात् । बुद्धेः परतो वर्तमानं अध्यात्मं प्रत्यगात्मरूपं तस्य योगात् निरंतरानुसंधानरूपादध्यात्मयोगादित्यर्थः ॥ १८ ॥

**अन्वयः**—इह प्रथमं बुद्धौ कामः उदेति मनसि अर्थजातं उद्दिशति तत् इंद्रियास्यैः गृह्णाति तदनधिगमतः क्रोधः आविर्भवेत् च अर्थस्य प्राप्तौ या संरक्षणमतिः स एव लोभः उदितः एतत् त्रयं सर्वेषां पातहेतुः (स्यात्) तत् इह मतिमता अध्यात्मयोगात् त्याज्यं ।

**अर्थः**—या व्यवहारामध्यें प्रथमतः बुद्धींत कामना उत्पन्न होते. नंतर विषयजाताविषयीं मनामध्यें पुरुष कल्पना करितो. ते सर्वही विषय इंद्रियद्वारा अनुभवितो. पण त्यांची प्राप्ति न झाल्यानें क्रोध उत्पन्न होतो. विषयांची प्राप्ति झाली असतां त्यांच्या संरक्षणाविषयींची जी बुद्धि तोच लोभ उत्पन्न झाला ( आहे असें समजावें. सारांश ) हे तिन्ही दोष सर्वांच्या अधःपाताला कारण होतात. ह्मणून बुद्धिमान् पुरुषानें आत्म्याकडे लक्ष्य ठेऊन त्यांचा त्याग करावा.

**विवरण:**—आतां ह्या अठराव्या श्लोकांत काम, क्रोध आणि लोभ हे तीन दोष सर्व प्राण्यांना पतित करण्यास कारण होतात असें सांगितलें आहे. प्रथमतः बुद्धीमध्यें अभिलाष उत्पन्न होतो. त्यामुळें मनामध्यें रूपरसादि विषयांचें चिंतन होतें. तदनंतर आपल्याला अमुक विषयाची प्राप्ति व्हावी असा विषयाविषयीं प्राणी संकल्प करितो. नंतर चक्षुरादिक इंद्रियांच्या द्वारा त्या त्या विषयांचें ग्रहण करण्याचा तो प्रयत्न करितो. ह्याप्रमाणें प्रयत्न करूनही मध्यें अनेक विघ्नें आल्यानें विषयांची प्राप्ति न झाल्यास बुद्धीमध्यें क्रोधाचा प्रादुर्भाव होतो. भगवंताचेंही " कामात्क्रोधोभिजायते " असें वाक्य आहे. दैववशात् विषयांची प्राप्ति झाली असतां हा

माझा विषय आहे; याचा माझा कधींही वियोग होऊं नये अशी किंवा त्याच्या रक्षणाविषयींची जी बुद्धि, तिलाच लोभ ह्मणतात. ह्याप्रमाणें काम, क्रोध, व लोभ हे तीन दोष सर्वही प्राण्यांना अधोगतीला नेण्याला व दुःखरूप संसार देण्याला कारण होतात. ह्मणून बुद्धिवान् पुरुषानें बुद्धीच्याही पलीकडे असलेल्या आत्म्याकडे अनुसंधान ठेऊन ह्मणजे मनाचा सर्वही ओघ निरंतर आत्मचिंतनाकडे लावून या दोषांचा त्याग करावा.

दानं ब्रह्मार्पणं यत्क्रियत इह नृभिः स्यात्क्षमाक्रोधसंज्ञा।
श्रद्धास्तिक्यं च सत्यं सदिति परमतः सेतुसंज्ञं चतुष्कम्॥
तत्स्याद्बंधाय जंतोरिति चतुर इमान् दानपूर्वैश्चतुर्भि-
स्तीर्त्वा श्रेयोमृतं च श्रयत इह नरः स्वर्गतिं ज्योतिराप्तिम्

टीका:--एवं कामक्रोधादिद्वन्द्वानिबर्हणेन देवत्वप्राप्तिरित्येतस्मिन्नर्थे सामवेदोक्तं कल्मषापहारं संवादयन्नाह -दानमिति । नृभिर्मनुष्यैर्ब्रह्मार्पणं यत्क्रियते तद्दानमिति प्रोक्तं । तथा या अक्रोधसंज्ञा सा क्षमा प्रोक्ता । तथा आस्तिक्यं अस्त्येवानेन प्रयोजनमिति विश्वासरूपिणी बुद्धिः श्रद्धेत्युच्यते । तथा सत्यं सदिति अस्मीति चतुष्टयं मुक्तेः साधनं । अतः एभ्यः परमन्यद्विरुद्धस्वरूपं चतुष्कं सेतुसंज्ञं भवति । अदानं क्रोधः अश्रद्धा असत्यमिति यत्सेतुचतुष्टयं तज्जंतोः प्राणिनः बंधाय भवति । तस्मात्कारणादिमान् पूर्वोक्तान् चतुरः सेतून् दानपूर्वैश्चतुर्भिस्तीर्त्वा उल्लंघ्य नरः पुरुषार्थी श्रेयः अमृतं स्वर्गतिं ज्योतिराप्तिं च श्रयते प्राप्नोति । श्रेयः मुक्तिनिरतिशयं अमृतं देवत्वं स्वर्गतिं ऊर्ध्वगतिं ज्योतिराप्तिं च प्राप्नोतीत्यर्थः । अत्र श्रुति--"हाउ ३ सेतूंस्तर दुस्तरान् ३ दानेनादानं हाउ३ अहमस्मि प्रथमजा ऋतास्या३ हाउ३ सेतूंस्तर दुस्तरान् ३ अक्रोधेन क्रोधं हाउ३ पूर्वं देवेभ्यो अमृतस्य नाभाइ३ सेतूंस्तर दुस्तरान् हाउ३ श्रद्धया अश्रद्धां हाउ३ यो मा ददाति स इदेव मावाहाहाउ३ सेतूंस्तर दुस्तरान्३ सत्येनानृतं हाउ३ अहमन्नमहमन्नमदन्तमाद्मि३ हाउ३ वाऽऽशायतिः एतद्धमृतं स्वर्गस्य ज्योतिर्गच्छ सेतूंस्तीर्त्वा चतुराह" ॥ १९ ॥

**अन्वयः—**इह नृभिः यत् ब्रह्मार्पणं क्रियते तत् दानं । या अक्रोधसंज्ञा सा क्षमा । यत् आस्तिक्यं सा श्रद्धा । यत् सत् तत् सत्यं इति प्रोक्तं । अतः परं चतुष्कं सेतुसंज्ञ ( भवति ) तत् जंतोः बंधाय स्यात् (इति हेतोः) इमान् चतुरः दानपूर्वैः चतुर्भिः तीर्त्वा इह नरः श्रेयः अमृतं स्वर्गतिं ज्योतिराप्तिं च श्रयते.

**अर्थः—या मृत्युलोकांत मनुष्यें जें ब्रह्मार्पण करितात त्याला दान, अक्रोध ही संज्ञा ज्याला आहे तिला क्षमा आस्तिक्य**

**ह्मणजे विश्वास त्याला श्रद्धा, त्याचप्रमाणें सत् संज्ञक जें ब्रह्म त्याला सत्य, असें ह्मणतात. ( हीं चार मुक्तींचीं साधनें आहेत. ) ह्यांच्याहून विरुद्ध असलेलीं जीं अदानादिक चार त्यांना सेतु अशी संज्ञा आहे. तीं सर्व प्राण्यांना बंध उत्पन्न करितात. यास्तव ह्या चार सेतूंचें दानादि चार साधनांनीं उल्लंघन करून पुरुष, मोक्ष, देवत्व, उर्ध्वगति, व सूर्यचंद्रादि ज्योतींची प्राप्ति करून घेतो.**

**विवरण:**–ह्याप्रमाणें कामक्रोधादि दैत्यांचा नाश करून देवत्वप्राप्ति करून घ्यावी. ह्याविषयीं सामवेदांतील कल्माषसामाचा अनुवाद करून आचार्य ह्मणतात–पुरुष ह्या व्यवहारामध्यें ईश्वराला उद्देशून जो द्रव्याचा व्यय करितात, त्याला दान अशी संज्ञा आहे. तसेंच दुसऱ्या प्राण्यांनीं आपणाला कितीही त्रास दिला तरी त्यांच्यावर न रागावणें याला क्षमा असें ह्मणतात. तसेंच श्रुति स्मृति आणि आचार्य यांनीं सांगितलेल्या अनुष्ठानाचें अवश्य फल मिळणार, असा विश्वास ठेवणें याला श्रद्धा असें ह्मणतात. आणि सत् संज्ञक ब्रह्माला सत्य असें नांव आहे. हीं चार मुक्तींचीं साधनें आहेत. ह्यांच्या विरुद्ध असलेल्या अदान, क्रोध, अश्रद्धा आणि असत्य ह्या चतुष्टयाला सेतु असें नांव आहे. हें सेतुचतुष्टय प्रत्येक प्राण्याला बंध उत्पन्न करितें. या कारणास्तव ह्या चार अदानादिक सेतूंचें दानादिक चार मोक्षसाधनांनीं उल्लंघन करून पुरुषार्थ प्राप्तीची इच्छा करणारा पुरुष, मोक्ष, स्वर्गलोक, देवत्व ( ऊर्ध्वगति ) आणि चंद्रसूर्यादिक ज्योति, यांची प्राप्ति करून घेतो. परमपूज्य श्रीमच्छंकराचार्यांनीं " हाउ३ सेतूंस्तर दुस्तरान् ३ दानेनादानं हाउ ३" इत्यादि सामवेदोक्त श्रुतीला अनुलक्षून हा श्लोक लिहिला आहे. त्या श्रुतीचें सर्वही तात्पर्य या श्लोकांत आलें असल्यामुळें ती श्रुति व भाष्य यांचें तात्पर्य विस्तारभयास्तव पुनः दिलें नाहीं. ज्याप्रमाणें सेतु पाण्याच्या प्रवाहाला प्रतिबंध करितो, त्याप्रमाणें हे अदानादिक चार सेतु, अखंडैकरसब्रह्मज्ञानाला प्रतिबंध करितात. यास्तव, ह्या दुस्तर सेतूंचें मोठ्या धैर्यानें उल्लंघन करून पुरुषार्थप्राप्ति करून घ्यावी. भगवंतांच्या "यत्करोषि यदश्नासि०" इत्यादि ह्मणजे जें करतोस जें

खातोस किंवा जेवढी जेवढी म्हणून क्रिया करितोस तेवढी सर्वेही मला अर्पण कर. ह्या वचनाप्रमाणें प्रत्येक पुरुषानें वर्तन केलें असतां अदानादिक सेतूंचें सहजच उल्लंघन होईल.

**अन्नं देवातिथिभ्योर्पितममृतमिदं चान्यथा मोघमन्नं ।**
**यश्चात्मार्थं विधत्ते तदिह निगदितं मृत्युरूपं हि तस्य॥**
**लोकेसौ केवलाघो भवति तनुभृतां केवलादी च यः स्या-**
**त्त्यक्त्वा प्राणाग्निहोत्रं विधिवदनुदिनं योऽश्नुतेसोपि मर्त्यः**

टीकाः—अन्नमिति। अन्नं देवातिथिभ्योर्पितं अन्नं तदमृतं भवति देवेभ्यो वैश्वदेवकर्मणि अतिथिभ्यश्च वैश्वदेवांते समागतेभ्यः अर्पितं यदन्नं तदमृतं भवति इत्यर्थः। अन्यथा एतदकरणे देवतातिथिवंचनेन मोघं निष्फलं अन्नं भवति। यश्च आत्मार्थं पिंडपोषणार्थं अन्नं विधत्ते तत्तस्य मृत्युरूपं परिणामे विषोपमं भवति असाक्षित्वात्। एवं यः पुमान् केवलं अश्नाति केवलादी केवलाघो भवति केवलं अघरूपो भवतीत्यर्थः । अत्र श्रुतिः-"मोघमन्नं विंदते अप्रचेताः सत्यं ब्रवीमि वध इत्स तस्य । नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी" ॥ २० ॥

अन्वयः—देवातिथिभ्यः अर्पितं इदं अन्नं अमृतं ( भवति ) च अन्यथा मोघं अन्नं (भवति) यश्च आत्मार्थं विधत्ते तत् तस्य मृत्युरूपं निगदितं । लोके यः केवलादी स्यात् असौ तनुभृतां केवलाघः (भवति) च विधिवत् प्राणाग्निहोत्रं त्यक्त्वा अनुदिनं यः अश्नुते सः अपि मर्त्यः ।

अर्थः—देव किंवा अतिथि यांना अर्पण केलेलें अन्न अमृत होतें. आणि तद्विपरीत अन्न निर्फळ होतें. जो केवळ आपल्या स्वतःकरितां अन्न करितो, तें अन्न त्याच्या मृत्यूसारखें सांगितलें आहे. जो पुरुष ह्या जगामध्यें केवळ स्वतःचें उदर भरणारा असतो त्याला सर्व प्राण्यांमध्यें मूर्तिमंत पापाचा पुतळा असें म्हणतात. तसेंच शास्त्रोक्त प्राणाग्निहोत्रादि कर्में न करितां जो प्रतिदिवशीं भोजन करितो तोही मरणाराच असतो.

विवरणः—गृहस्थाश्रमाला अवश्य असलेले पंचमहायज्ञ न करितां "ये पचंत्यात्मकारणात्" या भगवद्वचनाप्रमाणें जे स्वतः-करितां अन्न शिजवितात ते पापपुरुष होत असें येथें सांगितलें आहे. वैश्वदेवादिक कर्में करून अतिथिपूजन करून देवांना व

प्राप्त झालेल्या अतिथींना अन्नसमर्पणानें तृप्त करून नंतर अवशिष्ट राहिलेलें अमृतसंज्ञक अन्न प्रत्येक गृहस्थानें भक्षण करावें अशी शास्त्रमर्यादा आहे. पण असें न करितां ह्य० " देवान् भावयतानेन० ह्या देवांपासून प्राप्त झालेल्या पदार्थांनीं देवांची वृद्धि करा " इत्यादि भगवद्वचनाप्रमाणें देवतासंतर्पण न करितां, देव व अतिथि यांना फसवून ठेविलेलें जें अन्न तें निर्फल होय. पुनः जो पुरुष केवल आपलाच पिंड पुष्ट करण्याकरितां अन्न शिजवितो, तें अन्न तर त्याच्या मृत्यूप्रमाणें होय. कारण त्या अन्नाचा दुसरे कोणासही उपयोग न झाल्यामुळें परिणामीं तें अन्न विषासारखें होत असतें. जो पुरुष स्वतः एकटाच भक्षण करीत असतो त्याला केवल पापराशी असें म्हणतात. तसेंच जो पुरुष शास्त्रोक्त पंचमहायज्ञ अग्निहोत्र इत्यादि नित्यकर्मे न करितां प्रतिदिनीं भोजन करितो तोही एक दिवस मरणाराच असतो. भगवंतांनींही " अघायुरिंद्रियारामो मोघं पार्थ स जीवति । म्हणजे तो इंद्रियतर्पक पापी पुरुष व्यर्थ ह्या जगांत जिवंत रहातो " असें म्हटलें आहे. ह्या श्लोकांत आचार्यांनीं " मर्त्य " हा शब्द सहेतुक योजिला आहे. कारण अग्निहोत्रादिक कर्मे, ह्या देहाचा त्याग केल्यानंतर उत्तम लोकप्राप्ति करून देत असतात. पण त्याकरितां दुसऱ्या कोणाला अन्न न देतां स्वतःचेंच उदर जो भरतो तो तरी शेवटीं मरतोच. सारांश शास्त्रविहित अन्नदान न करितां स्वदेह पुष्ट केल्यानें तरी तो अजरामर होतो असें नाहीं.

लोके भोजः स एवार्पयति गृहगतायार्थिनेन्नं कृशाय
यस्तस्मै पूर्णमन्नं भवति मखविधौ जायतेजातशत्रुः ॥
सख्ये नाऽन्नार्थिने योर्पयति न स सखा सेवमानाय नित्यं
संसक्तायान्नमस्माद्विमुख इव परावृत्तिमिच्छेत्कदर्यात् २१

टीकाः—लोके भोज इति । लोके स एव भोजो दाता यः गृहगतायार्थिने अन्नं अर्पयति । किंभूताय कृशाय दरिद्रपीडिताय । अथ तस्य फलमाह—तस्मै दात्रे मखविधौ लौकिके अलौकिके वा यज्ञे अन्नं पूर्णं भवति । तथा अयं दाता अजातशत्रुर्भवति यस्मादन्नदानेन सर्वभूतांतरस्थाः सर्वे देवाः संतृप्ताः भवंति अतो वैरिणोऽपि मित्राणि भवंतीत्यर्थः । अथ व्यतिरेकमप्याह

—सख्य इति यः पुरुषः अन्नार्थिने सख्ये सखिभूताय स्वर्गप्रापकाय नार्पयति स सखा न भवति । किंतु पिशुन एवेत्यर्थः किंभूताय नित्यं सेवमानाय आश्रिताय तथा संसक्ताय अनन्यशरणाय अनेन सर्वभूतेष्वपि अन्नदानं न करोतीत्युक्तं भवति । अथ याचकोऽपि अस्मात् कदर्यात् कृपणात् विमुख इव पराङ्मुख इव परावृत्तिं इच्छेत् पुनस्तं न याचयेत् अन्यं दातारं गच्छेदित्यर्थः । श्रुतिरपि-"स इद्भोजोयोगृहवेददात्यन्नकामायचरतेकृशाय । अरमस्मैभवतियामहूताउतापरीषुकृणुतेसखायम ॥ नससखायोनददाति-सख्येसचाभुवेसचमानायपित्वः । अपास्मात्प्रेयान्नतदोको अस्तिपृणंतमन्य-मरणंचिदिच्छेत् " ॥

**अन्वयः**--यःकृशाय गृहगताय अर्थिने अन्नं अर्पयति स लोके भोज एव। तस्मै मखविधौ पूर्णं अन्नं भवति अजातशत्रुः ( च ) जायते । नित्यं संसक्ताय सेवमानाय सख्ये अन्नार्थिने यः अन्नं न अर्पयति स न सखा । अस्मात् कदर्यात् विमुखः इव परावृत्तिं इच्छेत् ।

**अर्थः**—जो पुरुष, कृश होऊन अन्नाकरितां आपल्या घरीं आलेल्या याचकाला अन्न देतो तो भोज ( होय ). त्याला यज्ञामध्यें अन्नाची कधीं उणीव पडत नाहीं. व तो अजातशत्रु होतो. ( ह्मणजे त्याला कोणी शत्रुही उत्पन्न होत नाहीं. ) तसेंच जो सर्वदा आपल्या आश्रयानें रहाणाऱ्या, सेवा करणाऱ्या व अन्नाची याचना करणाऱ्या मित्राला अन्न देत नाहीं तो त्याचा सखा नव्हे. अशा कृपणापासून याचक विन्मुख झाल्याप्रमाणें दुसऱ्या दात्याकडे जाण्याची इच्छा करितो.

**विवरणः**—आपल्याकडे कोणीही याचक आला असतां त्याची इच्छा पूर्ण करणारा भोज होय असें "सइद्भोजो यो गृहवे ददात्यन्नं" इत्यादि श्रुतीच्या आधारानें सांगतात. जो, दारिद्र्यानें अत्यंत कृश होऊन याचना करण्याकरितां आपल्या घरीं आलेल्या पुरुषाला शरीर स्वास्थ्याकरितां अत्यंत अवश्य असलेलें, अन्न देतो, तो ह्या जगामध्यें खरा भोज ( अन्नदाता ) होय. त्याला यज्ञादिक कृत्यांमध्यें कधींही अन्नाची तूट पडत नाहीं. वस्तुतः यज्ञादिक कृत्यांमध्यें अन्नाचा पुरवठा होणें अत्यंत अशक्य असतें. कारण त्यावेळीं कितीही जरी याचक आले तरी विन्मुख होऊं न देतां मिष्टान्न संतर्पणानें यजमानानें त्यांना तृप्त करावें असें विधान आहे. पण अशा प्रसंगींही दात्या पुरुषाला अन्नाची उणीव पडत नाहीं. तसेंच हा दाता सर्वही प्राण्यांना यथेच्छ अन्नदान करून त्यांच्या ठिकाणच्या देवतांना

तृप्त करित असल्यामुळें त्याला कधींच कोणी शत्रु उत्पन्न होत नाहीं. ह्या व्यवहारांत सुद्धां जो कधीं कोणाचा द्वेष किंवा हेवा करित नाहीं त्याचे पुष्कळ मित्र असतात असा अनुभव आहे. आतां याच्या उलट प्रकार कसा होतो हें दाखवितात. जो पुरुष अन्नाची इच्छा करून सतत सेवा करण्याकरितां आपला आश्रय करून राहिलेल्या आपल्या मित्राला अन्न देत नाहीं तो जगांत कोणाचाही मित्र होत नाहीं. तर तो पिशुन होतो. सारांश आपली सेवा करून केवळ आपल्यावरच अवलंबून राहिलेल्या दरिद्री मनुष्याला जो अन्न देत नाहीं, तो इतरांना काय देणार ? या श्लोकामध्यें अर्थी पुरुषाला उद्देशून('सख्ये') असें पद घातलें आहे. त्याचा हेतु असा कीं अर्थी पुरुष दात्याला स्वर्ग देत असतो ( म्हणजे उत्तम पदप्राप्ति करून देतो ) म्हणून तो मित्र होय. पण ह्या कृपण पुरुषापासून इच्छा पूर्ण न झाल्यामुळें याचक विन्मुख होऊन आपलें दुष्कृत त्याला देऊन व त्याचें सुकृत घेऊंन दुसऱ्या दात्याकडे याचनेस्तव जातो.

"अतिथिर्यस्य भग्नाशो गृहात्प्रतिनिवर्तते
स तस्मै दुष्कृतं दत्वा पुण्यमादाय गच्छति"

असें मनुवचनही आहे.

स्वाज्ञानज्ञानहेतू जगदुदयलयौ सर्वसाधारणौ स्तो ।
जीवेष्वास्वर्णगर्भं श्रुतय इति जगुर्हूयते स्वप्रबोधे ॥
विश्वं ब्रह्मण्यबोधे जगति पुनरिदं हूयते ब्रह्म तद्व-
च्छुक्तौ रौप्यं च रौप्येधिकरणमथवा हूयतेन्योन्यमोहात् ॥

टीकाः—स्वाज्ञानज्ञानहेतु इति । जगदुदयलयौ स्वाज्ञानज्ञानहेतू स्तः । जगतः नामरूपात्मकस्य चराचरस्योदयः प्रादुर्भावः लयश्च प्रलयः एतौ स्वस्याज्ञानं च ज्ञानं च स्वाज्ञानज्ञाने त एव हेतवः कारणं ययोस्तौ । स्वशब्देनात्मा तथा च आत्माज्ञानाज्जगत्प्रादुर्भावः । तथा आत्मज्ञानाज्जगत्प्रलय इत्यर्थः । एतौ आस्वर्णगर्भं हिरण्यगर्भं मर्यादीकृत्य सर्वजीवेषु साधारणौ । हिरण्यगर्भोपि स्वस्वरूपं विस्मृत्याहमीश्वरो नियंतेत्यभिमानं वहति तदा प्रादुर्भूतं विश्वाभासं पश्यति । अथ यदा ब्रह्माहमस्मीति स्वरूपे लीनो भवति तदा विश्वाभासविलयः इति श्रुतयो जगुः । एवमेव जीवेष्वपि इति प्रकटयन्नाह—हूयत इति । स्वप्रबोधे ब्रह्माकारांतःकरणवृत्तौ जातायां

विश्वं ब्रह्मणि हूयते भ्रमावाहुतिप्रक्षेपवत् भस्मसात्क्रियते तदा देहाभिमानित्वा-भावात्। अबोधे देहाभिमानित्वात् अहमाकारा इदमाकारा चांतःकरणवृत्तिस्तदा इदं ब्रह्म जगति हूयते नास्त्येवेति क्रियते। तत्र दृष्टांतमाह—यद्वदिति। भ्रमनिवृत्तिकाले शुक्तौ रौप्यं हूयते। तथा प्रतिभासकाले तु अधिकरणं शुक्तिः रौप्ये हूयते कस्मादन्योन्यमोहात् शुक्त्यज्ञाने रजतोद्भवः रजताज्ञाने च शुक्तिरित्यर्थः॥ २२॥

**अन्वयः**—आस्वर्णगर्भं जीवेषु स्वाज्ञानज्ञानहेतू जगदुदयलयौ सर्व-साधारणौ स्तः इति श्रुतयः जगुः। यद्वत् च शुक्तौ रौप्यं अथवा रौप्ये अधि-करणं अन्योन्यमोहात् हूयते तद्वत् स्वप्रबोधे विश्वं ब्रह्मणि हूयते। अबोधे पुनः इदं ब्रह्म जगति हूयते।

अर्थः—हिरण्यगर्भापासून सर्वही जीवांचे ठिकाणीं, स्वतःचें अज्ञान व ज्ञान यांच्या योगानें होणारे जगाचे उदय आणि प्रलय सर्वसाधारण आहेत; असें श्रुति प्रतिपादन करितात. ज्याप्रमाणें एकमेकांविषयीं मोह पडल्यानें शुक्तीच्या ठिकाणीं रौप्य अथवा रौप्याच्या ठिकाणीं अधिकरणभूत शुक्ति यांचा लय होतो, त्याप्रमाणें आत्मज्ञान झालें असतां विश्व ब्रह्माचे ठिकाणीं लीन होतें व पुनः स्वतःचें ज्ञान नष्ट होतें त्यावेळीं हें ब्रह्म जगामध्यें लोपून जातें.

**विवरणः**—जगाची व्यक्तावस्था व अव्यक्तावस्था म्हणजेच उत्पत्ति व प्रलय होत; व ते स्वतःचें अज्ञान व ज्ञान यांच्या द्वारा होत असतात. असें ह्या श्लोकांत आचार्यांनीं व्यक्त केलें आहे. आब्रह्मस्तंभपर्यंत सर्वही जीवांना आत्म्याचें ज्ञान व आत्म्याचें अज्ञान ह्या दोन कारणांनीं अवश्य होणारे जगाचे उदय व प्रलय, सर्वसाधारण आहेत; असें श्रुति प्रतिपादन करितात. आत्म-ज्ञानाचे योगानें जगाचा लय व आत्म्याचे अज्ञानानें त्याचा उदय होत असतो. हिरण्यगर्भमुद्धां स्वतःचें स्वरूप विसरून जाऊन मी ईश्वर आहें; मी ह्या अखिल सृष्टीचा नियंता आहें; असा अभिमान वहातो; व त्यावेळीं हें सर्व जग उत्पन्न झालें आहे असें तो पहातो. तसेंच ज्या वेळीं मी नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव ब्रह्म आहें अशा ज्ञानानें स्वतःच्या स्वरूपामध्यें तो लीन होतो, त्या वेळीं ह्या सर्व विश्वाच्या आभासाचाही लय होतो. म्हणजे ज्या वेळीं जीव बहिर्दृष्टि होतो त्या वेळीं त्याला जगाचा अनुभव येत असल्यामुळें त्याचा

उदय होतो; व ज्यावेळीं जीव अंतर्दृष्टि होतो त्यावेळीं त्याला जगाचा अनुभव येत नसल्यामुळें त्याचा लय होतो असें म्हणतात. असे हे जगाचे उदय व प्रलय सर्व जीवांचे ठिकाणीं समानच आहेत. ज्याप्रमाणें शिंपी व रुपें ह्यांपैकीं एकाचेंही यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें शिंपीच्या ठिकाणीं रुप्याचा भास होतो; व त्यावेळीं रुप्यामध्यें शिंपीचा लय होतो; पण भ्रमनिवृत्ति झाली असतां भ्रमाला कारण होणाऱ्या शिंपीचें ज्ञान झाल्यानें पूर्वीं भासलेल्या रुप्याचा त्या शिंपींत लय होतो. म्हणजे शुक्तीच्या अज्ञानानें रजताचा उदय व तिच्याच ज्ञानानें रजताचा नाश होतो. त्याचप्रमाणें आत्म्याचें ज्ञान झालें असतां ब्रह्माच्या ठिकाणीं विश्वाचा लय होतो; व आत्म्याच्या विस्मृतीनें तेंच अधिष्ठानभूत ब्रह्म जगामध्यें लोपून जातें.

तुच्छत्वान्नासदासीद्गगनकुसुमवद्भेदकं नो सदासीत् ।
किंत्वाभ्यामन्यदासीद्व्यवहृतिगतिसन्नास लोकस्तदानीम्
किंत्वर्वागेवशुक्तौ रजतवदपरो नो विराड् व्योमपूर्वः
शर्मण्यात्मन्यथैतत्कुहकसलिलवत्किं भवेदावरीवः ॥२३॥

टीकाः — ननु नामरूपात्मकस्य दृश्यमानस्य जगतः उपादानकारणं किं स्यादिति विचार्यमाणे न तावच्छुद्धस्यानीहस्य ब्रह्मणस्तथात्वमुपपद्यते अथ तदतिरिक्तस्य तथात्वकल्पने किमसद्वा सद्वा कल्पनीयं तत्राद्यं निषेधति—तुच्छत्वादिति । तत्र तावज्जगदुपादानकारणं असन्नासीत् कुतः तस्यासतो गगनकुसुमवत्तुच्छत्वात् । अत्यंतासत्त्वेन उपादानकारणानर्हत्वात् । अथ नापि भेदकं सद्वाच्यं परमार्थतो ब्रह्मणः सकाशात् अन्यस्य भेदजनकस्यासंभवात् । अतः परिशेषात् सदसद्विलक्षणमासीदित्याह—किंत्विति । आभ्यां सदसद्भ्यां अन्यत् विलक्षणं आसीदित्युक्तं भवति । ननु तर्हि ब्रह्मातिरिक्तं परमार्थसन्मास्तु तथापि व्यवहारसदासीदेवेति चेत्तदपि निषेधति—व्यवहृतीति । तदानीं व्यवहारस्याप्यभावादित्यर्थः । तदानीमिति पदेन सृष्टेः प्राङ्नासीत् किंतु परिशेषात् मध्य एवोत्पन्न इत्युक्तं भवति । ननु तदानीमाकारवन्नास्ति तथापि व्योमासीत्तथा महाभूतारब्धो विराडप्यासीत् इति चेत् तदपि निषेधति—नो विराट् व्योमपूर्व इति । व्योम पूर्वं कारणीभूतं यस्य स तथा । अथास्तां मध्य एवोत्पन्नं तस्य पृथग्भूतत्वेन ब्रह्मण आवरकत्वं भवेत्तदपि दृष्टांतेन निषेधति—शर्मणि शुद्धे ब्रह्मणि तत्किमावरीवः आवृणोतीत्यावरीवः आवरकं न भवेदित्यर्थः । किंवत् कुहकसलिलवत् मायया स्थले जलभ्रममुत्पादयतः कुहकस्यैंद्रजालिकस्य क्षणमुत्पन्नं सलिलं भ्रमनिवृत्तौ सत्यां किं स्थलस्यावरणं भवेत् नैव । तद्वत् प्रकृतेपीत्यर्थः ॥ २३ ॥

**अन्वयः**—गगनकुसुमवत् तुच्छत्वात् असत् न आसीत् भेदकं ( च ) सत् नो आसीत् किंतु आभ्यां अन्यत् आसीत् । तदानीं लोकः व्यवहृतिगतिसन् न आस । किंतु शुक्तौ रजतवत् अर्वाक् एव । अपरः व्योमपूर्वः विराट् नो । अथ शर्मणि आत्मनि कुहकसलिलवत् आवरीवः भवेत् किं ( नेत्यर्थः )

**अर्थः—( सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी ) आकाशांतील पुष्पाप्रमाणें तुच्छ असणारें असत् नव्हतें व भेद करणारें सत्‌ही नव्हतें. पण ह्या दोघांहूनही अन्य असें होतें. व्यावहारिक सत् सुद्धां त्या काळीं नव्हतें. आकाश व त्याचें कार्य विराट्, ह्यांतीलही कांहीं नव्हतें. परंतु शिंपेच्या निमित्तानें तिच्या ठिकाणीं जसें रुपें भासावें, तसें हें सृष्टीनंतर ( सर्व भासत आहे.) मृगजलाप्रमाणें शुद्ध ब्रह्माला हें जग झांकील काय ? ( कधींही नाहीं. )**

**विवरणः**—ह्या नामरूपात्मक व प्रत्यक्ष दिसणाऱ्या जगाचें उपादान कारण काय असावें ? असा विचार करूं लागलें असतां शुद्ध व निष्क्रिय ब्रह्म कधींही जगाचें कारण होणार नाहीं; असें वाटतें. आतां ब्रह्माहून अन्य असें कांहीं जगाचें कारण असावें अशी कल्पना केल्यास तें सत् ( भूत भविष्य वर्तमान कालीं राहणारें, ) किंवा असत् ( कांहीं काल भासणारें ) आहे; अशी शंका येते. यास्तव त्याचा निर्णय या श्लोकांत केला आहे. ज्या द्रव्याचें कार्य झालेलें असतें, तें द्रव्य त्या कार्याचें उपादान कारण होय. मातीचा घट माती ह्या द्रव्यानें बनविलेला असतो; ह्मणून ती घटाचें उपादान कारण होय. तसेंच ह्या जगाचें उपादान कारण काय असावें ? आकाशाच्या पुष्पाप्रमाणें किंवा मनुष्याच्या शिंगाप्रमाणें कधींही नसणारें असत् ( ह्मणजे शून्य ) सद्रूपानें भासणाऱ्या जगाचें कारण होऊं शकणार नाहीं. बरें सत् असें कांहीं जगाचें कारण ह्मणावें तर, सद्रूप असा एक नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव परमात्माच आहे; अन्य कांहींही सत् नाहीं, असा श्रुतिसिद्धान्त आहे; व जगाचें कारणही सत् आहे असें मानल्यास तें सत् ब्रह्मस्वरूपामध्यें भेद पाडील. ह्मणजे श्रुतिविरुद्ध शुद्ध ब्रह्माहून पृथक् असें एक निराळेंच जगाचें कारण सत् आहे असें होऊं लागेल. पण तें इष्ट नाहीं. ह्मणून ब्रह्मस्वरूपांत भेद पाडणारें सत्‌ही जगाचें कारण नव्हे. तर सत् व असत् ह्यांहून विलक्षण असें जगाचें कारण आहे. कार्याच्या

पूर्वी कारण असतें; हें सुचविण्याकरितां श्लोकामध्यें 'आसीत्' इत्यादि भूतकालिक क्रियापदें योजून जगाचें पूर्वरूप ( कारण ) सदसत्पेक्षां विलक्षण होतें असें प्रतिपादन केलें आहे. पारमार्थिक सत् जरी पुर्वी नसलें, तरि व्यावहारिक सत् तरी तेव्हां असेल असें कोणी ह्मणतील; ह्मणून व्यावहारिक सत्ही जगाच्या उत्पत्तीपूर्वी नव्हतें, ह्मणजे त्याकालीं ( सृष्टीच्या पूर्वी ) व्यवहार नव्हता, व तो ह्या स्थित्यवस्थेमध्येंच आहे असें आचार्य 'व्यवहृतिगति०' इत्यादि पदांनीं सांगतात. आतां यावर—जरी कदाचित् साकार असें त्यावेळीं कांहीं नव्हतें तरी, निराकार आकाश व आकाशादि भूतांपासून होणारा विराट् तरी असेल—अशी तार्किक शंका घेतील; म्हणून आकाश. विराट् इत्यादि कांहीं नव्हतें असें अनेक श्रुतींना अनुसरून आचार्यांनीं येथें सांगून ठाविलें आहे. पुनः यावर कोणी—पूर्वी नसून हें जग मध्यें कां उत्पन्न झालेलें असेना पण तें शुद्ध ब्रह्माहून पृथक् असल्यामुळें त्या ब्रह्माला आच्छादित तरि करील. ह्म० त्याचें ज्ञान होऊं देणार नाहीं—असें ह्मणेल ह्मणून, चवथ्या चरणांत त्याचाही निषेध केला आहे. ज्याप्रमाणें मारवाडांतील भूमीवर भ्रमानें जलाचा भास होतो पण तो भ्रम नष्ट झाल्यावर त्या भूमीला तें भासणारें जल आच्छादित करित नाहीं, त्याप्रमाणें शुद्ध ब्रह्मालाही हें मायेनें कांहीं काल भासणारें जग आवृत करूं शकत नाहीं.

बंधो जन्मात्ययात्मा यदि न पुनरभूत्तर्हि मोक्षोपि नासी-
द्यद्वद्रात्रिर्दिनं वा न भवति तरणौ किंतु दृग्दोष एषः ॥
अप्राणं शुद्धमेकं समभवदथ तन्मायया कर्तृसंज्ञं ।
तस्मादन्यच्च नासीत्परिवृतमजया जीवभूतं तदेव ॥ २४ ॥

टीकाः—अथ वस्तुतो ब्रह्मरूपाणामेव जीवानां बंधमोक्षावप्यज्ञानकृतावित्याह—बंध इति । पुनर्जन्मात्ययात्मा जन्ममृत्युरूपो यदि बंधो नाभूत् तर्हि मोक्षोपि नासीत् । तदुक्तम्—'बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न वस्तुतः" । तर्ह्यद्वितीयस्याभावात्को बद्धः कथं मुच्यत इति । अत्र दृष्टांतमाह—यद्वदिति । तरणौ सूर्ये रात्रिर्दिनं वा न भवति न युज्यते । कथं तर्हि रात्रिदिनव्यवहारो भवतीत्याह—एष दृग्दोषः जगच्चक्षुषां सूर्यादर्शनदर्शनमेव रात्रिदिन-

व्यवहारनिमित्तमापेक्षिकमित्यर्थः । अथ जीवस्योपाधिनिमित्तमाह—अप्राण-मिति । अप्राणः अमनाः शुभ्र इति । शुद्धस्य ब्रह्मणः प्राणसंबंधाभावादप्राणं एकमद्वितीयं तन्मायया कर्तृसंज्ञं हिरण्यगर्भाख्यमभवत् । तस्मादन्यं नासीत् । तदेवाजया मायया परिवृतं सज्जीवभूतं जीवत्वं प्राप्तं न पृथक्कश्चिज्जीवोऽस्ती-त्यर्थः । अत्र श्रुतिः--"नासदासीन्नोसदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमापरो यत् । किमावरीवः कुहकस्यशर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम्" ॥ २४ ॥

**अन्वयः**—यद्वत् रात्रिः दिनं वा तरणौ न भवति । किंतु एषः दृग्दोषः । तद्वत् जन्माद्यात्मा बन्धः यदि न अभूत् तर्हि मोक्षः अपि पुनः नासीत् अप्राणं शुद्धं एकं समभवत् । अथ मायया तत् कर्तृसंज्ञं । च तस्मात् अन्यत् न आसीत् तत् एव अजया परिवृतं जीवभूतं ( अभूत् ) ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें रात्र किंवा दिवस सूर्याच्या ठिकाणीं होत नसून, तो केवळ दृष्टीचा दोष आहे; त्याचप्रमाणें जन्ममरणरूप बन्ध जर नसला तर मग पुनः मोक्षही नाहीं. ( सृष्टीपूर्वीं ) प्राणरहित, शुद्ध व एक असें तत्त्व होतें. पुढें मायेनें तेंच कर्ता झालें; व त्याच्यापेक्षां अन्य असें दुसरें कांहीं नव्हतें. तेंच कर्तृ-संज्ञक तत्त्व मायेनें वेष्टिल्यानें जीव झालें.

**विवरणः**—परमेश्वर पाहतां ब्रह्मरूप जीवांना बंधही नाहीं व मोक्षही नाहीं. ते केवळ अज्ञानामुळें आत्म्याचे ठिकाणीं कल्पित आहेत. असें ह्या श्लोकांत सांगितलें आहे. 'बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो मे न तत्त्वतः । बद्ध व मुक्त ह्या संज्ञा मला सत्वादि गुण-द्वारा ( किंवा गौण वृत्तीनें ) प्राप्त होतात; त्या सत्या नव्हेत.' ह्या वचनाप्रमाणें जन्ममरणरूप बंध जव्हां नव्हता तव्हां मोक्षही नव्हता. कारण बंधामुळें मोक्ष होतो. कोणीच जर बद्ध नाहीं तर मुक्त कोण होणार ? सृष्टीच्या पूर्वी एकच वस्तु असल्यामुळें व त्याहून अन्य कांहींच नसल्यामुळें बद्ध किंवा मुक्त ( मोकळा ) तरी कोण होणार ? हीच गोष्ट सूर्याचा दृष्टांत देऊन जास्त स्पष्ट करितात. सूर्याच्या ठिकाणीं रात्र व दिवस नसतात ह्म० त्यांचा सूर्याशीं कांहीं संबंध नसतो. पण लोकांना सूर्याचें दर्शन होतें त्या वेळीं आतां दिवस आहे असें व त्यांच्या नेत्रांना सूर्य दिसत नाहीं त्या वेळीं आतां रात्र आहे असें ते म्हणतात. तात्पर्य रात्र किंवा दिवस हे धर्म सूर्याचे नसतांना लोकांच्या नेत्रदोषानें ते त्याचे आहेत असें वाटतें. तसेंच बंध व मोक्ष हे आत्मरूप शुद्ध

ब्रह्माला नसून ते त्यालाच आहेत असें अविद्या दोषानें वाटतें. शुद्ध ब्रह्माचा प्राणांशीं संबंध नसतो म्हणजे तें क्रियाशक्तिरहित आहे; म्हणूनच त्याला प्राणरहित, शुद्ध व एक अशीं विशेषणें दिलीं आहेत. असें तें अद्वितीय ब्रह्मच स्वाज्ञानसंज्ञक मायेनें हिरण्यगर्भनामक जगत्कर्ता होतें. तात्पर्य पूर्वी त्याहून अन्य कांहीं नव्हतें; आणि तेंच जन्मरहित मायेनें आच्छादित झालें असतां जीव झालें. सारांश जीवही वस्तुतः त्या शुद्ध तत्त्वाहून पृथक् नाहीं. केवळ आत्म्याच्या अज्ञानानें जीव, ईश्वर, जग व सर्व पदार्थ यांचा अनुभव येत असतो; पण तो वस्तुभूत (खरा) नव्हे, प्रातिभासिक आहे. खरें तत्त्व एक व अद्वितीय असें असून तेंच सत्य (त्रिकालाबाधित) आहे.

प्रागासीद्भावरूपं तम इति तमसा गुढमस्मादतर्क्यं ।
क्षीरांतर्यद्वदंभो जनिरिहजगतो नामरूपात्मकस्य ॥
कामाद्धातुः सिसृक्षोरनुगतजगतः कर्मभिः संप्रवृत्ता-
द्रेतोरूपैर्मनोभिः प्रथममनुगतैः संततैः कार्यमाणैः॥ २५ ॥

टीकाः—अथ पूर्वमुक्तं तदानीं जगन्नासीदिति तर्हि पुनः कथमुत्पन्नमित्याशंक्याह—प्रागासीदिति । जगदुपादानभूतं भावरूपं तम इत्यज्ञानं आसीत् । तेन तमसा जगद्गूढमाच्छादितमस्मात्कारणादतर्क्यं अज्ञायमानं किंवत् यद्वत्क्षीरांतर्गतमंभः उदकं क्षीरांतर्वर्तमानमपि न ज्ञायते तद्वत् । तत इह अस्मिन्नज्ञाने अस्य नामरूपात्मकस्य जगतः जनिः उत्पत्तिः । ननु यद्यपि बीजांतर्गतो वृक्षास्तिष्ठति तथापि कारणसामग्रीव्यतिरेकेण नोत्पद्यते । अत आह कामादिति । सिसृक्षोः स्रष्टुमिच्छतो धातुः परमेश्वरस्य कामादिच्छातः । सापि कुत इत्यत आह किंभूताद्धातुः कामात् अनुगतजगतः कर्मभिः संप्रवृत्तात् अनुगतं अनादित्वेन वर्तमानं यज्जगत् तस्य कर्मभिः प्रेरितात् । अथ तान्यपि कुत इत्याह-रेतोरूपैर्बीजभूतैर्मनोभिः प्रथमं अनादिप्रवाहेणानुगतैः सद्भिः संततैः कार्यमाणैः निष्पादितैः कर्मभिरित्यर्थः । एतदर्थे श्रुतिरपि—"तमआसीत्तमसागूळ्हमग्रेऽप्रकेतंसलिलंसर्वमाइदम् । तुच्छेनाभ्वपिहितंयदासीत्तपसस्तन्महिनाजायतैकम् ॥ कामस्तदग्रेसमवर्तताधिमनसोरेतःप्रथमंयदासीत् । सतोबंधुमसतिनिरविंदन्हृदिप्रतीष्याकवयोमनीषा" ॥ २५ ॥

**अन्वयः**—प्राक् भावरूपं तम इति आसीत् । तमसा गूढं अस्मात् अतर्क्यं ( किंवत् ) यद्वत् क्षीरान्तर् अम्भः । अनुगतजगतः रेतोरूपैः मनोभिः प्रथमं अनुगतैः संततैः कार्यमाणैः कर्मभिः संप्रवृत्तात् सिसृक्षोः धातुः कामात् नामरूपात्मकस्य जगतः इह जनिः ।

**अर्थः—पूर्वी भावरूप अज्ञान होतें. दुधांतील पाण्याप्रमाणें अज्ञानानें हें आच्छादित असल्यामुळें अतर्क्य होतें व अनादिकालापासून चालत आलेल्या, तसेंच अनादिकालापासून प्रवृत्त झालेल्या, आणि प्रवाहाप्रमाणें सतत चालू असणाऱ्या, बीजभूत सृष्टीच्या कर्मांनीं प्रेरित झाल्यामुळें सृष्टि करण्याची इच्छा करणाऱ्या प्रजापतीच्या कामनेनें नामरूपांनीं युक्त असलेल्या ह्या जगाची उत्पत्ति ( होते. )**

**विवरणः**—मागच्या श्लोकामध्यें सृष्टीच्या पूर्वी जग नव्हतें असें सांगितलें; आणि आतां हें व्यक्त जग कसें उत्पन्न झालें? किंवा सृष्ट्युत्पत्तीच्या पूर्वी हें कोणत्या अवस्थेंत होतें? हें स्पष्ट सांगतात. हें जग व्यक्त होण्यापूर्वी जगाचें उपादानरूप तम या नावाचें अज्ञान होतें. त्या तमानें हें जग आच्छादित झालेलें होतें; व त्यामुळें दुधामध्यें असणाऱ्या उदकाचें जसें ज्ञान होत नाहीं, तसें जगाचें ज्ञान तेव्हां होत नव्हतें. नंतर त्या अज्ञानापासूनच ह्या नामरूपानें व्यक्त होणाऱ्या जगाची उत्पत्ति झाली. ज्याप्रमाणें बीजामध्यें वृक्ष गूढ असतो तरी तो व्यक्त होण्यास भूमि, उदक बीजारोपण करणारा इत्यादि निमित्त कारणें लागतात, त्याचप्रमाणें हें जग तमामध्यें गुप्त असतें व तें व्यक्त होण्यास सृष्टीला उत्पन्न करण्याची इच्छा करणाऱ्या प्रजापतीच्या इच्छेची अवश्यकता असते. अनादिकालापासून प्रवृत्त झालेल्या ह्या जगांतील अनंत प्राण्यांच्या कर्मांनीं प्रजापतीला जग उत्पन्न करावें अशी इच्छा होते; आणि तीं कर्में बीजरूप, अनादिकालापासून चालत आलेलीं, सद्रूप व सतत निष्पन्न होणारीं अशीं असतात. ह्मणजे तींच पुनरुत्पत्तीला कारण होतात. हा संसार अनादि असल्यामुळें त्यांतील प्राण्यांचीं संचित कर्मेंहीं अनादि आहेत. तीं सद्रूप साक्षी जो आत्मा त्याच्या आश्रयानें असतात, ह्मणून त्यांनाही **सद्रूप ह्मटलें** आहे. प्रवाहरूपानें तीं सारखीं प्रत्येक संसारामध्यें प्रवृत्त होतात; प्रत्येक नवीन जन्मामध्यें नवीन कर्मांची त्यांत भर पडते, व ज्ञानावांचून त्यांचा कधींहीं क्षय होत नाहीं ह्मणून त्यांना **संततैः** व **कार्यमाणैः** अशीं विशेषणें दिलीं आहेत. हा श्लोक श्रीमदाचार्यांनीं ‘तम आसीत्तमसा गूढमग्रे०’ ह्या श्रुतीच्या आधारानें लिहिला आहे. ह्या श्रुतीच्या भाष्याचें सर्व तात्पर्य येथें देणें चर्वितचर्वण

होईल. कारण त्यांतील बहुतेक भाग वर येऊन गेलाच आहे. यास्तव श्लोकाचा अर्थ विशेष स्पष्ट होण्याकरितां कांहीं भाग येथें घेतला आहे.

श्रुतीमध्यें पूर्वी हें जग नव्हतें असें सांगितलें आहे. पण यावर तार्किक अशी शंका घेतात कीं पूर्वीं जर हें जग नव्हतें तर त्याची उत्पत्ति कशी झाली? व उत्पन्न होणाऱ्या ह्या जगाची उत्पत्ति करणारा कोण? कारण, कर्ता हें एक कारक आहे; व कारक हा एक कारणाचाच विशेष आहे; व कारण तर अस्तित्वरूपानें कार्योत्पत्तीच्या पूर्वीं अवश्य असावेंच लागतें. ह्या शंकेचें निरसन करण्यास्तव उत्पत्तीच्या पूर्वींही हें जग एका विशेष रूपानें असतेंच असें श्रुति सांगते. पूर्वीं म्हणजे प्रलयकालीं हीं सर्व आकाशादि भूतें व त्यांच्यापासून होणारे पदार्थ यांना तमानें ( अंधकारानें ) झांकून टाकिलें होतें. जसा रात्रींतील अंधकार सर्व पदार्थांना व्यापून टाकितो, व त्यामुळें त्यांचें ज्ञान होत नाहीं. त्याचप्रमाणें मायासंज्ञक भावरूप अज्ञानानें आत्मतत्त्वाला झांकून टाकिलें. यास्तवच त्याला 'तम' असें ह्मणतात. त्याच कारणभूत तमामध्यें हें सर्व जग गुप्त असतें. त्या तमापासून ह्या नाम व रूप यांनीं युक्त असलेल्या जगाचें व्यक्त होणें हीच त्याची उत्पत्ति होय; व हें आत्माच्छादक अज्ञानच त्याची उत्पत्ति करतें. आतां सृष्टि 'उत्पन्न ( ह्मणजे व्यक्त ) करावी' अशी ईश्वराला इच्छा होते; व ह्या इच्छेला, अनंत प्राण्यांच्या अनंत वासना हेंच कारण होतें. पूर्व कल्पामध्यें प्राण्यांनीं केलेल्या कर्मांचें त्यांना फल मिळण्याची वेळ आली कीं कर्माध्यक्ष ईश्वराला सृष्टि उत्पन्न करण्याची इच्छा होते; व त्याच्या इच्छाद्वाराच ही सृष्टि व्यक्त होते. ही गोष्ट अनुभवगम्य आहे; यास्तव साधकांनीं अनुभवी पुरुषांपासून ती समजून घ्यावी.

---

१—कर्ता, कर्म, करण, संप्रदान, अपादान, व अधिकरण हीं सहा कारकें होत. ह्यांचा कोणत्याही क्रियानिष्पत्तीशीं संबंध असतो. असें व्याकरणामध्यें सांगितलें आहे.

**चत्वारोस्याः कपर्दा युवतिरथ भवेन्नूतना नित्यमेषा ।**
**माया वा पेशला स्यादघटनघटनापाटवं याति यस्मात् ॥**
**स्यादारंभे घृतास्या श्रुतिभववयुनान्येवमाच्छादयन्ती ।**
**तस्यामेतौ सुपर्णाविव परपुरुषौ तिष्ठतोर्थप्रतीत्या ॥ २६ ॥**

टीकाः-मायाया उत्कर्षं वर्णयति-चत्वार इति।अस्याः पूर्वोक्तमायायाः चत्वारः कपर्दाः उत्कर्षाः संति । अथ तानेवाह--युवतिरिति । एषा माया नित्यं नूतना कदापि स्थविरा न भवति अतो युवतिर्भवेत् वृद्धावस्थायामपि सा तरुण्येवास्ति अयमेक उत्कर्षः । तथा इयं पेशला स्यात् किन्नाम पेशलत्वं अआह--पेशला कुशलेत्यर्थः । तदेवाह यस्मादिति-यस्मात्कारणादियं अघटनघटनापाटवं विक्षेपं कौशलं याति अयं द्वितीय उत्कर्षः । तथेयमारंभे उपक्रमे घृतास्या घृतवन्मृष्टं आस्यं मुखं यस्याः सा तथा यस्य कस्याप्यारंभे मृष्टं दर्शयति परिणामे विषोपममित्यर्थः अयं तृतीय उत्कर्षः । अथेयं श्रुतिभववयुनानि श्रुतिभिः उपनिषद्भागैः प्रतिपादितानि आत्मज्ञानानि आवरणशक्त्या आच्छादयन्ती अयं चतुर्थ उत्कर्षः तस्यां चतुरुत्कर्षवत्यां मायायां एतौ परपुरुषौ परः परमात्मा पुरुषो जीवः एतौ सुपर्णौ पक्षिणाविव तिष्ठतः केन प्रकारेण ज्ञाताविस्यत आह--अर्थेति । अर्थप्रतीत्या पदार्थभासकत्वेन । माया तिरोधानकर्त्री सकलभासकत्वं परमात्मन एवेत्यर्थः ॥ २६ ॥

**अन्वयः**--अस्याः चत्वारः कपर्दाः ( संति ) अथ एषा माया नित्यं नूतना ( अतः ) युवतिः भवेत् । यस्मात् अघटनघटनापाटव याति तस्मात् पेशला वा । आरंभे घृतास्या स्यात् । एवं श्रुतिभववयुनानि आच्छादयन्ती । तस्यां अर्थप्रतीत्या एतौ परपुरुषौ सुपर्णौ इव तिष्ठतः ।

**अर्थः**--ह्या मायेचे चार उत्कर्ष आहेत ( ते असे ) १ ही माया नित्य नूतन ( तरुणी ) असते ह्मणून ही युवति होय. २ ज्या अर्थी ही अत्यंत दुर्घट अशीं कृत्यें करिते त्याअर्थी ही अति कुशल आहे. ३ प्रथमतः ही मोठी रमणीय वाटते ४ व उपनिषदांतील प्रतिपादनाला ( ही आपल्या शक्तिनें ) झांकून टाकिते. असल्या ह्या मायेमध्यें दोन पक्ष्यांप्रमाणें जीव व शिव हे दोघे विषय भोगीत रहातात.

**विवरणः**--ह्या श्लोकांत, पूर्वश्लोकांत सांगितलेल्या तम नांवाच्या ह्या मायेचे चार उत्कर्ष आहेत, असें प्रतिपादन करितात. जी ही माया आपल्या विलक्षण शक्तीनें हें सर्व जग निर्माण करून

पुनः त्याचा लय करिते तिचे चार उत्कर्ष( मुख्य गुण )आहेत. १ ही सर्वदा नवी असते. ती कधींच वृद्ध होत नाहीं; यास्तव तिला युवति असें विद्वान् ह्मणतात. २ ही फार कुशल आहे. कारण अति दुर्घट व विलक्षण असें कृत्य करण्यांत ही मोठी पटु आहे. ही माया चैतन्य व जड पदार्थ यांचें ऐक्य ( तादात्म्य ) करून दाखविते. पण हें कृत्य प्रकाश व अंधकार यांचें ऐक्य करून दाखविण्या इतकें विलक्षण व अलौकिक आहे. सारांश वस्तु एकप्रकारची असतां ती भलत्याच प्रकारची करून दाखविण्यांत ही माया फार चतुर असल्यामुळें हिला कुशल असें ह्मणतात. ३ ही सकृद्दर्शनीं पुरुषाला मोठी रमणीय वाटते, पण परिणामीं त्याला मोठ्या अनर्थांत पाडिते. विषय दुःख देणारे असून ते प्रथमतः किती सुखकर वाटतात? पण मोठ्या आनंदानें केलेल्या दुष्कृत्यांचे परिणाम जेव्हां रडत भोगावे लागतात, तेव्हां त्यांचें खरें स्वरूप समजतें. ही सर्वदा आपल्या मोहक रूपानें सर्व प्राण्यांना मोह पाडून आपल्या अधीन करून घेते; व नंतर त्यांना जन्ममरणगर्तेंत(खड्ड्यांत)लोटते. यास्तव हिला घृतास्या (तुपानें माखलेल्या तोंडाप्रमाणें रमणीय दिसणारी) असें ह्मणतात. ४ उपनिषद्भागामध्यें सर्वत्र जो उपदेश व प्रतिपादन केलेलें आहे त्याला आवरण घालून ह्मणजे आपल्या मोहक रूपानें प्राण्यांना भुलवून"उपनिषदांतील सर्व प्रतिपादन खोटें आहे त्यांत कांहीं तथ्य नाहीं, ती सर्व पोटभरू ठक ब्राह्मणांची जगाला फसविण्याची विद्या आहे "असें भासविते. असे हे हिचे चार उत्कर्ष असून दोन पक्षी ज्याप्रमाणें एका वृक्षाचा किंवा एका शाखेचा आश्रय करून राहतात; त्याप्रमाणें जीव व शिव हे दोघे विषयांचा अनुभव घेत हिचा आश्रय करून रहातात. माया जड असल्यामुळें ती कोणत्याही पदार्थाचें ज्ञान करून देत नाहीं, तर अंधकाराप्रमाणें सर्व पदार्थांना झांकून टाकीत असते; व परमात्मा चिद्रूप असल्यामुळें सर्व पदार्थांना प्रकाशित करितो. ( ह्म० त्यांचें ज्ञान करून देतो. ) प्रथम उत्कर्षानें ह्या मायेचें सर्वदां एक रूप, द्वितीय उत्कर्षानें हिची विक्षेपशक्ति, तृतीय उत्कर्षानें हिचें मोहकत्व व चतुर्थानें हिची आवरणशक्ति व्यक्त करून दाखविली आहे. अंधाऱ्या रात्रीं पुढें असलेला वृक्ष मुळींच दिसत नाहीं; हें आवरण,

व तो अंधुक दिसत असल्यामुळें हा कोणी पुरुष किंवा पिशाच आहे असें वाटतें हा विक्षेप. ह्मणजे पदार्थाचें मुळींच ज्ञान न होऊं देणें याला आवरण व तो मुळपदार्थाहून भलताच कांहीं पदार्थ आहे असें भासविणें याला विक्षेप असें ह्मणतात. माया आपल्या आवरणशक्तीनें आत्म्याचें स्वरूपज्ञान होऊं देत नाहीं; व विक्षेपशक्तीनें देह हाच आत्मा आहे असें किंवा तो सुखी आहे, दुःखी आहे, कुशल आहे असें भासविते. जीव हा भोग भोगणारा व शिव भोग भोगविणारा होय. मायेच्या योगानेंच हे दोन भेद झाले आहेत. शुद्ध चैतन्याला ही माया जीव बनविते व ह्या मायाकृत जीवांचा कर्मफलदाता ईश्वरही हिच्या मुळेंच तें चैतन्य होतें.

एकस्तत्रास्त्यसंगस्तदनु तदपरोज्ञानसिंधुं प्रविष्टो ।
विस्मृत्यात्मस्वरूपं स विविधजगदाकारमाभासमैक्षत् ॥
बुद्ध्यांतर्यावदैक्षद्विसृजति तमजा सोपि तामेवमेक-
स्तावद्विप्रास्तमेकं कथमपि बहुधा कल्पयंति स्ववाग्भिः ॥

टीका—इदानीं जीवपरमात्मनोः परमार्थतः एकत्वमाह एक इति । तत्र तयोः सुपर्णयोर्मध्ये एकः परमात्मा असंगोऽस्ति तदनु तदपरो जीवः अज्ञानसिंधुं प्रविष्टः स च आत्मस्वरूपं विस्मृत्य विविधजगदाकारं आभासं प्रातिभासिकं ऐक्षत् दृष्टवान । ततः बुद्ध्या निश्चयात्मिकया अंतः यावदैक्षत्तावत् अजा माया तं जीवं विसृजति तथा सोपि जीवः तां मायां विसृजति । अंतर्दृष्ट्या विचार्यमाणे उभयोरसंस्पर्शोऽयंइत्यमेवानुभूयते । तर्हि सुपर्णद्वयकल्पना कुत इत्यत आह-विप्रा इति । तमेकमेवात्मानं विप्राः श्रुतिज्ञाः कवयः शिष्यबोधाय्व्यवहारनिमित्तं वाग्भिः अनेकधा कल्पयंति नतु तत्त्वत इत्यर्थः । एतदर्थे श्रुतिः—"चतुष्कपर्दायुवतिः सुपेशाघृतप्रतीकावयुनानिवस्ते । तस्यांसुपर्णावृषणा निषेदतुर्यत्रदेवादधिरेभागधेयं । एकःसुपर्णःससमुद्रमाविवेशसइदंविश्वंभुवनंविचष्टे" इति ॥ २७ ॥

**अन्वयः**—तत्र एकः असंगः अस्ति । तदनु तदपरः अज्ञानसिंधुं प्रविष्टः । सः ( च ) आत्मस्वरूपं विस्मृत्य विविधजगदाकारं आभासं ऐक्षत् । यावत् बुद्ध्या अंतर् ऐक्षत् तावत् तं अजा विसृजति सः अपि तां ( विसृजति इति अनुभवति ) एवं एकः तावत् ( अस्ति तथापि ) विप्राः तं एकं कथं अपि स्ववाग्भिः बहुधा कल्पयन्ति ।

**अर्थः—त्या दोघांपैकीं शिव कोठेंही आसक्त होत नाहीं; पण त्याच्याच सारखा असणारा दुसरा जो जीव तो अज्ञानसागरांत बुडाला आहे. तो स्वतःचेंच स्वरूप विसरून नानाप्रकारच्या आकारांनीं युक्त असलेला ह्या जगाचा भास पाहूं लागला. पण ( ह्या जगदाकारांवरून क्षणभर लक्ष्य काढून ) तो आपल्या ह्या हृदयांत जों बुद्धिद्वारा पाहूं लागला तों ही माया जीवाला उत्पन्न करिते व जीव हिला उत्पन्न करितो ( असें ह्याला दिसलें. ) ह्याप्रमाणें तो एकच असतांना ब्राह्मण त्या एकाच विषयीं कशी तरी आपल्या वाणीनें अनेक प्रकारची कल्पना करितात. ( म्ह० तो एक असतांना त्याच्या ठिकाणीं अनेकत्वाचा आरोप करितात. )**

**विवरणः**— जीव व परमात्मा हे व्यवहारतः भिन्न भिन्न भासले तरी परमार्थतः ते एकच आहेत; असें ह्या श्लोकांत सांगितलें आहे. पक्ष्यांप्रमाणें मायेचा आश्रय करून रहाणाऱ्या त्या जीवशिवांपैकीं शिव कोठेंच आसक्त न होतां मायेला स्वाधीन ठेऊन भोक्त्यांना कर्मफलें देत असतो; व वस्तुतः त्याच्याच सारखा असणारा दुसरा जीव अज्ञानसमुद्रात बुडून व्याकुल होतो. तो स्वतःचेंच स्वरूप विसरून जाऊन नानाप्रकारच्या व विलक्षण आकृतीच्या ह्या जगाचा अनुभव घेऊं लागतो. म्ह० ह्या बाह्य अनात्मभूत सृष्टपदार्थांमध्येंच तो गर्क होऊन रहातो. त्याला स्वतःचें भानही नाहींसें होऊन जड पदार्थांतीलच एकाद्याला 'हा मी' असें खोटेंच समजतो. पण दैववशात् एकादे वेळीं वैषयिकदृष्टि सोडून अंतर्दृष्टीनें व सूक्ष्म बुद्धीनें जर आपल्या अंतःकरणांतच काय भरलें आहे ह्याचा त्यानें विचार केला, तर माया जीवाला निर्माण करिते व जीव मायेला उत्पन्न करितो ( म्ह० माया ज्याला केवळ कल्पनेनें बनविते तो, व ती स्वतः ज्याच्या आधारानें आहे तो, असे हे दोघे पृथक् नसून एकच आहेत) असा त्याला अनुभव येतो. मायेचा व जीवशिवांचा खरोखर कांहींच संबंध नाहीं, असें त्यांना निश्चयपूर्वक कळून आल्यानें चित्स्वरूपांत जीव व शिव असा खंड नसून तें अखंड एक रूपानें आहे असा त्याला दृढ प्रत्यय येतो. वस्तुतः अशी जरी स्थिति आहे तरी वेदवेदांगपारग विद्वान् ब्राह्मण, शिष्यांना बोध होण्यासारखा शब्दव्यवहार करितां यावा म्हणून, केवल

शब्दांनीं त्या एकच असणाऱ्या परमात्म्याला अनेक नांवें देऊन त्याचीं अनेक रूपें आहेत अशी कल्पना करितात; पण तें खरें नव्हे. ह्या व मागच्या श्लोकांत, भगवान् आचार्यांनीं 'चतुष्कपर्दा युवतिः सुपेशा० विचष्टे' इत्यादि श्रुतीचा अर्थ, स्पष्टपणें आणिला आहे.

**नायाति प्रत्यगात्मा प्रजननसमये नैव यात्यंतकाले ।**
**यत्सोऽखंडोऽस्ति लैंगं मन इह विशति प्रव्रजत्यूर्ध्वमर्वाक् ॥**
**तत्कार्श्यं स्थूलतां वा न भजति वपुषः किंतु संस्कारजातै-**
**स्तेजोमात्रा गृहीत्वा व्रजति पुनरिहायाति तैस्तैःसहैव ॥**

टीका—अथ जन्ममरणानुबंधेनास्य स्वरूपमवं वर्णयति—नेति । प्रजननसमये गर्भाविर्भावे सति प्रत्यगात्मा नायाति गर्भे न प्रविशति । अथान्तकाले देहावसानसमये न याति न गच्छति । यस्मात् आत्मा अखंडः अपरिच्छिन्नोऽस्ति यतः प्रवेशनिर्गमौ हि परिच्छिन्नस्यैव भवतः । तर्हि लोके जन्ममरणादिव्यवहारः कस्येत्याह—लिंगमिति । लिंगं पंचदशकलोपेतं मनः इह लोके ऊर्ध्वं देवलोके अर्वाक् मनुष्यलोके वा गर्भे विशति तथा प्रव्रजति च न प्रत्यगात्मा । अथ तल्लिंगदेहोपेतं मनः वपुषः स्थूलदेहस्य कार्श्यं कृशतां स्थूलतां पुष्टत्वं वा न भजति रोगाद्युपहतौ कृशता तथा पाटवे पुष्टत्वं वा न भजति । एवं सन्मनः वपुषः उत्क्रान्तौ पूर्वसंस्कारजातैः तथा तेजोमात्राः प्रत्यक्ष इंद्रियैः सह प्राणान् गृहीत्वा व्रजति गच्छति । तथा पुनरुत्पत्तिसमये तैस्तैः संस्कारजातैः सह इह गर्भे आयाति ॥

**अन्वयः—**प्रत्यगात्मा प्रजननसमये न आयाति । अन्तकाले च न एव याति । यत् सः अखण्डः अस्ति । इह ऊर्ध्वं अर्वाक् वा लैंगं मनः विशति ( तथा च ) प्रव्रजति । तत् वपुषः कार्श्यं स्थूलतां वा न भजति । किंतु संस्कारजातैः सह तेजोमात्राः गृहीत्वा व्रजति पुनः इह तैः तैः सह एव आयाति ।

**अर्थः—**सर्वान्तर्यामी आत्मा उत्पत्तिकालीं येत नाहीं, व मरणसमयीं जातही नाहीं. कारण कीं तो खण्डरहित आहे. ह्या व्यवहारांत, देवलोकीं किंवा मनुष्यलोकीं, पंधरा कलांनीं युक्त असलेलें मनच गर्भामध्यें शिरतें ( व शरीर टाकून ) जातें. तें मन देहाच्या कृशतेनें किंवा स्थूलतेनें कृश किंवा स्थूल होत नाहीं. पण ( तें मन मरणसमयीं पूर्व ) सर्व संस्कारांसह दृशेंद्रियें व प्राण यांतील सूक्ष्म तेजें खेंचून घेऊन जातें; व पुनः

**जन्मकालीं त्या त्या वासना व इन्द्रियादिकांचीं सूक्ष्म तेजें घेऊनच गर्भांत तें येतें.**

**विवरणः**—जन्ममरणद्वारा विचार केला तरी सुद्धां जीव हा पृथक् नसून स्वरूपभूतच आहे; असें आतां वर्णन करितात. प्राणी जन्मास येतो त्यावेळीं आत्मा कोणीकडून तरी येऊन गर्भांत प्रवेश करितो व मरणसमयीं तो शरीर सोडून कोठें तरी जातो असें सर्व प्राकृत मनुष्यांना वाटण्याचा संभव आहे, पण वस्तुतः तसें होत नाहीं. कारण ब्रह्मरूप आत्मा आकाशाहूनही अति सूक्ष्म व अति विस्तृत आहे. सर्व भूतांना आधार असणारें आकाश, सर्वाहून विस्तृत व सूक्ष्म असल्यामुळें, जर चलनवलन करूं शकत नाहीं; तर मग त्याहून अति विस्तृत व सूक्ष्म असणारें ब्रह्म कोठें जात नाहीं किंवा कोठून येत नाहीं हें काय सांगावें? जाणें, येणें, स्तब्ध राहणें, इत्यादि क्रिया परिमित ( माप करितां येण्यासारख्या, आकारयुक्त ) वस्तूच्या ठिकाणीं संभवतात. सारांश आत्मा सर्वव्यापी असल्यामुळें कोठें जात नाहीं व येत नाहीं. ऊर्ध्वलोकीं किंवा अधोलोकीं जन्म घेतांना वासना, आणि पांच प्राण व दहा इंद्रियें, यांसह मन (अंतःकरण ) गर्भांत प्रवेश करितें व तेंच मरणकालीं देह सोडून जातें. तें लिंगदेहात्मक मन रोगादिकांनीं देह कृश झाला तरी कृश होत नाहीं; व रसायनादि पौष्टिक औषधींच्या योगानें तो पुष्ट झाला तरी तें पुष्ट होत नाहीं. म्ह० कृशता, पुष्टि, दृढता इत्यादि धर्म देहाचे आहेत मनाचे नव्हेत. देहत्याग करण्याची वेळ आली असतां मन, अनेक जन्मांतील संचित व प्रस्तुत जन्मांतील क्रियमाण वासना, यांसह इंद्रियें व प्राण यांचीं तेजें ( त्यांतील ती ती शक्ति ) घेऊन निघून जातें; व पुनः जन्माच्या वेळीं तेंच सर्व पूर्वसंस्कार व तेजोमात्रा ( इंद्रियादिकांच्या शक्ति ) यांसह गर्भांत प्रवेश करितें.

आसीत्पूर्वं सुबंधुर्भूशमवनिसुरो यः पुरोधाः सनाते-
र्बाल्यात्कूटाभिचारात्स खलुमृतिमितस्तन्मनोगात्कृतांतं
तद्भ्राताश्रैतमंत्रैः पुनरनयदिति प्राह सूक्तेन वेद-
स्तस्मादात्माभियुक्तंव्रजतिननुमनःकर्हिचिन्नांतरात्मा २९

टीका—अथ प्रवेशनिर्गमौ मनस एव संभवतो नात्मन इत्यत्र ऋक्शाखीयां श्रुतिमाख्यायिकापूर्विकां संवादयति—आसीदिति । सुबंधुनामा अवनिसुरो ब्राह्मणः पूर्वं भृशमत्यर्थं सर्वोत्कर्षेणासीत् । किंभूतः सनातेः पृथ्वीभुजः पुरोधाः पुरोहितः । अथ खल्विति श्रूयते स ब्राह्मण्यात् ब्राह्मणकृतात्कूटाभिचारात्कापट्येन रचितादभिचारात्प्रयोगान्मृतिमितः मरणं प्राप्तः तन्मनः कृतांतं यमलोकमगात् । अथ तस्य सुबंधोः भ्राता श्रौतमंत्रैः कृत्वा तत्रत्यं मनः पुनरनयत् अनीतवान् इति सूक्तेन वेदः प्राह । तस्मात्कारणादात्माभियुक्तं आत्मप्रतिबिंबाभियुक्तं सत् मन एव व्रजति परंत्वंतरात्मा न व्रजति । एतन्मूलभूता श्रुतिरपि अष्टमाष्टके "यत्ते यमंवैवस्वतंमनोजगामदूरकं । तत आवर्तयामसीहक्षयायजीवसे" ॥२९॥

अन्वयः—पूर्वं अवनिसुरः सुबंधुः भृशं आसीत् । यः सनातेः पुरोधाः । स खलु ब्राह्मण्यात् कूटाभिचारात् मृतिं इतः । तन्मनः कृतांतं अगात् । तद्भ्राता श्रौतमंत्रैः ( तत् ) पुनः अनयत् इति वेदः सूक्तेन प्राह । तस्मात् आत्माभियुक्तं मनः ननु व्रजति अंतरात्मा कर्हिचित् न ( व्रजति )

**अर्थः**—पूर्वी सुबंधु नांवाचा कोणी एक प्रसिद्ध ब्राह्मण होता. तो सनाति राजाचा पुरोहित ( उपाध्याय ) असे. तो ब्राह्मणांनीं केलेल्या कपटास्त्रप्रयोगानें मरण पावला. त्याचें मन यमाकडे गेलें. नंतर त्या सुबंधूच्या भ्रात्यांनीं श्रौत मंत्रांनीं त्याच्या मनाला परत आणिलें. असें वेदानें सूक्तानें सांगितलें आहे. तस्मात् आत्मप्रतिबिंबयुक्त मन मरणकालीं जातें. अंतरात्मा कधींही जात नाहीं.

**विवरणः**—आत्मा गर्भामध्यें कोठूनही येऊन प्रवेश करित नाहीं व मरणकालीं शरीरांतून कोठें निघूनही जात नाहीं. तर तें सर्व मन करित असतें. याविषयीं ऋग्वेदांतील आख्यायिका-( गोष्ट )रूप श्रुतीचा अनुवाद भगवान् आचार्यांनी येथें केला आहे. ऋग्वेदाच्या आठव्या अष्टकामध्यें " यत्ते यमं वैवस्वतं मनो जगाम दूरकं" इत्यादि श्रुतीमध्यें अशी आख्यायिका आहे कीं, पूर्वी सनाति नांवाच्या एका राजाच्या गृहीं बंधु, सुबंधु, श्रुतबंधु, आणि विप्रबंधु असे चार भाऊ उपाध्ये होते. त्यांनीं राजाच्या सांगण्यावरून त्याच्या शत्रूचा नाश होण्याकरितां अनेक उपाय केले; पण ते शत्रूचें हनन करणारें अभिचारक कर्म मात्र करीत ना. म्हणून त्या राजानें त्यांच्यावर बहिष्कार घातला; आणि दुसऱ्या दोघां कपट-

पट्टांना पुरोहित केलें. त्यामुळें बंधु इत्यादिक चवघेही भ्राते क्रुद्ध होऊन राजाचेंच हनन करण्यास प्रवृत्त झाले. ही गोष्ट त्या मायावी पुरोहितांना समजली असतां त्यांनीं अभिचारक कर्म करून सुबंधु नांवाच्या पुरोहिताला मारिलें. पण त्याच्या भ्रात्यांनीं त्याला पुनः जिवंत करण्याकरितां "यत्ते यमंवैवस्वतं०" इत्यादि पूर्वनिर्दिष्ट श्रुतिमंत्रानें प्रयत्न केला. त्या मंत्राचा अर्थ असा—"हे सुबंधो जें तुझें मन सूर्यपुत्र यमधर्माकडे दूर गेलें आहे, त्या तुझ्या मनाला ह्या लोकामध्यें रहाण्याकरितां व व्यवहार करण्याकरितां (आम्ही) परत फिरविनों." याप्रमाणें त्या तिन्हीं बंधूंनीं मंत्रद्वारा उपाय केले असतां तो सुबंधु पुनः जीवंत झाला. ह्या श्रौत कथानकाला उद्देशून आचार्यांनीं हा श्लोक केला आहे. वेदामध्यें अभिचारक कर्म सांगितलें आहे. त्या कर्मानें ब्राह्मण लोक कधीं कधीं आपल्या शत्रूवर कपटास्त्र प्रयोग करित असत. परंतु उपनिषदांनीं त्या कर्माचा, मद्यपान, कलंज (कालिंगड) भक्षण, ब्राह्मणहनन इत्यादिकांप्रमाणें, निषेध केला आहे. अभिचारक कर्म निषिद्ध असल्यामुळें प्रथमतः राजाच्या आज्ञेप्रमाणें सुबंधु करीना; पण राजानें बहिष्कृत केलें असतां त्याला क्रोध येऊन तो प्रयोग राजावरच करण्यास तो सिद्ध झाला. पण राजाच्या नूतन पुरोहितांस ही गोष्ट समजतांच त्याच अभिचारक कर्मानें त्यांनीं सुबंधूला मारिलें; व त्याच्या बंधूंनीं त्याचें मन यमलोकाहून परत आणिलें. सारांश अंतरात्मा जन्मकालीं किंवा मृत्युसमयीं कोठेंही जात येत नसून, गति (जाणें) व आगति (येणें) ही केवळ मनालाच आहेत.

एको निष्कंप आत्मा प्रचलति मनसा धावमानेन तस्मिं-
स्तिष्ठन्नग्रेथ पश्चान्न हि तमनुगतं जानते चक्षुराद्याः ॥
यद्वत्पाथस्तरंगैः प्रचलति परितो धावमानैस्तदंतः ।
प्राक्पश्चादस्ति तेषां पवनसमुदितैस्तैः प्रशांतैर्यथावत् ३०

टीका—इदानीं चलनादिधर्मो मनस एव नात्मन इति दर्शयति-एक इति। एकोऽद्वयो निष्कंपः कर्मशून्योऽपि आत्मा धावमानेन मनसा सह प्रचलति तथा तस्मिन्मनसि अपि तिष्ठन् अग्रे पुरतः पश्चाच्च वर्तते। तमेवंविधमात्मानं चक्षु-

गतं अंतर्गतं अपि चक्षुराद्याः न जानते न जानंति इंद्रियागोचरत्वात् । तत्र दृष्टांतमाह-यद्वदिति । यद्वत्पाथः उदकं परितोधावमानैः तरंगैः प्रचलति तथा तेषां तरंगाणां अंतःप्राक् पश्चात् च पाथोऽस्ति । किंभूतैः तरंगैः पवनसमुदितैः वायुनोत्पन्नैः एवं मायामयैरिंद्रियैरप्यात्मा । अथ तैः प्रशांतैः सद्भिर्यथावत् प्रकृतिस्थं पाथ एवास्ति तद्वदात्मापि ॥ ३० ॥

**अन्वयः**-एकः निष्कंपः आत्मा धावमानेन मनसा (सह) प्रचलति (तथा) तस्मिन् (अपि) निघ्नन् सन् अथ अग्रे पश्चात् च (वर्तते) तं अनुगतं चक्षुराद्याः नहि जानते। (किंवत्) यद्वत् पाथः पवनसमुदितैः परितः धावमानैः तरंगैः प्रचलति। तेषां अंतः प्राक्पश्चात (च) तत् अस्ति। तैः प्रशांतैः यथावत् (तद्वत् आत्मापि)

**अर्थः—ज्याप्रमाणें उदक, वायूमुळें उत्पन्न होणाऱ्या व चोहोंकडे धांवणाऱ्या तरंगांच्या योगानें हालतें, पण त्या तरंगांमध्यें, त्यांच्या अलीकडे व पलीकडे तेंच असतें, आणि तरंग शांत झाले असतांही तें पूर्वीप्रमाणें होतें; त्याचप्रमाणें एक व चलनरहित असा हा आत्मा धांवणाऱ्या मनासहवर्तमान जातो; तसेंच तो त्या मनामध्यें असून त्याच्या पुढें व मागेंही असतो. ह्याप्रमाणें तो आत्मा मनाच्या अगदीं बरोबर असतो तरी चक्षुरादिक वृत्ति त्याला जाणीत नाहींत.**

**विवरणः**—चलनादिक धर्म मनाचे आहेत, आत्म्याचे नव्हेत असें ह्या श्लोकांत सांगितलें आहे. निष्क्रिय व एक असा हा आत्मा धांवणाऱ्या मनासह धांवत असल्यासारखा वाटतो. त्याचप्रमाणें तो मनामध्यें स्वतःच्या प्रतिबिंबरूपानें रहात असून त्याच्या मागें व पुढें किंवा उत्पत्तीच्या पूर्वी व नाशानंतरही असतो. ह्याप्रमाणें जरि तो मनाला कधीं सोडीत नाहीं तरी, चक्षुरादिक वृत्ति त्याला जाणीत नाहींत. कारण तो बाह्य व अंतर् अशा दोन्हीं इंद्रियांहून अतीत आहे. ह्मणजे इंद्रियादिकांना त्याचें ज्ञान होणें शक्य नाहीं. " यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति " ह्मणजे नेत्रानें ज्याचें दर्शन घेतां येत नाहीं परंतु नेत्रामध्यें पहाण्याची शक्ति ज्याच्यामुळें आहे; इत्यादि अनेक श्रुति याला प्रमाण आहेत. वस्तुतः तो निष्क्रिय आहे तरी मनामुळें तोच चलनादिक क्रिया करीत आहे असें वाटतें. हीच गोष्ट उदकाचा दृष्टांत देऊन स्पष्ट करितात. वायूमुळें उत्पन्न होणाऱ्या तरंगांच्या योगानें उदकच सर्वत्र धांवत आहे असें वाटतें; व त्या धांवणाऱ्या तरंगां-

मध्यें, त्यांच्या उत्पत्तीपूर्वी व नाशानंतर (किंवा पुढें मागें) उदकावांचून विचारवानाला अन्य कांहींच दिसत नाहीं; आणि तरंग शांत झाले असतांही तें स्वतःच्या रूपानेंच पूर्वीप्रमाणें असतें. तसेंच मायामय इंद्रियादिकांच्या योगानें आत्मा व्यवहार करीत असल्यासारखा वाटतो; पण तरंगांप्रमाणें इंद्रियादिक शांत झाली असतां तो पूर्ववत् शांतरूप होतो.

एकाक्यासीत्स पूर्वं मृगयति विषयानानुपूर्व्यांतरात्मा ।
जाया मे स्यात्प्रजा वा धनमुपकरणं कर्म कुर्वंस्तदर्थम् ॥
क्लेशैः प्राणावशेषैर्महदपि मनुते नान्यदस्माद्गरीय-
स्त्वेकालाभेप्यकृत्स्नो मृत इव विरमत्येकहान्याकृतार्थः ३१

टीका —इदानीं जीवस्य बाह्यप्रपंचानुवृत्तिं निरूपयति-एकाकीति । सोंऽतरात्मा पूर्वं एकाकी आसीत् । अतः परं आनुपूर्व्या अनुक्रमेण विषयान्मृगयति गवेषयति । अथानुपूर्वीमाह -प्रथमं जाया मे स्यात्ततः प्रजा मे स्यात् ततस्तन्निर्वाहार्थं धनं वित्तं मे स्यात् । अथ तदर्थं वित्तप्राप्त्यर्थं प्राणावशेषैः क्लेशैः कर्म कुर्वन् एवं धनादिविषयप्राप्तौ अस्माद्विषयादन्यत् महत् अपि गरीयःश्रेष्ठं न मनुते । एवं बहुविषयाशेषे एकविषयालाभे सति अकृत्स्नो भूत्वा मृत इव विरमति विरामं प्राप्नोति तथा एकहान्या प्राप्तस्य नाशेन अकृतार्थो भवति । अत्र मूले श्रुतिः -"आत्मैवेदमग्र आसीत् एक एव सोऽकामयत जाया मे स्यादथ प्रजायेयाथ वित्तं मे स्यादथ कर्म कुर्वीयेत्येतावान्वै कामो नेच्छंश्च नातो भूयो विन्देत्तस्मादप्येतर्ह्येकाकी कामयते जाया मे स्यादथ प्रजायेयाथ वित्तं मे स्यादथ कर्म कुर्वीयेति स यावदप्येतेषामेकैकं न प्राप्नोत्यकृत्स्न एव तावन्मन्यते तस्यो कृत्स्नता" ॥३१॥

**अन्वयः**—सः अंतरात्मा पूर्वं एकाकी आसीत् (अतः परं प्रथमं) मे जाया स्यात् प्रजा उपकरणं धनं वा (इति) आनुपूर्व्या विषयान् मृगयति । प्राणावशेषैः क्लेशैः तदर्थं कर्म कुर्वन् अन्यत् महत् अपि अस्मात् गरीयः न मनुते । एकालाभेऽपि अकृत्स्नः सन् मृत इव विरमति (तथा) एकहान्या अकृतार्थः (भवति)

**अर्थ**-हा अंतरात्मा पूर्वी एकटाच असतो. नंतर प्रथम मला स्त्री असावी मग पुत्र व्हावा व त्यानंतर संसाराचें साधन जें धन तें मिळावें अशा अनुक्रमानें विषयांना धुंडाळतो (त्यांच्या विषयीं संकल्प करितो.) धन मिळविण्यास्तव प्राण व्याकुळ होईतों क्लेश सहन करून कर्म करितो; व दुसरी एकादि मोठी वस्तुही ह्या विषयांहून अधिक आहे, असें मानित नाहीं. ह्यांपै-

**कीं एकादा विषय न मिळाला तरी मी अपूर्ण आहें (असें समजू-न) मृतपुरुषासारखा स्तब्ध होऊन बसतो; व एकाद्या विषयाची हानी झाली तर हा अकृतार्थ होतो.**

**विवरणः**—प्रथमतः हा अंतरात्मा एकटाच असतो. त्यावेळीं स्त्री, पुत्र इत्यादिक विषय त्याच्यापाशीं नसतात. पुढें प्रथमतः माझा विवाह व्हावा अशी तो इच्छा करितो. नंतर मला पुत्र असावेत अशी त्याची भावना होते. नंतर त्या सर्वांच्या निर्वाहाचें साधन, व व्यवहारांत अवश्य लागणारें जें धन तें मिळावें अशी तृष्णा उत्पन्न होते, व तें धन मिळविण्याकरितां मरे मरे तों क्लेश भोगूनही सेवा, कृषि (शेतकी), वाणिज्य (व्यापार) इत्यादि कर्मे करितो, व हे धनादिविषय प्राप्त झाले असतां आत्म्यासारख्या महद्वस्तूचेंही त्यांपुढें त्याला महत्त्व वाटत नाहीं. ह्याप्रमाणें स्त्रीपुत्रधनादिक अनेक विषयांपैकीं बहुतेक मिळून एकादाच न मिळाल्यास तो आपणाला अपूर्ण समजतो. ( अतृप्त होतो. ) उदाहरणार्थ एकाद्या गृहस्थास स्त्री व पुत्र असून वित्त नसलें किंवा स्त्री व धन असून पुत्र नसला अथवा पुत्र व धन असून दैवयोगानें स्त्री नष्ट झाली तर तो हाय! हाय! माझा सर्वस्वी घात झाला, माझें घर बसलें इत्यादि प्रकारांनीं आक्रोश करितो. सारांश विषयप्राप्ति होऊन त्यांपैकीं एकाद्याचा नाश झाला तरी हा स्वतःला अभागीच समजतो; व इच्छिलेल्या अनेक विषयांपैकीं एकादा न मिळाला तरी अतृप्तच असतो. ह्या श्लोकाला "आत्मैवेदमग्रआसीत एक एव सो कामयत" इत्यादि बृहदारण्यक श्रुति आधार आहे; व त्या श्रुतीचा सर्व अर्थ वर स्पष्ट झाला आहे.

नासीत्पूर्वं न पश्चादतनुदिनकराच्छादको वारिवाहो
दृश्यःकिंत्वंतरासौ स्थगयति स दृशं पश्यतो नार्कबिम्बम्।
नोचेदेवं विनार्कं जलधरपटलं भासते तर्हि कस्मा-
त्तद्वद्विश्वं पिधत्ते दृशमथ न परं भासकं चालकं स्वम् ।३२

**टीकाः**—अविद्याया आवरणशक्तिमेव विविच्य प्रपंचयति-नासीदिति। वारि वहतीति वारिवाहः मेघः अतनुदिनकराच्छादको भवति न तनुरतनुर्महान्

लोकत्रयप्रकाशको यो दिनकरः दिवसे प्रभूतकरः सूर्यस्तदाच्छादको भवति । अथ तस्याच्छादकत्वमानंतरालिकं न प्रवाहपरंपरागतमित्याह-नासीदिति । मेघः प्रावृट्कालात्पूर्वं ग्रीष्मे नासीत् । अथ पश्चात् शरत्कालेऽपि नासीत् । एवमेवंविधो मेघः सूर्यं पश्यतो जनस्य दृशमेव स्थगयति आवृणोति नार्कबिंबं तस्य मेघस्याभितः कल्पसारशालित्वादित्यर्थः । एवं सत्यपि लोके सूर्यो निष्प्रभ इति प्रतीतिः प्रातिभासिकीत्याह-नोचेदिति । एवमुक्तप्रमेयं नोचेत्सूर्य एव आच्छादित इति चेत्तर्हि अर्कं विना जलधरपटलं सूर्यावरकीभूतं मेघपटलं कस्माद्भासते सूर्यस्य घनपटलेन तिरोहितत्वात् । घनपटलं कस्मात् प्रकाशितात् ज्ञायते सूर्यस्याच्छन्नत्वेन प्रकाशकत्वानर्हत्वादित्यर्थः । तथा च सूर्यं पश्यतो जनस्य घनपटलेन दृष्टिरेवावृता न सूर्यः । एतद्दृष्टांतावष्टंभेन भूमंडलस्यापि सूर्यावरकत्वं तद्वदेवेत्यर्थः । अथ यदर्थमेतदुपक्रांतं तदाह तद्वदिति । तद्वदनंतरोत्पन्नं विश्वमपि पश्यतो दृशं दृष्टिमेव पिधत्ते न परं ब्रह्मस्वरूपमाच्छादयति । तर्हि कथं न दृश्यत इत्याशंक्य दृश्यत एवेत्याह । किंभूतं परं ब्रह्म स्वभासकं चालकं च स्वशक्त्या विश्वं तस्याभासकं चालकं च येन विश्वरूपं विश्वमाभाति तथा येन चलति सर्वव्यवहारं करोति तत्परं ब्रह्म कथमाच्छादितुं शक्यते ब्रह्मव्यतिरेकेण तस्य भासकचालकांतराभावात् । तथा च जगदाकारादिनभोऽवसानेषु वर्तमानं ब्रह्मैव सत्यं तदज्ञानात्कल्पितो जगदाकारः शुक्तिरजतवत्प्रातिभासिक इत्यर्थः ॥ ३२ ॥

**अन्वयः**—वारिवाहः अत्युदिनकराच्छादकः ( भवति ) सः पूर्वं न आसीत् पश्चात् च न ( आसीत् ) किंतु असौ अंतरा दृश्यः । सः पश्यतः दृशं स्थगयति अर्कबिंबं न ( स्थगयति ) एवं नोचेत् तर्हि अर्कं विना जलधरपटलं कस्मात् भासते ? । तद्वत् विश्वं दृशं पिधत्ते । अथ परं भासकं चालकं स्वं न ।

**अर्थः**—मेघ अत्यंत विस्तीर्ण सूर्याला झांकून टाकितो. तो पूर्वी नसतो व मागूनही नसतो. तर हा कांहीं काल मध्येंच दिसतो. तो पहाणाऱ्यांच्या दृष्टीला आच्छादित करितो; सूर्यबिंबाला आच्छादित करीत नाहीं. कारण असें जर नाहीं तर मेघसमुदाय सूर्यावांचून अन्य कोणत्या प्रकाशानें दिसतो? त्याप्रमाणेंच हें विश्व लोकांच्या दृष्टीला झांकतें. पण सर्वश्रेष्ठ, सर्वांचा भासक, सर्वांचा चालक, असा जो आत्मा त्याला झांकित नाहीं.

**विवरणः**—ह्या श्लोकांत आचार्यांनीं आवरणशक्तीचें स्पष्टीकरण केलें आहे. हा सूर्य स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ ह्या तिन्ही लोकांना प्रकाश

देणारा आहे. त्याअर्थी तो मेघापेक्षां किती तरी पटीनें मोठा असला पाहिजे. परंतु मेघ अशा प्रचंड सूर्यालाही झांकून टाकितोसा दिसतो. तो वर्षाकालापूर्वी ग्रीष्मर्तूत नसून पुढें वर्षाकालानंतर शरत्कालीं सुद्धां नसतो; तर तो वर्षार्तूमध्यें मात्र दिसत असतो. असा हा मध्येंच कांहीं काल दिसणारा मेघ. सूर्याकडे पहाणाऱ्या लोकांच्या दृष्टींना आच्छादित करितो, परंतु मेघापेक्षां सूर्य किती तरी विस्तृत असल्यामुळें त्याला आच्छादित करित नाहीं. असें आहे तरी मेघानें सूर्याला झांकिलें, अशी जी प्रतीति लोकांना येते, ती भ्रममूलक आहे. कारण सूर्यच जर खरोखर मेघांकडून आच्छादित झाला असता, तर मेघ दिसलेच नसते. कारण, सूर्याच्या प्रकाशावांचून नेत्रांना कोणत्याही पदार्थाचें ज्ञान होत नाहीं. तसेंच उत्पत्तिच्या पूर्वी व नाशानंतर हें जग नसून मध्येंच कांहीं काल व्यक्त होतें; व तें आत्मस्वरूपाकडे पहाणाऱ्या लोकांच्या दृष्टींना झांकून टाकितें. पण आत्मस्वरूपाला झांकित नाहीं. ह्मणजे सूर्य व त्याकडे पहाणारा पुरुष यांच्यामध्यें मेघ येऊन पुरुषाची दृष्टि जशी आवृत होते, त्याप्रमाणेंच ब्रह्म व प्राणी यांच्यामध्यें हें नश्वर विश्व येऊन, प्राण्यांची दृष्टि आवृत झाल्यामुळें त्यांना तें दिसत नाहीं. ह्मणजे नश्वर विश्वाच्या पलीकडे दुसरी सत्स्वरूप अशी कांहीं वस्तु आहे अशी त्यांना कल्पनाच होत नाहीं. पण तेवढ्यावरून हें परब्रह्मस्वरूप नाहीं असें कधींही ह्मणतां येणार नाहीं. कारण आपला स्वतःचा व्यवहार त्याच्याच सत्तेमुळें होतो व हें विचित्ररूप जगही त्याच्याच सत्तेमुळें भासतें, तर अशा ह्या सर्वचालक परमात्म्याला हें भ्रामक जग परमार्थतः कधीं तरी आच्छादित करील काय? सर्वभासक ब्रह्मच आच्छादित झाल्यास सर्व व्यवहाराचाच लोप होईल. सारांश जगाचा आदि, मध्य व अंत ह्या तिन्ही अवस्थांमध्यें असणारें ब्रह्मच सत्य आहे, आणि त्याच्याच अज्ञानामुळें उत्पन्न होणारा ह्या जगाचा आकार शुक्तिरजताप्रमाणें केवळ प्रातिभासिक आहे.

भुंजानः स्वप्नराज्यं ससकलविभवो जागरं प्राप्य भूयो ।
राज्यभ्रष्टोहमित्थं न भजति विषमं तन्मृषा मन्यमानः ॥
स्वप्ने कुर्वन्नगम्यागमनमुखमघं तेन न प्रत्यवायी ।
तद्वज्जाग्रद्दशायां व्यवहृतिमखिलांस्वप्नवद्विस्मरेच्चेत् ३३

टीका:--एवं स्वप्नदृष्टांतेन प्रपंचस्य मिथ्यात्वं निरूपयति भुंजान इति। ससकलविभवः सेनाकोशाद्युपस्कारयुक्तः सन्स्वप्नराज्यं भुंजानः पुरुषः भूयो जागरं प्राप्य प्राक्तनं दरिद्रं रंकं देहं निरीक्ष्याहं राज्यभ्रष्ट इति विषमं शोकं न भजति। कुतः तत्स्वाप्नं राज्यं मृषा मन्यमानः। अथ तमेवार्थं दृष्टांतेन द्रढयति स्वप्न इति। स्वप्ने अगम्यागमनमुखं सुरापानब्रह्मवधादि अघं पातकं कुर्वन् ततः प्रबोधं प्राप्तः सन् तेन पातकेन प्रत्यवायी प्रायश्चित्ती न भवति। यथा पूर्वस्वाप्निक व्यवहारं एव दृश्यते। मनसाप्यनुतापं न प्राप्नोति। कुतः तन्मृषा मन्यमान इति पूर्ववत्। तथा च जाग्रद्दशायामेव पापकर्ता प्रायश्चित्तार्हो भवति। अथ जाग्रद्दशायामपि अखिलां पुण्यपापव्यवहृतिं चेत् स्वप्नवद्विस्मरेत् तथापि तदुत्प्रायश्चित्तार्हो न भवति यतस्तन्मृषा मन्यमानः इति प्रागुक्तमेव। तदुक्तं भगवता --" ब्रह्मण्याधाय कर्माणीत्यादिना "॥ ३३॥

अन्वयः—ससकलविभवः सन् स्वप्नराज्यं भुंजानः भूयो जागरं प्राप्य तन्मृषा मन्यमानः अहं राज्यभ्रष्टः इत्थं विषमं न भजति। स्वप्ने अगम्यागमनमुखं अघं कुर्वन् तेन प्रत्यवायी न (भवति) जाग्रद्दशायां (अपि) अखिलां व्यवहृतिं स्वप्नवत् विस्मरेत् चेत् तर्हि तद्वत् (प्रत्यवायी न भवति)।

अर्थः—सर्व वैभवासहवर्तमान स्वप्नांतील राज्याचा उपभोग घेणारा पुरुष, जागा झाला असतां तें स्वप्नराज्य मिथ्या आहे असें मानितो; आणि त्यामुळें 'मी आतां राज्यभ्रष्ट झालों' असें समजून खेद करीत नाहीं. तसेंच स्वप्नांत अगम्यागमनादि पातकें करणारा पुरुष त्या पातकांनीं दोषी होत नाहीं. जाग्रदवस्थेंतील सर्वही व्यवहार जर प्राणी स्वप्नाप्रमाणें विसरेल तर, तसाच दोषी होणार नाहीं.

विवरणः--आतां स्वप्नाच्या दृष्टांतानें प्रपंच मिथ्या आहे असें निरूपण करितात. सैन्य, भांडार, आयुधें इत्यादि सामग्रीनें युक्त असलेल्या स्वप्नांतील वैभवशाली राज्याचा उपभोग घेणारा पुरुष, जागा झाला असतां आपला पूर्वीचा तो दरिद्री देह व संसार पहातो.

पण तें स्वप्नांतील राज्य खोटें आहे असें तो समजत असल्यामुळें 'मी आतां राज्यभ्रष्ट झालों' असें मानून कधींही रडत बसत नाहीं. हीच गोष्ट आणखी एका दृष्टांतानें स्पष्ट करितात. स्वप्नामध्यें चांडालस्त्रीगमन, मद्यपान, ब्रह्मवध इत्यादि पातकें करणारा पुरुष जागा झाल्यावर पातक[illegible]नार्थ प्रायश्चित्त घेण्यास पात्र होत नाहीं; व त्याला स्वाप्निक पातक मिथ्या आहे असें वाटत असल्यामुळें खेदही होत नाहीं. त्याचप्रमाणें जाग्रद्दशेंत केलेला सर्व पापपुण्यरूप व्यवहार स्वप्नांतील व्यवहाराप्रमाणेंच जर प्राणी विसरेल, तर तो स्वप्नांतील पापपुण्याप्रमाणेंच ह्या जागृतींतील पापपुण्यात्मक व्यवहारानेंही लिप्त होणार नाहीं. कारण ते स्थूल व्यवहारही खोटे आहेत असें तो मानीत असतो. श्रीभगवानांनींही 'ब्रह्मण्याधाय कर्माणि०' सर्व कर्में ब्रह्मसमर्पण करून व त्यांविषयीं आसक्ति सोडून जो तीं करितो, तो पद्मपत्र जसें उदकानें लिप्त होत नाहीं, तसा पापानें लिप्त होत नाहीं' असें म्हटलें आहे.

स्वप्नावस्थानुभूतं शुभमथ विषमं तन्मृषा जागरेस्या-
ज्जाग्रत्यां स्थूलदेहव्यवहृतिविषयं तन्मृषा स्वप्नकाले ॥
इत्थं मिथ्यात्वसिद्धावनिशमुभयथा सज्जते तत्र मूढः ।
सत्येतद्भासकेऽस्मिन्निह हि कुत इदं तन्न विद्मो वयं हि ॥

टीकाः--अथ जाग्रत्स्वप्नावस्थयोरपि भ्रमजनकत्वमन्वयेनाह-स्वप्नेति । स्वप्नावस्थायामनुभूतं राज्यभोगेष्टप्राप्त्यादि तथा विषमं व्याघ्रभक्षणादि तत्सर्वं जागरे मृषा भवति। अथ जाग्रद्दशायां स्थूलदेहव्यवहृतिविषयं शुभं मिष्टान्नादिसर्वभोगसुखं तथा विषमं आधिव्याधिजनितभयाननादुःखं तत्स्वप्नकाले सर्वं मृषा भवति। इत्थममुना प्रकारेणोभयथापि अनिशं निरंतरं मिथ्यात्वसिद्धौ सत्यां तत्र मूढः यः सज्जते अभिनिवेशं करोति तत्कस्मात्कारणादिति वयं न विद्मः ॥ ३४ ॥

**अन्वयः**—स्वप्नावस्थानुभूतं यत् शुभं अथ विषमं तत् जागरे मृषा स्यात् । जाग्रत्यां यत् स्थूलदेहव्यवहृतिविषयं तत् स्वप्नकाले मृषा स्यात् । इत्थं

उभयथा मिथ्यात्वसिद्धौ इह हि अस्मिन् एतत्भासके सति अनिशं तत्र मूढः सज्जते । तदिदं कुतः इति वयं न विद्महि ।

**अर्थः—स्वप्नावस्थेमध्यें अनुभविलेले शुभ किंवा अशुभ विषय जाग्रदवस्थेंत खोटे ठरतात. तसेंच जाग्रतीमध्यें जे स्थूल देहाच्या व्यवहारांतील विषय ते स्वप्नामध्यें खोटे ठरतात. ह्याप्रमाणें दोन्ही प्रकारांनीं विषय मिथ्या आहेत असें सिद्ध होऊन, त्या दोन्ही अवस्थांचा भासक हा अंतरात्मा येथें प्रत्यक्षसिद्ध असतांही, मूढ पुरुष सतत विषयांच्या ठिकाणीं आसक्त होतो. पण हें असें कां होतें हें आम्हांला कळत नाहीं.**

विवरणः—आतां ह्या चवतिसाव्या श्लोकामध्यें जाग्रत् व स्वप्न ह्या दोन्ही अवस्था भ्रममूलक आहेत; असें आचार्य प्रतिपादन करितात. स्वाप्निक राज्यप्राप्ति इत्यादि इष्ट भोग व व्याघ्रानें भक्षण करणें, सर्प दंश होणें, इत्यादि अनिष्ट भोग त्या अवस्थेमध्यें जरी सुखदुःख देत असले तरी जाग्रतींत ते खोटे आहेत असा मनाचा निश्चय होतो. तसेंच जाग्रतींत स्थूल देहद्वारा प्राप्त होणारे मिष्टान्न-भोजन, स्त्रीपुत्रधनादिप्राप्ति इत्यादि इष्ट, व शरीरपीडा व मानसिकव्यथा इत्यादि अनिष्ट भोग स्वप्नावस्थेंत खोटे ठरतात. सारांश ह्या दोन्ही अवस्था खोट्या आहेत, असें सिद्ध झालें असतां, व त्या दोन्ही अवस्थांचा प्रकाशक ( ह्मणजे ज्ञान किंवा स्मरण करून देणारा ) आत्मा प्रत्यक्ष प्रत्ययाला येत असतां मूर्ख पुरुष विषयांमध्यें कां आसक्त होतात हें आह्माला मुळींच समजत नाहीं.

जीवंतं जाग्रतीह स्वजनमथ मृतं स्वप्नकाले निरीक्ष्य ।
निर्वेदं यात्यकस्मान्मृतममृतममुं वीक्ष्य हर्षं प्रयाति ॥
स्मृत्वाप्येतस्य जंतोर्निधनमसुयुतिं भाषते तेन साकं ।
सत्येवं भाति भूयोल्पकसमयवशात्सत्यता वा मृषात्वम् ॥

टीका:—अथैतदेव श्लोकान्तरेण निरूपयति—जीवन्तमिति । इह लोके जाग्रदवस्थायां जीवन्तं स्वजनं अथेदानीं स्वप्नकाले मृतं निरीक्ष्य अकस्मान्निर्वेदं दुःखं याति प्राप्नोति अथवा जाग्रत्यां मृतं विपन्नं स्वजनं स्वप्नकाले अमृतं जीवन्तं वीक्ष्य हर्षं याति । अनेन जाग्रत्यनुभूतं स्वप्नकाले मृषा भवतीति दर्शितम् । अथ तत्र तदस्मरणेनान्यथा प्रतीयत इति चेत्तत्राह—स्मृत्वेति । एतस्यां जाग्रत्यां मृतस्य जन्तोर्निधनं स्मृत्वापि अथवा जीवतः असुयुतिं जीवनं स्मृत्वापि तेन सह भाषते वार्ताः कथयति । तथा मृतेन सह दीनालापं करोति तथा च स्वप्नकालेपि स्मरणवतोऽपि मृषात्वप्रतीतिर्भवतीति सूचितं । एवं सति उभयथामिथ्यानुभूतौ सत्यामपि स्वप्ने मृषात्वप्रतीतिर्जाग्रत्यां च सत्यत्वप्रतीतिर्लोकानां कथमुत्पद्यत इत्यत आह—भूय इति । भूयोल्पकसमयवशात् सत्यता मृषात्वं वा भाति भासते न तात्त्विकं भूयांश्चाल्पकश्च तौ च तौ समयौ च तद्वशात् जाग्रतश्चिरकालमस्ति । तत्र दृढानुसंधानात् सत्यत्वं भासते स्वप्नस्तु अल्पसमयवृत्तित्वात्तत्र मृषात्वं भासते । विचार्यमाणे तावदुभयोरपि असत्यत्वमित्यर्थः ॥ १९ ॥

**अन्वयः**—इह जाग्रति जीवंतं स्वजनं अथ स्वप्नकाले मृतं निरीक्ष्य अकस्मात् निर्वेदं याति । ( अथवा जाग्रत्यां ) मृतं अमुं अमृतं वीक्ष्य ( स्वप्नकाले ) हर्षं प्रयाति । एतस्य जंतोः निधनं स्मृत्वा अपि ( अथवा जीवतः ) असुयातिं स्मृत्वा अपि तेन साकं भाषते ( तथा मृतेन सह दीनालापं करोति ) एवंसति भूयोल्पकसमयवशात् सत्यता मृषात्वं वा भाति ।

**अर्थः**—ह्या जाग्रदवस्थेंत आपल्या एकाद्या जीवंत असलेल्या आप्ताला स्वप्नांत मृत पाहून एकाएकीं मनुष्य शोक करूं लागतो, किंवा तसेंच जाग्रत्कालीं मेलेल्या आप्ताला स्वप्नांत जीवंत पाहून तो हर्ष मानितो. ह्या प्राण्याच्या ( स्वप्नांतील ) मरणाचें ह्याला जाग्रतींत स्मरण असूनही, त्याच्याशीं बोलतो तसेंच जाग्रतींत मृत झालेल्याला स्वप्नांत जीवंत पाहिल्याचें स्मरण असूनही त्याच्या विषयीं दीनालाप ( खेद ) करितो. असें असतांही पुष्कळवेळ भासणें व थोडावेळ भासणें यांच्या योगानें एक अवस्था सत्य व दुसरी खोटी असें भासतें.

**विवरणः**—मागच्या श्लोकांत निर्दिष्ट केलेलीच गोष्ट आणखी एक दृष्टान्त देऊन स्पष्ट करितात. व्यवहारामध्यें एखादा पुरुष आपल्या जीवंत आप्ताला स्वप्नामध्यें मृत पहातो; आणि त्या स्वप्नावस्थेमध्येंच त्या आप्ता-विषयीं आक्रोश करितो. तसेंच खरोखर मृत झालेल्या मनुष्याला स्वप्नांत जीवंत पाहून मोठा आनंद मानितो. पहिल्या दोन चरणांत जाग्रदवस्थे-

तील विषय स्वप्नांत मिथ्या कसे ठरतात हें दाखविलें आहे, आतां यावर कदाचित् कोणी-त्या मरणाचें अथवा जीवंतपणाचें स्मरण नसल्यामुळें असें भ्रामक ज्ञान होतें असें ह्मणतील ह्मणून "स्मृत्वा०" इत्यादि पुढील चरणांत सांगतात. जागा झाल्यावर ज्या मनुष्याला स्वप्नामध्यें मृत पाहिलें होतें त्याच्याशीं, त्याच्या मरणाचें स्मरण असूनही, भाषणादि सर्व व्यवहार करितो. ह्मणजे त्याला स्वप्नांतील गोष्टी खोट्या आहेत असें निश्चयानें माहित असतें. तसेंच खरोखरच मृत झालेल्या मनुष्याला हा स्वप्नांत जीवंत पहातो, व जागा झाल्यावर त्याला त्या स्वप्नाची आठवण असली तरी पूर्वी प्रमाणेंच त्या मृताविषयीं रडत बसतो. ह्याप्रमाणें दोन्ही प्रकारांनीं स्वप्न व जाग्रति मिथ्या आहेत असा अनुभव येत असूनही स्वप्नांतील विषयांची अगदीं थोडावेळ प्रतीति येत असल्यामुळें ते मिथ्या, व जाग्रदवस्थेंतील विषयांचा बराच वेळ पर्यंत अनुभव येतो ह्मणून ते सत्य असें लोक मानितात. कारण एका स्वप्नांत जी वस्तु आपण पाहिली तीच दुसऱ्या स्वप्नांतही पाहावयास सांपडेल, किंवा तीचें निदान स्मरण होईल, असाही नियम नाहीं. पण जाग्रदवस्थेमध्यें आपण एकदां ज्याचा अनुभव घेतला त्याच विषयाचा पुनः काहीं काल अनुभव घेतां येतो. किंवा निदान प्रस्तुत देह आणि आत्मा यांचा संबंध असेपर्यंत त्याचें स्मरण तरी असतें. ह्मणून स्वप्नाला मिथ्या व जाग्रतीला सत्य असें आह्मीं भ्रमानें ह्मणतों. परंतु सूक्ष्म दृष्टीनें विचार करूं लागलें असतां त्या दोन्हीं अवस्था मिथ्याच आहेत असें प्रत्ययाला येतें. ३५

स्वाप्नस्त्रीसंगसौख्यादपि भृशमसतो या च रेतश्च्युतिःस्या-
त्साहश्यात्तद्वदेतत्स्फुरति जगदसत्कारणं सत्यकल्पम् ॥
स्वप्ने सत्यःपुमान्स्याद्युवतिरिह मृषैवानयोः संयुतिश्च ।
प्रातः शुक्रेण वस्त्रोपहातिरिति यतः कल्पनामूलमेतत् ३६

टीका:—इदानीमसदुपादानकं विश्वमपि सदिति सदृष्टांतमाह—स्वाप्नेति ।
असतः अविद्यमानादपि स्वाप्नस्त्रीसंगसौख्याद्रेतश्च्युतिः शुक्रस्रावो भवति ।

सादृश्याद्व्यावहारिकसत्यात्सदसत्कारणं जगत् सत्यकल्पं स्फुरति। नामैक-देशे नामग्रहणवत् । असत् सदसद्विलक्षणं अविद्याख्यं कारणं यस्य तदसत्कारणं एवंविधं जगत्सत्यकल्पं स्फुरति न तु सत्यं सुषुप्तावस्तमितत्वात् । अथ दृष्टांतेन दार्ष्टांतिकसिद्धिमाह—स्वप्न इति । स्वप्न इति स्वप्ने पुमान् सत्यः युवतिः स्त्री मृषा च परमनयोः स्त्रीपुरुषयोः संयुतिः सुरतमपि मृषा तथा प्रातर्जागरावस्थायां शुक्रेण रेतसा वस्त्रोपहतिः प्रत्यक्षसिद्धा । एवमात्मा सत्यः स्त्री माया असत्या तयोर्युतिः संबंधः आध्यासिकः अतएव मृषा । तस्माज्जातं जगत् व्यवहारे सत्यं यतः सर्वं कल्पनामूलं काल्पनिकमित्यर्थः ॥ ३६ ॥

**अन्वयः**-मृशं च असतः अपि स्वाप्नस्त्रीसंगसौख्यात् या रेतश्च्युतिः स्यात् । तद्वत् असत्कारणं एतत् जगत् सादृश्यात् सत्यकल्पं स्फुरति । स्वप्ने पुमान् सत्यः स्यात् इह युवतिः अनयोः संयुतिः च मृषा एव (परंतु) प्रातः शुक्रेण वस्त्रोपहतिः (प्रत्यक्षसिद्धा) इति यतः ( तस्मात् ) एतत् कल्पनामूलं ।

**अर्थः**—अगदीं खोट्या अशा स्वप्नांतील स्त्रीसंगसौख्यापासूनसुद्धां रेतस्खलन होतें. त्याचप्रमाणें ज्याचें कारण खोटें आहे असें हें जग वरील दृष्टांताप्रमाणेंच असल्यामुळें खरें असल्यासारखें भासतें. स्वप्नामध्यें पुरुष ( भोक्ता ) मात्र खरा असतो. स्त्री, व त्या स्त्रीपुरुषांचा संग हीं दोन्हीं खोटींच असतात; परंतु प्रातःकालीं शुक्राच्या योगानें वस्त्र मलिन झालेलें आपण प्रत्यक्ष पाहतों. असें आहे त्याअर्थी हें सर्व कल्पनामूल आहे.

**विवरणः**—आतां ह्या श्लोकांत, ह्या विश्वाचें उपादान कारण जरी असत् आहे तरी हें विश्व व्यावहारिक सत्य कसें हें दृष्टांतानें स्पष्ट करितात. स्वप्नांतील स्त्रीसंग खोटा असतो. परंतु त्याचा परिणाम मात्र सत्यत्वानें अनुभवाला येतो. त्याचप्रमाणें हें जग व्यावहारिक सत्य असल्यामुळें त्याचें कारण जरी असत् आहे तरी तें सत्य असल्यासारखें भासतें. येथें असत् ह्मणजे सदसद्विलक्षण अविद्या; आणि सत् ह्मणजे अनुभवाला योग्य अशी सर्व व्यक्त सृष्टि असा अर्थ करावा. जग हें सत्य असल्यासारखें भासतें असें ह्मटलें आहे; केवळ 'सत्य आहे' असें ह्मटलेलें नाहीं. कारण सुषुप्ति(निद्रा)अवस्थेमध्यें त्याचा अस्त होत असतो; ह्मणून तें परमार्थ सत्य नव्हे. तर तें व्यावहारिक सत्य आहे. पुढील श्लोकार्धांत दृष्टांताप्रमाणेंच दार्ष्टांतिक(जग)आहे असें सिद्ध करितात.

स्वप्नामध्यें पुरुष सत्य असून स्त्री व संभोग हीं खोटीं असतात; व प्रातःकालीं जागृत झाल्यावर त्याला शुक्रलिप्त वस्त्र प्रत्यक्ष दिसतें. तसेंच आत्मा सत्य असून स्त्रीस्थानीय माया असत्य आहे; व त्या दोघांचा संबंध आरोपित असल्यामुळें खोटा आहे आणि त्यापासून उत्पन्न होणारें जगत् व्यावहारिक सत्य आहे. सारांश हें सर्वही काल्पनिक आहे. यांत पारमार्थिक सत्यत्वाचा गंधही नाहीं. ३६॥

पश्यंत्यारामस्य प्रतिदिवसममी जंतवः स्वापकाले ।
पश्यत्येनं न कश्चित्करणगणमृते मायया क्रीडमानम्॥
जाग्रत्यर्थव्रजानामथ च तनुभृतां भासकं चालकं वा।
नो जानीते सुषुप्तौ परमसुखमयं कश्चिदाश्चर्यमेतत्॥३७॥

टीकाः—अथावस्थात्रयेऽप्यनुभूयमानं आत्मानं कोऽपि न विचिन्वंतीत्याश्चर्यमाह-पश्यंतीति । अमी जंतवः जीवाः प्रतिदिवसं स्वापकाले अस्य परमात्मन आरामं क्रीडां पश्यंति परंत्वेनमात्मानं कश्चिन्न पश्यति। किंभूतमात्मानं करणगणमृते बाह्येंद्रियव्यतिरेकेणाऽपि मायया स्वाप्नदेहेंद्रियादिरूपया क्रीडमानं। अथास्तां तावन्मोहप्रदा स्वप्नावस्थायां । जाग्रत्स्वामपि तनुभृतां चालकं तथार्थव्रजानां भासकं प्रकाशकं निरंतरं न पश्यति । तथा सुषुप्तौ परमसुखमयं एवंविधं परमात्मानं कोऽपि न जानाति इत्येतन्महदाश्चर्यमित्यर्थः ॥ ३७ ॥

अन्वयः—अमी जंतवः प्रतिदिवसं स्वापकाले अस्य आरामं पश्यंति (परंतु) करणगणं ऋते मायया क्रीडमानं एनं न कश्चित् पश्यति अथ जाग्रति अर्थव्रजानां भासकं तनुभृतां च चालकं वा ( न पश्यति तथा ) सुषुप्तौ परमसुखमयं कश्चित् नो जानीते एतत् आश्चर्य।

अर्थः—हे सर्व प्राणी प्रत्येक दिवशीं निद्रित झाले असतां ह्या आत्म्याची क्रीडा (स्वप्नावस्थेंतील व्यवहार) पहातात; परंतु बाह्येंद्रियांचें सहाय घेतल्याशिवाय स्वप्नांतील देहेंद्रियरूपी मायेच्या योगानें व्यवहार करणाऱ्या ह्या आत्म्याला कोणीही पहात नाहींत. तसेंच जाग्रतींतही, सर्व विषयसमूहाचा भासक व सर्व प्राण्यांचा चालक, अशा आत्म्याला कोणी पहात नाहीं; (आणि पुनः तसेंच) सुषुप्तीमध्यें (म्हणजे स्वप्नरहित निद्रावस्थेमध्यें) अत्यंत सुखमय अशा आत्म्यालाही कोणी पहात नाहीं हें केवढेंहो आश्चर्य आहे !!

**विवरण:**—आतां तिन्ही अवस्थांमध्यें आत्म्याचा प्रत्येकाला अनुभव येत असूनही त्याचें कधीं कोणी विवेचन करीत नाहीं; ह्याविषयीं श्रीमत् आचार्य आश्चर्य प्रदर्शित करितात. तिन्ही अवस्थेंत आत्म्याचा, स्थूल व सूक्ष्म व्यवहारानें व अत्यंत आनंदवृत्तीनें सर्वांना अनुभव येत असूनही त्याला कोणी जाणित नाहींत. इतकेंच नव्हे, तर त्याच्याविषयीं विचार करण्यासही कोणी तयार होत नाहींत. फार काय पण कित्येक ह्या लौकिक संपत्तीनें व विद्वत्तेनें मोहित होऊन सर्वांचा नियामक असा हा परमात्मा आहे किंवा नाहीं ह्या विषयींच साशंक असतात; हें केवढें अज्ञान आहे ? ॥३७॥

स्वप्ने मंत्रोपदेशः श्रवणपरिचितः सत्य एष प्रबोधे ।
स्वाप्नादेव प्रसादादभिलषितफलं सत्यतां प्रातरेति ॥
सत्यप्राप्तिस्त्वसत्यादपि भवति तथा किं च तत्स्वप्रकाशं ॥
येनेदं भाति सर्वं चरमचरमथोच्चावचं दृश्यजातम् ३८

टीका:—ननु जाग्रदवस्थायामपि स्वप्नदृष्टांतेन मृषात्वेन प्रोच्यमाने तस्यां गुरुमुखादुपनिषद्विचारादिना यो ब्रह्मबोधः सोऽपि मृषा भवति ततो ब्रह्मापि वंध्यापुत्रवदसद्रूपं स्यादित्याशंक्याह-स्वप्न इति ॥ ३८ ॥

**अन्वय:**—स्वप्ने मंत्रोपदेशः श्रवणपरिचितः सन् एषः प्रबोधे सत्यः ( भवति ) तथा स्वाप्नात् प्रसादात् एव अभिलषितफलं ( प्राप्तं ) प्रातः सत्यतां एति। तथा ( च ) सत्यप्राप्तिः तु असत्यात् अपि भवति। किंच येन इदं सर्वं चरं अचरं अथ उच्चावचं दृश्यजातं भाति तत् स्वप्रकाशं ( अस्ति )

**अर्थ:—स्वप्नांतील ( गुरूंचा ) मंत्रोपदेश कर्णगोचर झाल्यानें जागृत झाल्यावर प्रातःकाळीं तो सत्य होतो. ( जसाचा तसा आठवतो. ) तसेंच स्वप्नांत ( ईश्वर )प्रसादानें प्राप्त झालेलें इष्ट फल सकाळीं खरें ठरतें. त्याअर्थी असत्यापासून सुद्धां सत्याची प्राप्ति होते. शिवाय ज्याच्या योगानें हें सर्वही स्थावर-जंगमात्मक व उच्च नीच दृश्यजात भासतें ( प्रतीतीला येतें ) तें आत्मस्वरूप स्वप्रकाश आहे.**

**विवरण:**—जाग्रदवस्था मिथ्या आहे असें स्वप्नदृष्टांतानें सांगितलें असतां-त्या अवस्थेमध्यें गुरूपदेशानें व उपनिषदांच्या विचारानें

होणारा ब्रह्मबोध व ज्या ब्रह्माचा अशा मिथ्या जाग्रदवस्थेंत बोध होणार तें ब्रह्म हीं दोन्हीं वंध्यापुत्राप्रमाणें मिथ्याच असलीं पाहिजेत—अशी शंका कोणी घेतील म्हणून आचार्य म्हणतातः—गुरु प्रिय शिष्याच्या स्वप्नांत येऊन त्याला मंत्राचा उपदेश करितात. तो मंत्र त्याच्या सूक्ष्म श्रवणेंद्रियाशीं परिचित झाल्यानें प्रातःकालीं जशाच्या तसा आठवतो. म्हणजे तो मंत्रोपदेश सत्य ठरतो. तसेंच ईश्वराच्या अनुग्रहानें स्वप्नांत एकादा पुरुष इष्टफल मिळालेसें पहातो व तीच गोष्ट सकाळीं खरी ठरते (प्रत्ययाला येते). स्वप्नांत एकाद्याला मित्रादिकाचें पत्र आल्याचें दिसतें, किंवा रोगग्रस्त आप्त बरा होण्याचें शुभसूचक स्वप्न तो पहातो; व तसाच त्याला जागेपणीं पुढें अनुभवही येतो. सारांश असत्यापासून सुद्धां सत्याची प्राप्ति होते; ही गोष्ट सिद्ध झाली. त्याअर्थीं मिथ्या जाग्रदवस्थेमध्यें होणारा ब्रह्मबोध सत्य अशा तुरीयावस्थेंत सत्य ठरण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. शिवाय या सर्व दृश्य पदार्थांना प्रकाशित करणारा परमात्मा स्वप्रकाश आहे म्हणजे एका दिव्याला पहाण्याकरितां जशी दुसऱ्या दिव्याची अवश्यकता नसते तशीच याच्या ज्ञानाला दुसऱ्या कशाचीही अपेक्षा नाहीं.

मध्यप्राणं सुषुप्तौ स्वजनिमनुविशंत्यग्निसूर्यादयोमी ।
वागाद्याः प्राणवायुं तदिहनिगदिता ग्लानिरेषां न वायोः॥
तेभ्यो दृश्यावभासो भ्रम इति विदितः शुक्तिकारौप्यकल्पः
प्राणायामव्रतं तच्छ्रुतिशिरसिमतं स्वात्मलब्धौ न चान्यत्

टीकाः—एवं स्वप्नानिदर्शनेन जगन्मिथ्यात्वं निरूप्येदानीं जगत्सत्यत्वाभिमतकायां जाग्रत्यामपि तन्मिथ्यात्वं निरूपयति-मध्यप्राणमिति । अमी अग्निसूर्यादयो वागादींद्रियदेवता सुषुप्तौ तृतीयावस्थायां मध्यमं प्राणं विराजमनुविशंति किंभूतं विराजं स्वजनिं स्वस्य जनिर्यस्मिन् स तथा स्वोत्पादकं "मुखादग्निरजायत" तथा—"चक्षोः सूर्यो अजायत" इति श्रुतेः। कार्यजातस्य कारणे प्रवेशो युक्त एवेत्यर्थः। तथा वागाद्याः इंद्रियगणाः सुषुप्तौ प्राणवायुं इत्रसंज्ञं अनुविशंति तत्तस्मात्कारणादेषां साधिदैवतानामिंद्रियाणां ग्लानिरस्तमयः निगदिता उपनिषत्प्रतिपादिता परंतु स्थूलसूक्ष्मप्रपंचलयरूपायां सुषुप्तावपि प्राणवायोरस्तमयो नास्ति यतः सुषुप्तौ श्वासरूपेण प्रत्यक्षत उपलभ्य-

मानत्वात्। अथ सामस्त्यामपि चक्षुरादिभ्यो यो दृश्यावभासो दृश्यानां रूपरसादीनां प्रतिभासः स भ्रमः। न तात्त्विक इति विदितः अथ। भ्रमे दृष्टांतमाह- शुक्तिकेति। यथाशुक्त्यवच्छिन्नेऽधिकरणे रौप्यं प्रातिभासिकं प्रमीयते तद्वद्ब्रह्मण्यधिकरणे नामरूपात्मकं विश्वं प्रातिभासिकं। तस्मात्कारणादवस्थात्रयेऽपि नास्तमितं प्राणायामव्रतं स्वात्मलब्धौ श्रुतिशिरसि मतं नान्यच्चक्षुरादिव्रतं तस्यावस्थात्रयेऽप्यात्मलब्धावशक्तत्वात्॥ १९॥

**अन्वयः**—सुषुप्तौ अर्मा अग्निसूर्यादयः स्वजनिं मध्यप्राणं अनुविशन्ति। (तथा) वागाद्याः प्राणवायुं (अनुविशन्ति) तत् एषां इह ग्लानिः निगदिता। (किंतु) वायोः न (ग्लानिः) शुक्तिकारौप्यकल्पः तेभ्यः (यः) दृश्यावभासः (सः) भ्रमः इति विदितः। तत् स्वात्मलब्धौ प्राणायामव्रतं श्रुतिशिरसि मतं न च अन्यत्।

**अर्थः**—सुषुप्तीमध्यें ह्या अग्निसूर्यादिक देवता स्वकारणभूत मुख्य प्राणामध्यें प्रविष्ट होतात. तसेंच वागादि इंद्रियें प्राणवायूंत प्रविष्ट होतात. म्हणून त्यांचा सुषुप्त्यवस्थेमध्यें लय होतो असें सांगितलें आहे. (परंतु) प्राणवायूचा लय होत नाहीं. (अर्थात्) शिंपेच्या ठिकाणीं जसा रुप्याचा भास होतो, तसा इंद्रियांच्या योगानें जो हा जगाचा भास होत असतो, तो भ्रम आहे; असें समजतें. म्हणून आत्मप्राप्ति होण्याकरितां प्राणायामव्रतच वेदान्तसंमत आहे. अन्य कांहीं नाहीं.

**विवरणः**—ह्याप्रमाणें मागच्या श्लोकांत स्वप्नाच्या दृष्टान्तानें जग मिथ्या आहे असें प्रतिपादन करून ह्या श्लोकांत 'तें सत्य आहे' असें भासणाऱ्या जाग्रत अवस्थेंतही तें मिथ्याच आहे असें निरूपण करितात. 'वाणीची देवता अग्नि. प्राणाची देवता वायु, नेत्रांची देवता सूर्य. श्रवणांची देवता दिशा व त्वगिंद्रियाची देवता ओषधिवनस्पति' होय; असें उपनिषदांतून अनेक ठिकाणीं वर्णन आहे. सुषुप्तीमध्यें ह्या सर्व इंद्रियदेवता मुख्य प्राणांत (विराट्संज्ञक जीवतत्त्वांत) प्रविष्ट होतात. कारण तो मुख्य प्राणच त्यांचें उत्पत्तिस्थान आहे. तसेंच वाक् चक्षु इत्यादि इंद्रियें, इंद्र नांवाच्या प्राणवायूंत प्रविष्ट होतात. म्हणूनच देवतांसह इंद्रियांचा सुषुप्तींत लय होतो असें उपनिषदांत सांगितलें आहे. पण ह्या स्थूलसूक्ष्मप्रपंचाचा ज्यांत लय होत असतो, अशा सुषुप्तींत प्राणवायूचा कधींच अस्त होत नाहीं. कारण श्वासरूपानें तो त्या अवस्थेंतही प्रत्यक्ष दिसत असतो; व

यावरून जाग्रतींत आपल्याला इंद्रियांच्या द्वारा जी रूपरसादि विषयांची प्रतीति येत असल्यासारखी वाटते ती खरी नव्हे; तर ती शुक्तिरौप्य-प्रतीतिप्रमाणेंच भ्रम आहे; असें समजतें. यास्तव तीन्ही अवस्थां-मध्यें लय न पावणाऱ्या प्राणाचें नियमन करणें हाच आत्मज्ञानाचा उत्तम उपाय आहे; असें वेदान्तांत सांगितलें आहे; पण चक्षुरादि इंद्रियभ्रनाचा कोठेंही उपदेश केलेला नाहीं. कारण तीं इंद्रियें कोणत्याच अवस्थेंत आत्मसाक्षात्कार करून द्यावयास समर्थ होत नाहींत. ३९

नोकस्मादार्द्रमेधः स्पृशति च दहनः किंतु शुष्कं निदाघा-
दार्द्रं चेतोनुबंधैः कृतसुकृतमपि स्वोक्तकर्मप्रजार्थैः ॥
तद्वज्ज्ञानाग्निरेतत्स्पृशति न सहसा किंतु वैराग्यशुष्कं ।
तस्माच्छुद्धो विरागः प्रथममभिहितस्तेनविज्ञानसिद्धिः ॥

टीका:—अथ वैराग्ययोगेनैव ज्ञानसिद्धिरित्यनुवदति-नोकस्मादिति । आर्द्रं जलयुक्तं एधः काष्ठं दहनोऽग्निरकस्मान्न स्पृशति किंतु निदाघशुष्कमेव स्पृशति । तद्वदनुबंधैर्भार्यापुत्रविषयैरार्द्रं चेतः स्वोक्तकर्मप्रजार्थैः कृतसुकृतमपि ज्ञानाग्निः न स्पृशति । स्वोक्तकर्म स्वाश्रमवर्णोचितं प्रजाः पुत्राः "पुत्रेणैव जय्यो नान्येन कर्मणेति" । तथा "नापुत्रस्य लोकोऽस्ति" इति श्रुतेः । तथा अर्थैः अर्थसाध्यैर्यज्ञदाना-नादिभिः कृतसुकृतमपीत्यर्थः । किंतु वैराग्यशुष्कमेव चेतः ज्ञानाग्निः स्पृशति तस्मात्कारणात् शुद्धो विरागः ऐहिकामुष्मिकविषयवितृष्णता प्रथमं आवश्यक-कर्मत्वेनाभिहितः प्रोक्तः । अनेन कृत्वा विज्ञानसिद्धिर्भवति । अत्र श्रुतिः-"न कर्मणा न प्रजया धनेन त्यागेनैके अमृतत्वमानशुः । परेण नाकं निहितं गुहायां विभ्राज-देतद्यतयो विशन्ति" ॥ ४० ॥

अन्वय:-दहन: आर्द्रं एधः अकस्मात् नो स्पृशति च किंतु निदाघात् शु-ष्कं (स्पृशति) तद्वत् अनुबन्धैः एतत् आर्द्रं चेतः स्वोक्तकर्मप्रजार्थैः कृतसुकृतं अपि ज्ञानाग्निः सहसा न स्पृशति । किंतु वैराग्यशुष्कं (स्पृशति)। तस्मात् प्रथमं शुद्धः विरागः अभिहितः (ततः) तेन विज्ञानसिद्धिः (भवति) ।

**अर्थः—अग्नि ओल्या काष्ठाला एकाएकीं स्पर्श करित नाहीं. परंतु उष्णतेनें वाळून शुष्क झालेल्या काष्ठाला तो स्पर्श करितो (जाळतो). तसेंच भार्यापुत्रादि उपाधींनीं आर्द्र झालेल्या ह्या अंतःकरणाला, विहित कर्मे, प्रजा व वित्त यांच्याद्वारा त्या अंतःकरणानें सुकृत केलें असलें तरी, ज्ञानाग्नि सहसा स्पर्श**

**करीत नाहीं. परंतु वैराग्यानें शुष्क झालेल्या अंतःकरणाला स्पर्श करितो. म्हणून प्रथमतः शुद्ध विरक्ति सांगितली आहे; आणि मग तिच्यायोगानें ज्ञानसिद्धि होते.**

विवरणः—वैराग्याच्या योगानेंच ज्ञानप्राप्ति होते असें ह्या श्लोकांत आचार्यांनीं दर्शविलें आहे. ओल्या काष्ठाला अग्नि एकदम जाळित नाहीं. पण वाळलेल्या इंधनाला तत्क्षणींच जाळून टाकितो. हें सर्वप्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें भार्यादि विषयांच्या योगानें दूषित झालेल्या अंतःकरणांत ज्ञानोदय होत नाहीं. आपल्या वर्णाला व आश्रमाला उचित अशीं संध्यावंदनादि कर्में, धर्मपत्नीपासून पुत्रोत्पत्ति, व द्रव्यसाध्य यज्ञदानादि यांच्या योगानें, एकाद्या पुरुषानें पुष्कळ पुण्य जरि संपादन केलें असलें तरी त्याचें अंतःकरण विषयासक्त असल्यामुळें त्यांतही ज्ञानाचा प्रकाश पडत नाहीं. परंतु विषयवैराग्यानें ज्या धन्य पुरुषाचें अंतःकरण रूक्ष होऊन गेलेलें असतें त्यालाच ज्ञानप्राप्ति होते. म्हणून प्रथमतः साधकानें अवश्य शुद्ध वैराग्यसंपन्न (वांति होऊन पडलेल्या अन्नाप्रमाणें विषयांविषयीं निस्तृष्ण) व्हावें; असें वेदान्तांत अनेक स्थळीं सांगितलें आहे; व असें उत्तम वैराग्य प्राप्त झालें असतां मग अनायासानें ज्ञानसिद्धि होते. ह्या विषयीं 'न कर्मणा न प्रजया॰ यतयो विशन्ति' ह्म॰ कर्मानें, प्रजेनें, किंवा वित्तानें मोक्ष प्राप्ति होत नसून केवळ विरक्तीनेंच त्याची प्राप्ति होते; अशा अर्थाची श्रुति प्रमाण आहे. ४०

यत्किंचिन्नामरूपात्मकमिदमसदेवोदितं भाति भूमौ ।
येनानेकप्रकारैर्व्यवहरति जगद्येन तेनेश्वरेण ॥
तद्वत्प्रच्छादनीयं निभृतरशनया यद्वदेव द्विजिह्व-
स्तेन त्यक्तेन भोज्यं सुखमनतिशयं मा गृधोऽन्यद्धनाद्यम् ॥

**टीकाः—अथ प्रागुक्तोपदेशक्रमे ईशावास्योपनिषदुक्तां श्रुतिं संवादयन्नाह—यत्किंचिदिति । यत्किंचिदसदेवोदितं नामरूपात्मकमिदं शुक्तिकारजतवदविवेकेन भूमौ येन भासते तथा गच्छतीति जगत्तेन कृत्वा अनेकप्रकारैर्व्यवहरति तेनेश्वरेणेदं तद्वत्प्रच्छादनीयं आच्छादनीयं । कथम् यद्वन्निभृतरशनया निश्चयेन ज्ञातया रज्ज्वा एषः प्रातिभासिकत्वेन ज्ञातः द्विजिह्वः सर्पः**

आच्छाद्यते तद्वज्जगद्भासकत्वेन च चिद्रूपत्वेन निश्चितेन परमात्मना जगदा-च्छादनीयं तेन जगदाभासेन त्यक्तेन दूरतोपास्तेन केवलाभावे प्राप्तं अनति-शयमत्युत्कृष्टं आत्यंतिकं सुखं भोज्यं परंतु अन्याद्विलक्षणं धनादिकं विषय-सुखं मा गृधः माभिकांक्षयेति उपदेशत्रयं । श्रुतिश्च– " ईशावास्यमिदꣳ सर्वं य-त्किंच जगत्यां जगत् । तेनत्यक्तेनभुंजीथामागृधः कस्यस्विद्धनं" ॥ ४१ ॥

**अन्वयः**—यत् किंचित् असत् एव उदितं इदं नामरूपात्मकं (जगत्) भूमौ येन भाति येन जगत् अनेकप्रकारैः व्यवहरति तेन ईश्वरेण यद्वदेव निभृतरशनया द्विजिह्वः तद्वत् प्रच्छादनीयं । तेन त्यक्तेन (च) अनतिशयं सुखं भोज्यं । अन्यत् धनाद्यं मा गृधः ।

**अर्थः—जें हें कांहीं मिथ्याच उत्पन्न झालेलें नामरूपात्मक जगत् या व्यवहारांत ज्याच्यामुळें भासतें, ज्याच्यायोगानें प्राणी अनेक प्रकारें व्यवहार करितात, त्या ईश्वरानें, जशी रज्जु सर्पाला झांकून टाकिते, तसें हें झांकून टाकावें. (सारांश ह्याप्रमाणें) जगदाभासाचा त्याग करून अत्युत्तम सुखाचा उपभोग घ्यावा व धनादि अन्य विषयांची इच्छा करूं नये.**

**विवरणः**—पूर्व श्लोकांत प्रथमतः वैराग्यसंपत्ति व नंतर त्यापासून ज्ञान असा क्रम सांगितला आहे. आतां त्या उपदेशक्रमाला आधार असणाऱ्या 'ईशावास्यमिदꣳ स० कस्यस्विद्धनं' इत्यादि ईशावास्य श्रुतीचा येथें अनुवाद करितात. शिंपीच्या ठिकाणीं भ्रमानें जसा रुप्याचा उदय होतो, तसेंच हें केवळ स्वाज्ञानानें नामरूपांनीं व्यक्त झालेलें जग ज्याच्यामुळें प्रतीतीला येतें व ज्याच्यामुळें यांतील सर्व जन व्यवहार करितात, त्या ईश्वराच्या योगानें हें साधकानें झांकावें. म० व्यवहारांत दोरीचें ज्ञान न झाल्यानें हा सर्प आहे अशी आपणाला प्रतीति येते; पण दोरीचें यथार्थ ज्ञान झालें असतां जसा तो सर्प दोरींत लोपून जातो (दोरीनें त्याला झांकल्यासारखें आपणाला वाटतें) तसेंच हें भ्रामक जग ब्रह्मांत झांकून टाकावें. (हें सर्व जग, सर्वप्रवर्तक जें ब्रह्म, तद्रूप आहे असें पाहावें.) आणि अशा भावनेनें सर्व जगदाभास सर्वथैव नष्ट झाला असतां, सर्वोत्कृष्ट सुखाचा यथेच्छ अनुभव घ्यावा. पण धनादि अन्य विषयांची पुनः कधींही इच्छा करूं नये. कारण त्यांच्यायोगानें साधक स्वरूपज्ञानापासून

भ्रष्ट होतो. सारांश १ ईश्वरमय सर्व जग पहावें; २ त्यामुळें अत्यंत सुख भोगावें; व ३ विषयांची इच्छा करूं नये; असे तीन उपदेश या श्लोकांत केले आहेत. ॥४१॥

जीवन्मुक्तिर्मुमुक्षोः प्रथममथ ततो मुक्तिरात्यंतिकी च ।
तेऽभ्यासज्ञानयोगाद्गुरुचरणकृपापांगसंगेन लब्धात् ॥
अभ्यासोऽपि द्विधा स्यादधिकरणवशाद्दैहिको मानसश्च ।
शारीरस्त्वासनाद्यो ह्युपरतिरपरो ज्ञानयोगः परोक्तः ४२

टीकाः—अथ द्विधा मोक्षोपायमाह—जीवन्मुक्तिरिति । उपरतिः प्रपंचोपशमः शेषं स्पष्टम् ॥ ४२ ॥

अन्वयः—अथ मुमुक्षोः प्रथमं जीवन्मुक्तिः ततः आत्यंतिकी च मुक्तिः। ते गुरुचरणकृपापांगसंगेन लब्धात् अभ्यासज्ञानयोगात् (भवतः) अभ्यासः अपि अधिकरणवशात् दैहिकः मानसः च इति द्विधा स्यात्। आसनाद्यः शारीरः अपरः हि उपरतिः। ज्ञानयोगः परोक्तः हि ।

अर्थः-प्रथमतः मुमुक्षूला जीवन्मुक्ति, आणि नंतर निरतिशय मुक्ति प्राप्त होते; व त्या दोन मुक्ति, गुरुचरणकृपाकटाक्षाच्या योगानें प्राप्त झालेल्या अभ्यासानें व ज्ञानयोगानें प्राप्त होतात. आधाराच्या योगानें दैहिक व मानसिक असा दोन प्रकारचा अभ्यास आहे. यम, नियम, आसन. इत्यादि शरीराचा, व शांति हा मनाचा अभ्यास होय. ज्ञानयोग हा सर्वांपेक्षां श्रेष्ठ सांगितला आहे.

विवरणः-आतां दोन प्रकारचा मोक्षोपाय सांगतात. मुमुक्षु पुरुषाला प्रथमतः जीवन्मुक्ति प्राप्त होते. जीवन असतां मुक्ताप्रमाणें निःसंग असणें हाच जीवन्मोक्ष होय. भगवद्गीतेमध्यें दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं भगवंतांनीं अशा जीवन्मुक्त पुरुषाला स्थितप्रज्ञ असें म्हटलें आहे. प्राक्तन भोग संपल्यावर देहाचा त्याग करून, शुद्धोदक शुद्धोदकांत टाकिलें असतां जसें तें तद्रूप होऊन जातें त्याप्रमाणें, तो मुमुक्षु ब्रह्मरूप होऊन जातो. ह्यालाच निरातिशय मुक्ति असें म्हणतात; व ह्या दोन्हीही मुक्ति, पूज्य गुरूंच्या कृपाकटाक्षानें प्राप्त झालेला

अभ्यास, ( एकच क्रिया पुनः पुनः करणें, ) व ज्ञानयोग, या दोन उपायांनीं प्राप्त होतात. तो अभ्यास देहाच्या आश्रयानें व मनाच्या आश्रयानें होत असतो. यम, नियम, आसन, प्राणायाम हा देहाच्या योगानें होणारा अभ्यास, व मनाच्या सर्वही वृत्ति शांत झाल्यामुळें जो सर्व प्रपंचाचा उपशम होत असतो, तो दुसरा मानसिक अभ्यास होय. वस्तुतः आसनादिसिद्धि व प्रपंचाचा उपशम हा अभ्यास नसून, हीं दोन्हीं अभ्यासाचीं फळें आहेत; व आसनादिक सिद्धि होण्याकरितां योगशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें पुनः पुनः प्रयत्न करणें हा खरा अभ्यास होय. ज्ञानयोग या द्विविध अभ्यासाहून श्रेष्ठ आहे, असें सांगितलें आहे; व तो या अभ्यासाच्या द्वाराच प्राप्त होतो. ४२

सर्वानुन्मूल्य कामान् हृदि कृतनिलयान्क्षिप्तशंकूनिवोच्चै-
र्दीर्यद्देहाभिमानस्त्यजति चपलतामात्मदत्तावधानः ॥
यात्यूर्ध्वस्थानमुच्चैः कृतसुकृतभरो नाडिकाभिर्विचित्रं ।
नीलश्वेतारुणाभिःस्रवदमृतभरं गृह्यमाणात्मसौख्यः ४३

टीकाः—अथ प्रथममुद्दिष्टां जीवन्मुक्तिमाह—सर्वानिति । हृदि कृतनिलयानंनकल्पपर्यंतं संस्काररूपेण हृदि स्थितान् सर्वान्कामान् मनोरथानुन्मूल्य समूलमुत्खातान् कृत्वा दीर्यद्देहाभिमानः सन् चपलतां त्यजति अहंममताभिमानमुत्सृज्य मन त्यजति । किंभूतः आत्मदत्तावधानः आत्मनि दत्तं अवधानं आवरतानुसंधानं येन स तथा । एवं तथाभूतः सन्नुच्चैरूर्ध्वस्थानं सर्वोत्कृष्टं ब्रह्मरंध्रं सुषुम्ना विवरेण याति । किंभूतं स्थानं नीलश्वेतारुणाभिर्नाडिकाभिर्विचित्रं सहस्रदलं चक्रं । पुनः किंभूतं स्रवदमृतभरं कुंडलीमुखनिर्भेदनामृतं स्रवतीत्यर्थः । किंभूतो जीवन्मुक्तः कृतसुकृतभरः कृतानेकपुण्यपुंजः पुनः किंभूतः गृह्यमाणात्मसौख्यः ब्रह्मैवाहमस्मीति किंचिदुर्वरिताहंकारशेष इत्यर्थः । अथश्रुतिः—कंडिकाचतुष्टयं—"यदा सर्वे प्रमुच्यंते कामा येऽस्य हृदि स्थिताः । अथमर्त्योमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते १ तद्यथाहिनिर्ल्वयनी वल्मीके मृता प्रत्यस्ता शयीतैवमेवेदं शरीरं शेतेथायमनस्थिकोशरीरः प्राज्ञआत्मा ब्रह्मैव लोकएव सम्राडिति होवाच याज्ञवल्क्यः २ तदप्येते श्लोकाः भवंति । अणुः पंथा विततः पुराणो मांस्पृष्टोनुवित्तो मयैव । तेन धीरा अपियंति ब्रह्मविद उत्क्रम्य स्वर्गं लोकमितो विमुक्ताः ३ तस्मिन् शुक्लमुत नीलमाहुः पिंगलं हरितं लोहितं च । एष पंथा ब्रह्मणा हानुवित्तस्तेनेति ब्रह्मवित्तैजसः पुण्यकृच्च" ४ ॥ ४१ ॥

**अन्वयः—उच्चैः क्षिप्तशङ्कुः इव हृदिकृतनिलयान् सर्वान् कामान् उन्मूल्य दीर्णदेहाभिमानः आत्मदत्तावधानः ( च ) सन् चपलतां त्यजति । (तथाभूतः सन् ) कृतसुकृतभरः पृच्छमानात्मसौख्यः नीलश्वेतारुणाभिः नाडिकाभिः विचित्रं स्रवदमृतभरं उच्चैः ऊर्ध्वस्थानं याति ।**

**अर्थः— जोरानें ठोकलेल्या खिळ्याप्रमाणें हृदयामध्यें घर करून राहिलेल्या सर्वही इच्छांना काढून टाकून ज्यानें देहाभिमान सोडला आहे, व ज्यानें आत्मानुसंधान ठेविलें आहे, असा पुरुष मनाची चपलता टाकितो; व याप्रमाणें वृत्तिरहित होऊन ज्यानें पुष्कळ पुण्य केलें आहे व जो आत्मसौख्याचा अनुभव घेत आहे, असा जीवन्मुक्त, नील, श्वेत व अरुण अशा नाड्यांनीं विचित्र व ज्याच्यापासून अमृतस्राव होत असतो अशा सर्वोत्कृष्ट ब्रह्मस्थानाला जातो.**

**विवरणः**—पूर्व श्लोकांत सांगितलेल्या दोन मुक्तींपैकीं जीवन्मुक्ति कोणती हें येथें सांगतात. ज्याप्रमाणें तीक्ष्ण अग्राचा खिळा जोरानें भूमीमध्यें ठोकिला असतां तो पुष्कळ खोल जाऊन तेथें घर करून बसतो, त्याप्रमाणें अनेक कल्पपर्यंत संस्काररूपानें (बीजरूपानें) हृदयामध्यें दृढ होऊन राहिलेल्या सर्व मनोरथांना समूळ काढून टाकून जो मुमुक्षु देहाविषयीं निरभिमान झाला आहे, व जो आत्म्याच्या ठिकाणीं अंतःकरणाचें अवधान ठेऊन राहतो, त्याच्या मनाची विक्षिप्तावस्था ( चांचल्य ) सर्वथैव नष्ट होते. मनाची चंचलता गेली असतां प्राण्याच्या हातून राजस व तामस कृत्यें होत नाहींत. त्यामुळें त्याचा पुष्कळ पुण्यसंचय होतो. पण देहसंबंधामुळें किंचित् अभिमान राहिल्यानें मी आत्मानुभवी आहें, असें त्याला वाटत असतें. सारांश आत्मानुभवी जीवन्मुक्त पुरुष निळ्या, पांढऱ्या व आरक्त नाड्यांनीं विचित्र, व कुंडलिनीचा भेद झाल्यामुळें ज्याच्यापासून अमृताचा स्राव होत असतो अशा सर्व श्रेष्ठ ब्रह्मरंध्राला सुषुम्ना नाडीच्या द्वारा जातो. या प्रतिपादनाला “यदा-सर्वे प्रमुच्यन्ते०” इत्यादि बृहदारण्यकांतील चार कंडिका आधार आहेत. त्यांचें तात्पर्यः—ह्या मुमुक्षु पुरुषाच्या अंतःकरणांतील सर्व वासना नष्ट झाल्या असतां तत्क्षणींच तो ( मरणधर्मवान् ) अमृत

(मरणधर्मरहित) होतो; व त्याला या देहांतच ब्रह्मानुभव येतो १ याज्ञवल्क्य जनकाला म्हणालेः-हे राजा, जशी सर्पाची जीर्ण त्वचा (कात) सर्पाच्या बिळांत सर्पाप्रमाणेंच पडलेली असते व ती निश्चेष्ट असली तरी दुरून पाहाणाराला सर्पासारखीच भासते, पण दंशादि सर्पाच्या क्रिया मात्र करीत नाहीं; तसाच हा जीवन्मुक्त पुरुष शरीरांत राहूनही कांहीं क्रिया करीत नाहीं व स्थूल सूक्ष्म देहाविषयीं अभिमानरहित होऊन रहातो. त्याच्याकडे पाहणारांना तो इतरांप्रमाणेंच व्यवहारी आहे असें वाटतें, पण वस्तुतः तो तसा नसतो. २ गुरूपदेशद्वारा प्राप्त झालेल्या उत्तम, व सुषुम्नानाडीरूप असल्यामुळें, अति सूक्ष्म मार्गाचें मी अनुष्ठान केलें. कारण ह्या मार्गाच्या अवलंबनानें धीर ब्रह्मज्ञानी पुरुष संसारापासून मुक्त होऊन ब्रह्मरन्ध्र नांवाच्या उत्तम पदाला जातात ३ शुक्ल, नील इत्यादि अनेक रंगांच्या नाड्यांनी तें स्थान विचित्र झालें आहे. ह्या सुषुम्ना मार्गाचेंच अनुष्ठान ब्रह्मदेवानें मजकडून करविलें; व त्याच मार्गानें पुण्याचरणी आणि विराट्रूप झालेला ब्रह्मज्ञानी जातो. ४. ॥ ४३ ॥

प्रापश्यद्विश्वमात्मेत्ययमिह पुरुषः शोकमोहाद्यतीतः ।
शुक्रं ब्रह्माध्यगच्छत्स खलु सकलवित्सर्वसिध्यास्पदं हि॥
विस्मृत्य स्थूलसूक्ष्मप्रभृतिवपुरसौ सर्वसंकल्पशून्यो ।
जीवन्मुक्तस्तुरीयं पदमधिगतवान्पुण्यपापैर्विहीनः॥ ४४॥

टीकाः—अस्मिन्नर्थे ईशावास्योपनिषदुक्तां श्रुतिं संवादयति ॥ अयं पुरुष इहास्मिन् देहे वर्तमानः सन् विश्वं आत्मेति प्रापश्यत् पश्यति स्म विश्वं विश्वाकारेण नापश्यत्किन्त्वात्माकारेणैव । किंभूतः शोकमोहाद्यतीतः एवंविधः सन् शुक्रं शबलं ब्रह्म हिरण्यगर्भाख्यं अध्यगच्छत् अधिगतवान् । एवं हिरण्यगर्भत्वं प्राप्तः सकलवित्सर्वज्ञो जातः । तथा सर्वसिद्धीनामणिमाद्यष्टानां आस्पदं स्थानं च जातः । तथासौ पुरुषः स्थूलसूक्ष्मप्रभृति वपुर्विस्मृत्य सर्वसंकल्पशून्यः सन् तुरीयं पदमधिगतवान् आत्मसुखमनुभवति स्म । ततःपुण्यपापैर्विहीनः सकलकर्मातीतः । अत्र श्रुतिः—सार्धकंडिका-- "यस्मिन्सर्वाणि भूतान्यात्मैवाभूद्विजानतः । तत्र को मोहः कः शोक एकत्वमनुपश्यतः । स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरꣳ शुद्धमपापविद्धम्" ॥ ४४ ॥

अन्वयः—इह शोकमोहाद्यतीतः अयं पुरुषः विश्वं आत्मा इति प्रापश्यत्। (तथा) शुक्रं ब्रह्म अभ्यगच्छत्। (तथा) सः खलु सकलवित् सर्वसिद्ध्यास्पदं हि (जातः तथा) असौ स्थूलसूक्ष्मप्रभृति वपुः विस्मृत्य सर्वसंकल्पशून्यः सन् तुरीयं पदं अधिगतवान्। (ततः) पुण्यपापैः विहीनः जीवन्मुक्तः (भवति)

अर्थः—या देहामध्यें असतांच सर्व शोक व मोह यांचा त्याग करून हा पुरुष हें विश्व आत्मा आहे, असें पहातो. त्याचप्रमाणें (हिरण्यगर्भ नांवाच्या) शबल ब्रह्माची त्याला प्राप्ति होते. खरोखर तो सर्वज्ञ पुरुष सर्व सिद्धींचें स्थानच होतो. तसेंच हा पुरुष स्थूल सूक्ष्म इत्यादि शरीरांस विसरून सर्वही मनोवासनांचा त्याग करून तुरीय पदाची प्राप्ति करून घेतो. नंतर तो पुण्य-पापरहित होऊन जीवन्मुक्त होतो.

विवरणः—पूर्वनिर्दिष्ट जीवन्मुक्ताविषयीं प्रतिपादन करणाऱ्या "यस्मिन्त्सर्वाणिभुतानि०" ह्या ईशावास्योपनिषद् श्रुतीचा अनुवाद करून आचार्य सांगतात. हा पुरुष ह्या देहामध्यें असतांनाच सर्वही सांसारिक शोक व मोह ह्यांचा त्याग करून हें सर्वही विश्व आत्माच (ह्मणजे ब्रह्मरूप) आहे असें पहातो; ह्मणजे त्या सूक्ष्मदृष्टि पुरुषाचा मोह सर्वथैव नष्ट झाल्यामुळें, केवळ भ्रमानें भासणारें हें जग त्याला जगद्रूपानें न दिसतां ब्रह्मरूपानें दिसतें; व अभ्यासानें त्याची दृष्टि ह्या सर्व सृष्ट पदार्थांत अत्यंत गुप्त असणाऱ्या तत्त्वाला पहाण्याइतकी सूक्ष्म झाल्यामुळें सर्वही जग स्वात्मरूप आहे असें तो पहातो. म्हणूनच हिरण्यगर्भ नांवाच्या शबल ब्रह्माची त्याला प्राप्ति होते. ह्मणजे तो स्वतःच हिरण्यगर्भ (सूत्रात्मा) होतो. त्या-मुळेंच त्याचे ठिकाणीं सर्वज्ञत्व येतें व अणिमा, लघिमा इत्यादिक यौगिक अष्ट सिद्धि त्याला प्राप्त होतात. त्याचप्रमाणें हा पुरुष स्थूल, सूक्ष्म आणि कारण हीं शरीरें विसरून व सर्वही शुभाशुभ वासना सोडून शुद्ध व निरंतर अशा आत्मसुखाचा अनुभव घेतो. नंतर इतक्या सर्व गुणांनीं युक्त असणाऱ्या ह्या जीवन्मुक्त पुरुषाला पुण्यपाप स्पर्शही करीत नाहीं. ह्मणजे त्याचीं संचित व क्रियमाण कर्में नष्ट होतात. वर निर्दिष्ट केलेल्या ईशोपनिषद् श्रुतीचें बहुतेक तात्पर्य ह्या श्लोकामध्यें आलेंच आहे. ह्मणून विस्तार करीत नाहीं. ॥ ४४॥

य: सत्त्वाकारवृत्तौ प्रतिफलति युवा देहमात्रावृतोपि ।
तद्धर्मैर्बाल्यवार्ध्यादिभिरनुपहतः प्राण आविर्बभूव ॥
श्रेयान्साध्यस्तमेतंसुनिपुणमतयःसत्यसंकल्पभाजो-
प्यभ्यासाद्देवयंतः परिणतमनसासाकमूर्ध्वं नयन्ति ४५

टीका:-अथ जीवन्मुक्तस्य मनः प्राणा ऊर्ध्वं गच्छत इत्येतस्मिन्नर्थे छन्द सार्वाणां श्रुतिं संवादयति-य इति। य आत्मा सत्त्वाकारवृत्तौ प्रतिफलति स युवा प्राणः आविर्बभूव सत्त्वगुणोपपन्नो जीव इत्यर्थः। स देहमात्रावृतोपि बाल्यवार्द्धक्यादिभिस्तद्धर्मैरनुपहतः सन् श्रेयान् कल्याणरूपस्तथा साध्यः साधयितुं उत्तमां गतिं प्रापयितुं योग्यः। तमेतं प्राणं सुनिपुणमतयः कुशलबुद्धयः सत्ये परमात्मन्यपि संकल्पो मनोगतिर्येषां ते तथाविधाः पूर्वोक्ताभ्यासाद्देवत्वं प्राप्तुमिच्छन्तः परिणतमनसा विविक्तेन मनसा सह ऊर्ध्वं नयंति। अत्र श्रुतिः तृतीयाष्टके "युवा सुवासाः परिवीत आगात्स उ श्रेयान्भवति जायमानः तं धीरासः कवय उन्नयंति स्वाध्यो १ मनसा देवयंतः।"॥४५॥

अन्वयः—यः युवा सत्त्वाकारवृत्तौ प्रतिफलति प्राणः आविर्बभूव (सः) देहमात्रावृतः अपि तद्धर्मैः बाल्यवार्द्धक्यादिभिः अनुपहतः सन् श्रेयान् साध्यः (अस्ति) तं सत्यसंकल्पभाजः सुनिपुणमतयः अपि अभ्यासात् देवयन्तः परिणतमनसा साकं उर्ध्वं नयन्ति ।

अर्थः—जो आत्मा अंतःकरणांत प्रतिबिंबित होतो, तोच जीव होय. देहेंद्रियांनीं तो आच्छादित असला तरी त्यांच्या बाल्य, वार्द्धक्य इत्यादि धर्मांनीं लिप्त होत नसून कल्याणरूप व साध्य आहे. त्याला कुशल बुद्धीचे, केवल ब्रह्मविषयींच संकल्प करणारे व अभ्यासानें देवत्वप्राप्ति करून घेण्याची इच्छा करणारे पुरुष एकाग्र अंतःकरणासहवर्तमान ऊर्ध्वलोकीं (ब्रह्मरंध्रांत) नेतात.

विवरण:— आतां या श्लोकामध्यें जीवन्मुक्ताचें मन व प्राण हीं अधोगतीला न जातां उर्ध्व गतीला जातात, असें ऋग्वेदस्थ "युवा सुवासाः परिवीत०" इत्यादि श्रुतीच्या आधारानें श्रीमत् आचार्य सांगतात. जो आत्मा पंचमहाभूतांच्या सत्त्वगुणांपासून उत्पन्न झालेल्या अंतःकरणांत प्रतिबिंबित होतो तोच जीव होय. तो देहेंद्रियांनीं वेष्टित झाला तरी बाल्य, यौवन इत्यादि देहधर्म; व अंधत्व, बधिरत्व इत्यादि इंद्रियधर्म यांनीं लिप्त होत नाहीं. तो अत्यंत कल्याणरूप असून

त्याची प्राप्ति करून घेतां येते ( तद्रूप होतां येतें. ) अशा त्या प्राणाला, सूक्ष्मबुद्धि पंडित, सत्य अशा ब्रह्माचे ठिकाणीं मनोवृत्ति ठेवणारे उत्तम साधक, व पूर्वी बेचाळीसावे श्लोकांत सांगितलेल्या द्विविध अभ्यासानें देवत्व प्राप्ति करून घेणारे मुमुक्षु, संस्कारांच्या योगानें अत्यंत निर्मल झालेल्या अंतःकरणासहवर्तमान ऊर्ध्वलोकीं नेतात म्हणजे सुषुम्नानाडीच्याद्वारा ब्रह्मरंध्रांत नेतात. ॥ ४५ ॥

प्रायोकामोस्तकामो निरतिशयसुखायात्मकामस्तदासौ ।
तत्प्राप्तावाप्तकामःस्थितचरमदशस्तस्य देहावसाने ॥
प्राणा नैवोत्क्रमंति क्रमविरतिमिताःस्वस्वहेतौ तदानीं ।
क्वायं जीवो विलीनो लवणमिव जलेखंड आत्मैव पश्चात्

टीका—अथ निर्वाणमुक्तिमाह-प्राय इति । प्राङ्निरूपितो जीवन्मुक्तः पुरुषः प्रायः बाहुल्येन अकाम एव तिष्ठति यतोऽस्तकामः ।आत्माकारस्य मनसः विक्षेपाभावात् । परंतु निरतिशयसुखं परमानंदः तदर्थं आत्मकामः आत्माकारः कामो यस्य स तथा अथ तत्प्राप्तौ आप्तकामः परमानंदे ब्रह्मानंदसागरमग्नो भूतवान् । तदुक्तं भगवता—"यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः" किंभूतः स्थितचरमदशः स्थिता चरमा प्रांत्यावस्था यस्य । अथ तदानीतनस्वभावमाह-तस्येति । तस्य पुरुषस्य देहावसाने प्राप्ते सति प्राणाः नैव उत्क्रमंति उत्क्रमणं हि पुनर्देहारंभाय कल्पते प्रकृते तु तथा न भवति किंतु स्वस्वहेतौ स्वकारणे क्रमविरतिं क्रमेण नाशं इताः प्राप्ताः । तदानीं क्वायं जीवदशापन्नःक्वास्ति न क्वापीत्यर्थः । यतो जले लवणमिव विलीनः लयं प्राप्तः तदा पश्चादखंड आत्मैव तिष्ठति । अवच्छेदकाभावात् । " ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येतीति " श्रुतेः ।जीवः प्रथमं ब्रह्मैवासीत् मध्ये जीवदशां प्राप्तः पुनः ब्रह्मत्वमेवाप्नोतीत्यर्थः ॥ ४६ ॥

अन्वयः—( जीवन्मुक्तःपुरुषः ) प्रायः अकामः (यतः) अस्तकामः । तदा असौ निरतिशयसुखाय आत्मकामः । तत् प्राप्तौ स्थितचरमदशः सन् आप्तकामः । तस्य देहावसाने प्राणाः नैव उत्क्रमन्ति ( किंतु ) स्वस्वहेतौ क्रमविरतिं इताः ( भवन्ति ) तदानीं क अयं जीवः ( न क्वापि यतः ) जले लवणं इव विलीनः । पश्चात् अखण्डः आत्मा एव ।

**अर्थः**--जीवन्मुक्त पुरुष बहुतकरून निष्काम असतो. कारण त्याच्या सर्वही तृष्णा नष्ट झालेल्या असतात. त्यावेळीं हा पुरुष परमानंदप्राप्ति होण्याकरितां आत्मप्राप्तीची इच्छा करितो व ती प्राप्ति झाली असतां त्याची अंत्यावस्था सिद्ध होऊन

**त्याच्या सर्वही तृष्णा पूर्ण होतात. मरणसमयीं त्याचे प्राण निघून जात नाहींत. परंतु आपल्या आपल्या कारणांमध्यें ते क्रमानें लीन होतात. तेव्हां हा जीव कोठें असतो? अर्थात् कोठेंही नाहीं. कारण जलामध्यें लवण जसें विरून जातें, तसा तो स्वकारणामध्यें लीन होतो; व असें झाल्यानंतर अखंड आत्मरूपानेंच रहातो.**

विवरण:—आतां निर्वाण मुक्ति कशी प्राप्त होते तें सांगतात. पूर्वी ज्या जीवन्मुक्ताचें निरूपण केलें तो जीवन्मुक्त पुरुष नियमानें नाहीं तरी बहुतकरून निष्कामच असतो. कारण दृढाभ्यासानें आत्मरूप झालेल्या मनाची विक्षेपशक्ति नाहींशी झाल्यामुळें तज्जन्य सर्व तृष्णाही नाहींशा होतात. असें आहे तरी परमानंदप्राप्ति होण्याकरितां आत्मज्ञानाची त्याला इच्छा असते; व ह्या परमानंदरूप आत्म्याची प्राप्ति झाली असतां हा पुरुष निरिच्छ होतो. कारण परमानंदामध्यें बाकीच्या सर्व क्षुद्र आनंदांचा अंतर्भाव होणें साहजिक आहे. भगवानांनीही "यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः। ज्या परमानंदाची प्राप्ति झाली असतां त्याहून दुसरा एकादा अधिक लाभ आहे असें त्याला वाटत नाहीं." असें म्हटलें आहे. नंतर त्याची अगदीं शेवटची अवस्था सिद्ध होते; म्हणजे देहसंबंध असल्यामुळें मुख्य मुक्तीहून थोड्याशा कमी अवस्थेमध्यें तो राहतो. अशा ह्या जीवन्मुक्ताचा मरणकाल प्राप्त झाला असतां त्याचे प्राण हें शरीर सोडून जात नाहींत. पुनः जन्म घेण्याकरितां संचिताचा सांठा बरोबर घेऊन ज्यावेळीं मन देहाला सोडून जातें, तेव्हां त्याला प्राणोत्क्रमण असें म्हणतात. परंतु जीवन्मुक्त पुरुषाचें सर्व संचित व क्रियमाण ज्ञानाग्नीनें दग्ध झाल्यामुळें त्याला पुनर्जन्म घ्यावयाचा नसतो; म्हणून त्याच्या प्राणांचें उत्क्रमणही होत नाहीं. तर त्यांची ज्या ज्या तत्त्वापासून उत्पत्ति झालेली असते त्या त्या तत्त्वामध्यें ते उत्पत्तीच्या क्रमानेंच लीन होतात. त्यावेळीं मग हा जीव कोठून राहाणार? कारण उदकांत जसें लवण लीन होतें, तसाच हा स्वतःच्या उपादानकारणांत लीन होतो. मग हा जीव, आणि हा आत्मा, असा भेद

पाडणारी त्याची उपाधि नष्ट झाल्यामुळें तो स्वतः अखण्ड आत्माच होऊन राहतो. 'ब्रह्मैव सन् ब्रह्माप्नोति॰ जीव प्रथमतः ब्रह्मच असून मध्येंच जीवदशेंत येतो व पुनः ब्रह्माला मिळतो.' अशी श्रुतीही आहे. ॥ ४६ ॥

पिण्डीभूतं यदंतर्जलनिधिसलिलं याति तत्सैंधवाख्यं ।
भूयः प्रक्षिप्तमस्मिन्विलयमुपगतं नामरूपं जहाति ॥
प्राज्ञस्तद्वत्परात्मन्यथ भजति लयं तस्य चेतो हिमांशौ ।
वागग्नौ चक्षुरर्के पयसि पुनरसृग्रेतसी दिक्षु कर्णौ ॥४७॥

टीका—अथ लवणमिव जल इत्येतद्दृष्टांतं विशदयन्नाह—स्पष्टोर्थः । अत्र श्रुतिः—"यथा सैंधवखिल्य उदके प्रास्त उदकमेवानुविलीयेत न हास्योद्ग्रहणायेव स्याद्यतो यतस्त्वाददीत लवणमेवैवं वा अरे इदं महद्भूतमनंतमपारं विज्ञानघन एवैतेभ्यो भूतेभ्यः समुत्थाय तान्येवानुविनश्यति न प्रेत्य संज्ञास्तीत्यरे ब्रवीमीति होवाच याज्ञवल्क्यः" तथा च "याज्ञवल्क्येति होवाच । यत्रास्य पुरुषस्य मृतस्याग्निं वागप्येति वातं प्राणश्चक्षुरादित्यं मनश्चंद्रं दिशः श्रोत्रं पृथिवीं शरीरमाकाशमात्मौषधीर्लोमानि वनस्पतीन्केशा अप्सु लोहितं च रेतश्च निधीयते क्वायं तदा पुरुषो भवतीत्याहर सौम्य हस्त आहर" ॥४७॥

अन्वयः—यत् पिण्डीभूतं अंतर्जलनिधिसलिलं तत् सैन्धवाख्यं याति । भूयः (तत्) अस्मिन् प्रक्षिप्तं विलयं उपगतं सत् नामरूपं जहाति । तद्वत् प्राज्ञः परात्मनि लयं भजति । अथ तस्य चेतः हिमांशौ वाक् अग्नौ चक्षुः अर्के पुनः असृग्रेतसी पयसि कर्णौ दिक्षु विलयं (भजतः)

अर्थः—जें शुष्क होऊन खड्यासारखें घट्ट झालेलें समुद्राचें पाणी, त्यालाच सैंधव (मीठ) असें म्हणतात; व तेंच पुनः पाण्यांत टाकिलें असतां विरघळून जाऊन आपलें नामरूप सोडितें. त्याचप्रमाणें जीवात्मा परमात्म्याचे ठिकाणीं लय पावतो. तसेंच क्रमानें त्याचें अंतःकरण चंद्रामध्यें, वाणी अग्नीमध्यें, नेत्र सूर्यामध्यें, रक्त व रेत तर उदकामध्यें, आणि कर्ण दिशांमध्यें लय पावतात.

विवरणः—मागच्या श्लोकांतील लवणाचा दृष्टांत आतां येथें स्पष्ट करितात. समुद्रांतील उदकाचाच सैंधव हा एक विकार आहे. पण तो सैंधवरूपानें भासूं लागला असतां त्याचें पूर्व नामरूप जाऊन, लवण हें नांव, पांढरें रूप व शुष्क खड्यासारखा आकार हीं

त्याला येतात. म्हणजे याची उत्पत्ति उदकापासून झाली असेल असें जरा सुद्धां कोणाला वाटत नाहीं. पण तेंच लवण कारणभूत उदकांत टाकिलें असतां पुनः आपल्या मूळच्या रूपाला मिळून आपलें नामरूप टाकितें. तसेंच प्राज्ञ (मुख्यप्राण, प्रत्यगात्मा) सच्चिदानंदस्वरूपांत मिळतो; व त्याचें नाम, रूप, वर्ण, आश्रम इत्यादि सर्व नष्ट होतात; आणि असें झालें असतां त्या प्रत्यगात्म्याला जीवत्व प्राप्त करून देणारें अंतःकरण, वाणी, नेत्र, रक्त, रेत इत्यादिकांचा त्यांच्या त्यांच्या कारणामध्यें लय होतो. सारांश ज्याप्रमाणें उदकांत टाकिलेला मिठाचा खडा त्यांत विरून गेला असतां पुनः बाहेर काढून पृथक्पणें दाखवितां येत नाहीं, त्याचप्रमाणें चित्तादिक उपाधींचा लय होऊन प्रत्यगात्मा स्वस्वरूपाला जाऊन मिळाला असतां त्याला पुनः जीवत्व दशा प्राप्त होत नाहीं. बृहदारण्यकोपनिषदामध्यें भगवान् याज्ञवल्क्यांनीं मैत्रेयी नामक आपल्या ज्येष्ठ पत्नीला हाच जललवणाचा दृष्टांत देऊन उपदेश केला आहे. त्याचप्रमाणें आर्तभाग नामक जरत्कारुपुत्रानें—"जर जीवन्मुक्त पुरुष मृत झाला असतां, त्याची वाणी अग्निमध्यें, नेत्र सूर्यामध्यें, मन चंद्रामध्यें, कर्ण दिशांमध्यें, इत्यादि आपल्या म्हणण्याप्रमाणें स्वस्वकारणामध्यें प्रविष्ट होत असतील तर त्यावेळीं हा जीव कोठें राहतो"—असा याज्ञवल्क्यांस प्रश्न केला आहे. शिवाय ऐतरेयोपनिषदामध्यें अग्नि वाणी होऊन मुखांत, वायु प्राण होऊन नासिकेमध्यें, आदित्य चक्षु होऊन नेत्रांमध्यें, दिशा श्रोत्र होऊन कर्णामध्यें, ओषधि व वनस्पति लोम होऊन त्वचेमध्यें व आप रेत होऊन शिश्नामध्यें प्रविष्ट होतें, असें स्पष्ट सांगितलें आहे. ॥ ४२ ॥

क्षीरान्तर्यद्वदाज्यं मधुरिमविदितं तत्पृथग्भूतमस्मा-
द्भूतेषु ब्रह्म तद्वद्व्यवहृतिविदितं श्रांतविश्रांतिबीजम् ॥
यं लब्ध्वा लाभमन्यत्तृणमिव मनुते यत्र नोदेति भीतिः।
सान्द्रानन्दं यदन्तःस्फुरति तदमृतं विद्धयतो ह्यन्यदार्तम्

टीकाः—अथ सर्वं विश्वं आत्मसंबंधेनैव चलतीत्याह—क्षीरांतरिति । यद्वत् क्षीरांतः दुग्धमध्ये आज्यं घृतमस्तीति मधुरिमविदितं मधुरिम्णा माधुर्येण विदितं ज्ञातं अथ तद्घृतं अस्मात्क्षीरात्पृथग्भूतं भिन्नं मथनाज्ज्ञातं यतः पुनः घृतं क्षीरांतर्निक्षिप्तं सद्दुग्धत्वं नाप्नोति तद्वद्भूतेषु ब्रह्मास्तीति व्यवहृतिः व्यवहारः तेन विदितं तच्च भूतापेक्षया भिन्नं । यतः श्रांतविश्रांतिबीजं श्रमयुक्तस्य श्रांतस्य पुरुषस्य सुषुप्तौ या विश्रांतिः यो विश्रामः तस्य बीजं कारणं यतः यं लब्ध्वा प्राणी लाभमन्यत्तृणमिव मनुते तथा यत्र यस्मिन्ब्रह्मणि भीतिः नोदेति अद्वैतत्वात् । “ द्वितीयाद्वै भयं भवतीति ” श्रुतेः । यतः सुषुप्तौ स्थूलसूक्ष्मप्रपंचलयं मनः केवलं आत्माकारं भवति एवं सांद्रानंदं वस्तु यदंतःस्फुरति तदमृतं विद्धि जानीहि अतोऽन्यत्पदार्थजातं आर्तं बाधितं शुक्तिकारजतवद्युत्तरक्षणे बाधदर्शनात् । अयमर्थः—केवलमुदकरूपे दुग्धे उदकादिलक्षणं यन्माधुर्यं तदंतर्गतस्य आज्यस्यैव संभवति एवमसद्रूपे देहे चलनादिव्यापारतयेंद्रियेष्वर्थप्रकाशः एतदात्मकृतमेव न शरीरकृतं यतो मृतशरीरे तथात्वं न दृश्यते अनेन तेजोमयोऽमृतमयस्तथांतर्याम्यमृत इत्यादि श्रुतीनां विषयो दर्शितः ॥ ४८ ॥

अन्वयः—यद्वत् क्षीरांतर् आज्यं मधुरिमविदितं तत् अस्मात् पृथग्भूतं तद्वत् भूतेषु ब्रह्म व्यवहृतिविदितं श्रांतविश्रांतिबीजं ( अस्ति ) यं लब्ध्वा लाभं अन्यत् तृणं इव मनुते यत्र भीतिः न उदेति । यत् सान्द्रानंदं अन्तःस्फुरति तत् अमृतं विद्धि अतः अन्यत् आर्तं हि ।

अर्थः—ज्याप्रमाणें दुधांत असणारें घृत त्याच्या माधुर्यावरून समजतें, व तें दुधाहून पृथक् असतें; त्याप्रमाणें सर्वभूतांमध्यें ब्रह्म आहे, व तें सर्वभूतांच्या व्यवहारावरून समजतें. ( अर्थात् तें पृथक् आहे. ) तें श्रांतपुरुषाच्या निद्रावस्थेंतील विश्रांतीला कारण आहे. ज्याची प्राप्ति झाली असतां पुरुष इतर लाभ तृणासारखे मानितो; तसेंच ज्याठिकाणीं कोणतेही प्रकारची भीति नाहीं; ज्याच्यामुळें अत्यंत आनंदाचा आविर्भाव होतो; तें अमृत आहे असें जाण. त्याहून अन्य सर्व पदार्थ नाशिवंत आहेत.

विवरणः—आतां ह्या श्लोकामध्यें ह्या विश्वांतील सर्व प्राण्यांचा व्यवहार आत्मसंबंधानेंच होत असतो, असें सांगतात. दुधामध्यें घृत असतें व तें दुधाच्या मिष्टपणावरून समजतें. तें घृत दूध या पदार्थाहून भिन्न आहे, असें मंथनानंतर प्रत्यक्ष अनुभवाला येतें. पण ज्याप्रमाणें तेंच दुधापासून काढिलेलें घृत पुनः दुधामध्यें टाकिलें

असतां त्यांत मिळून जात नाहीं; त्याचप्रमाणें सर्व सृष्ट पदार्थांमध्यें ब्रह्म आहे; त्याचें सर्व प्राण्यांच्या व्यवहारावरून ज्ञान होतें, आणि म्हणूनच तें सर्वही भूतांपेक्षां भिन्न आहे. ज्ञानी पुरुषाला तें पृथक् आहे असा अनुभव आला म्हणजे तो जरी ह्या जगांतील सृष्ट पदार्थांकडे पहात असला, तरी त्यांच्याहून पृथक् असलेल्या ब्रह्माला कधींही विसरत नाहीं. हें ब्रह्म जाग्रतींत अनेक व्यवहार करून श्रमलेल्या पुरुषाच्या, सुषुप्तीमध्यें प्राप्त होणाऱ्या विश्रांतीला कारण होतें. ज्याची प्राप्ति झाली असतां प्राणी सर्व जगाला तृणासारखें तुच्छ लेखितो; ज्या ब्रह्माच्या ठिकाणीं द्वैतभाव नसल्यामुळें व्यवहाराप्रमाणें तेथें कोणतीही भीति नसते, ज्याच्या योगानें निद्रावस्थेमध्यें स्थूलसूक्ष्मप्रपंचाचा लय होऊन मन आत्मरूप होतें, व ज्यामुळें अत्यंत आनंदरूप वस्तूचा अंतःकरणांत प्रकाश पडतो तें अमृत ( ब्रह्म ) आहे असें समज. त्याच्याहून अन्य सर्वही पदार्थ क्षुद्र आहेत. कारण शुक्तिकेच्या ठिकाणीं भासणाऱ्या रजताप्रमाणें त्यांच्या अधिष्ठानाचें ज्ञान झालें असतां त्यांचा नाश होतो. सारांश केवल उदकमय दुग्धामध्यें जें उदकाहून अगदीं निराळें असें माधुर्य अनुभवाला येतें, तें घृताचेंच होय; उदकाचें नव्हे हें प्रसिद्ध आहे. तसेंच या जडदेहामध्यें जे चलनादिक व्यापार व इंद्रियांमध्यें जी विषयग्रहणशक्ति आहे, ती आत्म्याचीच आहे. शरीराची नव्हे, कारण मृत शरीर निश्चेष्ट असतें हें सर्वानुभूत आहे. ॥ ४८ ॥

ओतः प्रोतश्च तंतुष्विहविततपटश्चित्रवर्णेषु चित्र-
स्तस्मिञ्जिज्ञास्यमाने ननु भवति पटः सूत्रमात्रावशेषः ॥
तद्वद्विश्वं विचित्रं नगनगरनरग्रामपश्वादिरूपं ।
प्रोतं वैराजरूपे स वियति तदपि ब्रह्मणि प्रोतमोतम् ४९

टीका:—अथ इदं विश्वं परंपरया ब्रह्मण्येव ओतं प्रोतमिति दर्शयति-ओत इति। इह लोके विततो विस्तृतः पटः तंतुषु ओतः प्रोतो दृश्यते। किंभूतेषु तंतुषु विचित्रवर्णेषु किंभूतः पटः विचित्रवर्णः तस्मिन्पटे जिज्ञास्यमाने सम्य-

ऽविचार्यमाणे ननु निश्चयेन पटः सूत्रमात्रावशेषो भवति ऊर्ध्वतंतुषु ओतः तिर्यक्तंतुषु प्रोतः । एवंविधो यः पदार्थः स पटसंज्ञो प्राप्तः परंतु तत्र सूत्रव्यतिरिक्तोऽन्यः कोऽपि पदार्थो नानुभूयते तद्वन्नगनगरनरग्रामपश्वादिरूपं गुणकर्मविभागेन विचित्रं विश्वं वैराजरूपे ब्रह्मांडपिंडे प्रोतं स च वैराजः वियति आकाशे प्रोतः तदपि वियत् ब्रह्मणि प्रोतं अनेन अक्षरं ब्रह्म प्रतिपादितं । अत्र श्रुतिः—"सहोवाचयदूर्ध्वंगार्गिदिवोयदवाक्पृथिव्यायदंतराद्यावापृथिवीइमेयद्भूतंचभवच्चभविष्यच्चेत्याचक्षतेआकाशएवतदोतंचप्रोतं चेतिकस्मिन्नुखल्वाकाशओतश्चप्रोतश्चेतिसहोवाचैतद्वैतदक्षरंगार्गिब्राह्मणाअभिवदंत्यस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घमलोहितमस्नेहमच्छायमतमोऽवाय्वनाकाशमसंगमस्पर्शमगंधमरसमचक्षुष्कमश्रोत्रमवागमनोऽतेजस्कमप्राणममुखमनामगोत्रमजरममरमभयममृतमरजोऽशब्दमविवृतमसंवृतमपूर्वमनपरमनंतरमबाह्यंनतदश्नोतिकंचननतदश्नोतिकश्चन"

**अन्वयः**—इह चित्रवर्णेषु तंतुषु चित्रः विततपटः ओतः प्रोतश्च (दृश्यते) तस्मिन् जिज्ञास्यमाने ननु पटः सूत्रमात्रावशेषः भवति । तद्वत् नगनगरनरग्रामपश्वादिरूपं विचित्रं विश्वं वैराजरूपे प्रोतं । सः वियति (प्रोतः) तत् अपि ब्रह्मणि ओतं प्रोतं (दृश्यते) ।

**अर्थः**—ह्या व्यवहारांत रंगीबेरंगी तंतूंमध्यें (धाग्यांमध्यें) रंगीबेरंगी विस्तृत वस्त्र ओतप्रोत (भरून राहिलेलें) दिसतें. पण त्या वस्त्राविषयीं विचार करून पाहूं लागलें असतां त्यामध्यें खरोखरच केवळ धागे मात्र हातीं लागतात (ह्म० धाग्यांवांचून अन्य कांहीं त्यांत दिसत नाहीं.) त्याचप्रमाणें पर्वत, नगरें, पुरुष, लहान लहान गांव, पशु इत्यादि रूप हें विचित्र जग विराडात्म्यामध्यें ओंविलेलें आहे. तो विराडात्मा आकाशांत ओंविलेला आहे व तें आकाश ब्रह्मामध्यें ओंविलेलें आहे.

**विवरणः**—हें विश्व परंपरेनें ब्रह्मामध्येंच ओंविलेलें आहे; असें ह्या श्लोकांत दाखवितात. व्यवहारामध्यें बहुतेक सर्व मनुष्यांच्या परिचयाचें लांबरुंद वस्त्र तंतुमय असतें. वस्त्रोत्पत्तीच्या पूर्वी, वस्त्ररूपाला प्राप्त झाल्यावर व वस्त्रत्वाचा नाश झाला असतां तें तंतुरूपच असतें; व जसे धागे असतील तशा प्रकारचें तें होतें. चित्रविचित्र धागे असल्यास वस्त्रही तसेंच होतें. पण वस्त्र या नांवानें व लांबीरुंदीच्या आकारानें भासणारें जें वस्त्र तो केवळ तंतूंचा विकार आहे. उभ्या तंतूंमध्यें आडवे तंतु विशेष प्रकारानें ओंवून विणले असतां त्याच

तंतूंस वस्त्र ही संज्ञा प्राप्त होते. ह्मणून पटाविषयीं विचार करून पाहूं लागलें असतां त्यामध्यें तंतूंवांचून अन्य कांहींही नाहीं असा आपला निश्चय होतो. त्याचप्रमाणें सत्त्वादि गुण व पापपुण्य उत्पन्न करणारीं कायिक, वाचिक, मानसिक कर्में यांच्या विभागानें विचित्र झालेलें हें जग विराड्नांवाच्या स्थूल समष्टीमध्यें ओंविलेलें आहे; ती स्थूल समष्टि सूक्ष्म आकाशामध्यें ओंविलेली आहे; (ह्मणजे ती आकाशाच्या आधारानें रहाते. ) व तें सर्वही स्थूल सूक्ष्म प्रपंचाला आधार असणारें आकाश ब्रह्माच्या आश्रयानें रहातें. याविषयीं बृहदारण्यकोपनिषदामध्यें "सहोवाचयदूर्ध्वं० तद्श्रोति कश्चन" या श्रुतीमध्यें प्रश्नप्रतिवचनरूपानें विस्तृतपणें प्रतिपादन केलेलें आहे.॥ ४९ ॥

रूपं रूपं प्रतीदं प्रतिफलनवशात्प्रातिरूप्यं प्रपेदे ।
ह्येको द्रष्टा द्वितीयो भवति च सलिले सर्वतोनंतरूपः ॥
इन्द्रो मायाभिरास्ते श्रुतिरिति वदति व्यापकं ब्रह्म तस्मा-
ज्जीवत्वं यात्यकस्मादतिविमलतरे बिम्बितं बुद्ध्युपाधौ ५०

टीकाः—अथात्मनो बिंबप्रतिबिंबन्यायेन सर्वात्मकत्वमाह—रूपंरूपमिति। अत्र प्रतिबिंबविषयश्रुतिमर्थमुपन्यस्तवान् इदं ब्रह्म प्रतिफलनवशाद्रूपंरूपं प्रति प्रातिरूप्यं प्रपेदे प्रतिरूपस्य भावः प्रातिरूप्यं। अत्र श्रुतिः—"दध्यङ्ङाथर्वणोऽश्विभ्यामुवाच। तदेतदृषिः पश्यन्नवोचत्। रूपंरूपंप्रतिरूपो बभूवेति।" अत्रेयमाख्यायिका पूर्वं अश्विनौ देवभिषजावात्मज्ञानोपदेशार्थं दधीचिं प्रति गत्वा आवाभ्यामात्मविद्योपदेष्टव्येति ऊचतुः। तेनोत्तरितं क्षणांतरं उपदेक्ष्यामीति। दधीचवाक्यं श्रुत्वा स्वगृहं गतौ। तदंतरं इंद्रः समागत्य दधीचिं प्रत्युक्तवान् एवैतौ मदीयभिषजौ नोपदेष्टव्यौ अथ यदि मदीयवचनं न शृणोषि तर्हि तव शिरः पातयिष्यामि इत्युक्त्वा निर्गतः पुनरश्विभ्यामागमनं कृतं ततस्तौ दधीचमुखाद्विदितवृत्तांतावूचतुः भो दधीच क्षणांतरे उपदेक्ष्यामीति प्रतिज्ञा मिथ्या भवितुं नार्हतीति तर्हीदानीं तव शिरः स्थानांतरे निधायाश्वशिरस्त्वयि संयोज्यते तेन शिरसात्मविद्यामुपदिशस्व तत इंद्र आगत्याश्वशिरः छित्वा गमिष्यति पुनस्तव स्वाभाविकं शिरः संयोजयिष्याव इति तयोस्तद्वचसा तथाविधायां सत्यां अश्वशिरसा मधुकांडमुपदिष्टवान् इति पूर्ववृत्तांतः। अथ दध्यङ्ङाथर्वण अथर्वणस्यापत्यं आथर्वणः एवंविधो दधीचिः अश्विभ्यां मधुवाच तदेतदृषिर्वेदः पश्यन्नवोचत् तदेव रूपं

रूपं वस्त्वेति प्रतिरूप इत्यर्थः । अथ द्वितीयां श्रुतिमाह-एक इति । य परं एको द्रष्टा सलिले द्वितीयो भवति । पश्यतीति द्रष्टा । अत्र श्रुतिः—"सलिलएकोद्रष्टाद्वितीयोभवति" अथ तृतीयां श्रुतिं दर्शयति इन्द्र इति—इंद्रो मायाभिः सर्वतोऽनंतरूप आस्ते । इंद्रः परमात्मा मायाभिः कृत्वा सर्वतः अनंतरूप आस्ते अत्र श्रुतिः—"इंद्रोमायाभिः पुरुरूपईयते" । पुरुरूपो बहुरूपः ईयते जायते इत्यमुना प्रकारेण श्रुतिः व्यापकं ब्रह्म वदति तदकस्मादबुद्ध्युपाधौ प्रतिबिंबितं सज्जीवत्वं याति किंभूते उपाधौ विमलतरे स्वच्छतरे ॥ ५० ॥

अन्वयः—इदं प्रतिफलनवशात् रूपंरूपंप्रति प्रातिरूप्यं प्रपेदे । एकः हि द्रष्टा सलिले द्वितीयः भवति । इन्द्रः मायाभिः सर्वतः अनन्तरूपः आस्ते इति च श्रुतिः वदति । तस्मात् व्यापकं ब्रह्म अति विमलतरे बुद्ध्युपाधौ बिंबितं अकस्मात् जीवत्वं याति ।

अर्थः- हें ब्रह्म प्रतिबिंबाच्या योगानें उपाधीप्रमाणें निरनिराळ्या रूपांचें झालें; ( जलाशयाचे तीरीं उभें राहून उदकांत ) पहाणारा एकच पुरुष स्वतःचेंच रूप उदकामध्यें दिसूं लागल्यामुळें अनेक होतो; व इंद्र, मायेच्या योगानें अनंत रूपें घेतो असें श्रुति सांगते. तस्मात् सर्वव्यापी ब्रह्मच अति निर्मळ अशा बुद्धिरूप उपाधीमध्यें बिंबित झालें असतां तत्क्षणींच जीव होतें.

**विवरणः**—आतां ह्या श्लोकामध्यें 'एकच बिंब अनेक प्रतिबिंबांमध्यें व्यापून असतें' ह्या न्यायानें आत्म्याचें सर्वात्मकत्व दाखवितात. ह्या ठिकाणीं "दध्यङ् आथर्वण०" "सलिलएको द्रष्टा०" "इंद्रोमायाभिः०" ह्या प्रतिबिंबविषयक तीन श्रुतींचा निर्देश केला आहे. ब्रह्म ज्या ज्या उपाधीमध्यें प्रतिबिंबित झालें त्या त्या प्रमाणें भासूं लागलें. ह्या पहिल्या श्रुतीविषयीं वेदांत अशी आख्यायिका आहे कीं, पूर्वीं देवांचे अश्विन नांवाचे दोन वैद्य आत्मज्ञानाचा उपदेश घेण्याकरितां दधीचि ऋषींकडे गेले; व आम्हांस आत्मविद्येचा उपदेश करा अशी त्यांना त्यांनीं विनंती केली. त्यावर दधीचि ऋषींनीं पुनः केव्हां तरी उपदेश करीन असें उत्तर दिलें. तें ऐकून ते उभयतां स्वस्थानीं निघून गेले. इतक्यांत इंद्र दधीचीकडे आला व माझ्या वैद्यांना तुम्हीं उपदेश करूं नका, आणि जर हें माझें म्हणणें तुम्हीं अमान्य करून उपदेश कराल तर मी तुमचा शिरच्छेद करीन असें बोलून निघून गेला. तदनंतर कांहीं कालानें ते उभयतां वैद्य पुनः

दधीचीकडे आले असतां त्यांना त्यांनीं झालेला वृत्तांत सांगितला. तो ऐकून ते वैद्य म्हणाले कीं, महाराज आपण पुनः केव्हां तरी उपदेश करीन असें जें सांगितलेंत तें असत्य होणें योग्य नाहीं. याकरितां आम्हीं आपलें हें मस्तक कोठें तरी लपवून ठेऊन येथें अश्वाचें शिर आणून बसवितों. त्या अश्वमुखानें आपण आम्हांस उपदेश करा. नंतर इंद्र आपला शिरच्छेद करून निघून गेला, म्हणजे आम्हीं आपलें मस्तक पुनः जोडून देऊं असें ते म्हणाले. हें त्यांचें भाषण ऐकून दधीचि ऋषींनीं तसें करण्यास वैद्यांस अनुमोदन दिलें; आणि नंतर अश्वमुखानें त्यांनीं त्यांना उपदेश केला. त्या उपदेशामध्यें "रूपं रूपं प्रतिरूपो बभूव" ही श्रुति आहे. नदीच्या किंवा जलाशयाच्या तीरीं एकच पुरुष उदकांतील प्रतिबिंबरूपानें आपणाला अनेकत्वानें पहातो. सारांश सर्वव्यापि ( सर्व प्रतिबिंबांना व्यापून असणारें ) ब्रह्मच अति निर्मल बुद्धीमध्यें प्रतिबिंबित झालें असतां जीव होतें; व अनेक उपाधींमुळें त्याचे ठिकाणीं अनेकत्व येतें. ॥ ५० ॥

तज्ज्ञाः पश्यन्ति बुद्ध्या परमबलवतो माययाक्तं पतङ्गं ।
बुद्धावंतःसमुद्रे प्रतिफलितमरीच्यास्पदं वेधसस्तम् ॥
यादृग्यावानुपाधिः प्रतिफलति तथा ब्रह्म तस्मिन्यथास्यं ।
प्रासादर्शानुरूपं प्रतिफलति यथावस्थितं तत्सदैवम् ५१

टीका:—अथास्मिन्नर्थे ऋक्शाखीयां श्रुतिं संवादयन्नाह—तज्ज्ञा इति । पतनशीलः पतंगो जीवः तं पूर्वप्रतिपादितं जानन्ति ते तज्ज्ञाः शास्त्रविदः बुद्ध्या निर्मलांतःकरणवृत्त्या पश्यन्ति । अथ किंरूपत्वेन पश्यंतीत्याह—बुद्धाविति । बुद्धौ बुद्धिलक्षणे समुद्रे अंतः वेधसः परमात्मनः प्रतिबिंबिता ये मरीचयः किरणाः तेषामास्पदं स्वरूपं यस्य स तथा । अथ तस्य पतनशीलत्वं प्रकटयन्नाह—परमेति । परमबलवतो दुर्जयमायस्य वेधसो हिरण्यगर्भस्य मायया अक्तं व्याप्तं मुह्यमानं । अत्र श्रुतिः—" पतंगमक्तमसुरस्य मायया हृदा पश्यन्ति मनसा विपश्चितः । समुद्रेण अंतः कवयो विचक्षते मरीचीनां पदमिच्छन्ति वेधसः " ॥ ५१ ॥

अन्वयः—तज्ज्ञा तं परमबलवतः मायया अक्तं पतंगं बुद्धौ समुद्रे अंतः वेधस. प्रतिफलितमरीच्यास्पदं बुद्ध्या पश्यंति । यथा आस्यं प्रासादर्शानुरूपं प्रतिफलति तत् (पुन ) सदा यथावस्थितं । एवं यादृक् यावान् उपाधिः तथा तस्मिन् ब्रह्म प्रतिफलति ।

**अर्थः—शास्त्रज्ञ पुरुष, तो अत्यंत बलवान् अशा हिरण्यगर्भाच्या मायेनें मोहित झालेला जीव, बुद्धिरूप समुद्रामध्यें प्रतिबिंबित झालेले आत्म्याचे जे किरण तद्रूप आहे असें निश्चयात्मक अंतःकरण वृत्तीनें पहातात. जसें समोर आलेल्या आरशाप्रमाणें मुख त्यामध्यें प्रतिबिंबित होतें, व तें स्वतःतर सर्वदा जसेंच्या तसेंच असतें, तसेंच जेवढ्या प्रमाणाची व अशा प्रकारची उपाधि असेल तसेंच तेथें ब्रह्म प्रतिबिंबित होतें.**

**विवरणः**— मागच्या श्लोकामध्यें प्रतिपादन केलेल्या अर्थाला अनुरूप अशा ऋग्वेदस्थ " पतंगमक्तमसुरस्य० इच्छंतिवेधसः " या श्रुतीचा येथें अनुवाद करितात. बुद्धिरूप समुद्रामध्यें सच्चिदानंदस्वरूप परमात्मा प्रतिबिंबित होतो. त्यालाच त्या परमात्म्याच्या दुर्लंघ्य मायेनें मोहित झाल्यानें जीव असें नांव प्राप्त होतें. तो पतंग होय. कारण स्वरूपापासून भ्रष्ट होणें हा त्याचा स्वभावच आहे. सारांश जीव त्या परमात्म्याच्या प्रतिबिंबभूत आहे असें शास्त्रज्ञ पुरुष निश्चयात्मक बुद्धिवृत्तीनें पहातात. मुखासमोर तांबडा, पिंवळा, मलिन किंवा स्वच्छ इत्यादि जशा प्रकारचा आरसा धरावा तसें त्यामध्यें (आरशाच्या रंगाप्रमाणें) मुखाचें प्रतिबिंब पडतें; आणि बिंबभूत मुख तर सर्वदा जसेंच्यातसेंच असतें. तसेंच उपाधिभूत अंतःकरण जसें सात्त्विक, राजस किंवा तामस असेल, त्याप्रमाणें ब्रह्म त्यांत प्रतिबिंबित होतें. पण दृष्टांतांतील मुखाप्रमाणें बिंबभूत ब्रह्म त्रिकालींही अविकारी (स्वस्वरूपानें जशाच्या तसेंच) असतें. ॥५१॥

एको भानुस्तदर्थप्रतिफलनवशाद्यस्त्वनेकोदकांत-
र्नानात्वं यात्युपाधिस्थितिगतिसमतां चापि तद्वत्परात्मा॥
भूतेषूच्चावचेषु प्रतिफलित इवाभाति तावत्स्वभावा-
वच्छिन्नो यः परंतु स्फुटमनुपहतो भाति तावत्स्वभावैः ५२

**टीका**—अथैतदेवदृष्टांतान्तरेण द्रढयन्नाह एको भानुरिति—स्पष्टार्थमिदं पद्यम्।

**अन्वयः**—यः तु एकः भानुः अनेकोदकांतर तदर्थप्रतिफलनवशात् नानात्वं याति। उपाधिस्थितिगतिसमतां च अपि (याति) तद्वत् परात्मा उच्चावचेषु भूतेषु प्रतिफलित इव आभाति यः तावत् स्वभावावच्छिन्नः परंतु स्वभावैः तावत् अनुपहतः स्फुटं भाति।

**अर्थः—जो एकच सूर्य अनेक उदकपूर्णपात्रांमध्यें स्वतः प्रतिबिंबित झाल्यामुळें अनेकत्वानें भासतो; आणि उपाधि असेपर्यंत असणें, उपाधि नष्ट झाली असतां नष्ट होणें इत्यादि उपाधिधर्मांशीं साम्य पावतो; तसेंच परमात्मा लहानमोठ्या भूतांमध्यें प्रतिबिंबित झाल्यासारखा भासतो. जो उपाधिच्या स्वभावानें तर युक्त होतो, पण स्वतःच्या स्वभावांनीही (कधीं) हीन होत नाहीं असें स्पष्ट दिसतें.**

**विवरणः**—आतां हीच गोष्ट सूर्याच्या दृष्टांतानें पुनः स्पष्ट करितात. अनेक पात्रांमध्यें पाणी भरून तीं पात्रें उघड्या जागेंत ठेविलीं असतां त्या प्रत्येकामध्यें निरनिराळा सूर्य दिसूं लागतो. हें पात्रांतील उपाधिभूत उदक हालूं लागलें असतां तें प्रतिबिंब हालत आहे असें भासतें व उदक ओतून टाकिलें असतां तें नष्ट झालें असें वाटतें. परंतु ह्या विक्रियांपैकीं बिंबभूत सूर्याला कोणतीच विक्रिया होत नाहीं; तसेंच सर्वही लहान मोठ्या शरीरांतील अंतःकरणांमध्यें परमात्मा प्रतिबिंबित झाल्यासारखा भासतो. व अनेक अंतःकरणोपाधीमुळें तो जीवरूपानें अनेक असल्यासारखा वाटतो. अंतःकरणरूप उपाधि असेपर्यंत जीवाचें अस्तित्व असतें. अंतःकरण सुखी किंवा दुःखी झालें असतां जीवही सुखी किंवा दुःखी झाल्यासारखा वाटतो. परंतु ज्याप्रमाणें उदकोपाधीच्या धर्मांनीं सूर्यप्रतिबिंबें युक्त झालीं तरी स्वतःचें प्रकाशत्व टाकीत नाहींत, त्याचप्रमाणें सुखदुःखादि उपाधिधर्मांनी जीव युक्त झाला तरी स्वतःचे चैतन्यादि स्वभाव टाकित नाहीं. ॥ ६२ ॥

यद्वत्पीयूषरश्मौ दिनकरकिरणैर्बिंबितैरेति सान्द्रं ।
नाशं नैशं तमिस्रं गृहगतमथवा मूर्छितैः कांस्यपात्रे ॥
तद्वद्बुद्धौ पगतमद्युतिभिरनुपदं बिंबिताभिः समंता-
द्भासन्ते हींद्रियास्यप्रसृतिभिरनिशं रूपमुख्याः पदार्थाः ॥

टीका.—ननु जलार्कप्रतिबिंबः स्वकीयं रूपमेव प्रकटयति न पदार्थांतरं एवमात्मप्रतिबिंबो जीवश्चेत्तर्हि कथं पदार्थांतरज्ञापको भवति। इत्याशंक्य सदृष्टांतमाह—यद्वदिति। यद्वत्पीयूषरश्मौ जलमयचंद्रे दिनकरकिरणैर्बिंबितैः स-

र्दिः सांद्रं निबिडं नैशं रात्रिभवं तमिस्रं अंधकारः नाशं एति प्राप्नोति "आदित्यतश्चंद्रमाभातीति" श्रुतेः अथ वा कांस्यपात्रे दिनकरकिरणैर्मूर्च्छितैः सांद्रगृहगतं गृहांतर्वर्ति तमिस्रं नाशमेतीति प्रतीतिसिद्धं तद्वद्बुद्धौ विंबिताभिः परमात्मद्युतिभिः समंतात्रूपमुख्याः पदार्थाः भासन्ते नहि निमीलितनेत्रस्यापि पदार्थभानमस्तित्यत आह—क्रमूर्ताभिः अनुपदं तत्काल इंद्रियास्यप्रसृताभिः इंद्रियास्यैः इंद्रियमुखैः प्रसृतिः प्रसारो यासां ताभ्याभिः ५३

अन्वयः—यद्वत् पीयूषरश्मौ बिंबितैः दिनकरकिरणैः सांद्रं नैशं तमिस्रं नाशं एति। अथवा कांस्यपात्रे मूर्च्छितैः (दिनकरकिरणैः) गृहगतं (तमिस्रं नाशं एति) तद्वत् बुद्धौ विंबिताभिः अनुपदं इंद्रियास्यप्रसृताभिः परात्मद्युतिभिः रूपमुख्याः पदार्थाः समंतात् अनिशं भासन्ते।

अर्थः--ज्याप्रमाणे चंद्रामध्यें प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणांनीं रात्रीचा दाट अंधकार नाश पावतो; किंवा कांशाच्या भांड्यामध्यें प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणांनीं गृहांतील अंधकार नाहींसा होतो; त्याप्रमाणें बुद्धीमध्यें प्रतिबिंबित होणाऱ्या व तत्काल इंद्रियमुखांनीं प्रसार पावणाऱ्या परमात्मज्योतींनीं रूपादिक सर्व विषय चोहांकडून सर्वदा भासतात.

विवरणः—मागच्या श्लोकांतील प्रतिपादनावर आतां कोणी कदाचित्—जलादि उपाधींमध्यें दिसणारें सूर्यप्रतिबिंब स्वतःचें रूप मात्र प्रकट करितें; अन्य पदार्थांना प्रकट करीत नाहीं. तेव्हां आत्मप्रतिबिंबभूत जीव तरी अन्य पदार्थांना प्रकाशित कसें करणार (म्ह० त्याला त्यांचें ज्ञान कसें होणार) अशी शंका घेतील म्हणून दृष्टांत देऊन समाधान करितात. जलमय असणाऱ्या चंद्राच्या ठिकाणीं सूर्यकिरणें पडून त्या किरणांच्या परावर्तनानें रात्रीचा निबिड अंधार नाहींसा होतो; किंवा कांशाचें भांडें, आरसा इत्यादिकांमध्यें प्रतिबिंबित झालेल्या सूर्यकिरणांचें परावर्तन घरांमध्यें झालें असतां घरांतील अंधार नाहींसा होतो; ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाची आहे. तसेंच, किंवा संसर्गानें अग्नीतील दाह जसा लोखंडांत येतो त्याप्रमाणें परमात्म्याची प्रकाशन शक्ति त्याच्याशीं उपाधिरूपानें संबद्ध झालेल्या बुद्धीमध्यें येते. हेंच बुद्धींतील प्रतिबिंब होय. ह्याप्रमाणें संसर्गद्वारा परमात्म्याची ज्ञानशक्ति अंतःकरणांत आली असतां अंतःकरणाशीं संबद्ध असणाऱ्या इंद्रियांमध्येंही ती येते. सारांश अशा

त्या इंद्रियांच्या द्वारा आसपास पसरणाऱ्या आत्मज्योतीनें शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध इत्यादि विषयांचें ज्ञान होतें. ॥५३॥

पूर्णात्मानात्मभेदात्त्रिविधमिह परं बुद्ध्यवच्छिन्नमन्य-
त्तत्रैवाभासमात्रं गगनमिव जले त्रिप्रकारं विभाति ॥
अम्भोवच्छिन्नमस्मिन्प्रतिफलितमतःपाथसोंतर्बहिश्च ।
पूर्णावच्छिन्नयोगे व्रजति लयमविद्या स्वकार्यैः सहैव॥५४

टीका:-अथोपाधावेव त्रेधा ब्रह्मप्रतीतिरस्तीत्याह-पूर्णात्मेति । इहोपाधौ पूर्णं च आत्मा च अनात्मा चेति त्रिविधं ब्रह्म भासते तत्रैकं परं पूर्णं उपाधेर्बाह्याभ्य-न्तरतोवर्तमानं । तथा द्वितीयं बुद्ध्यवच्छिन्नं बुद्ध्या वृतं । तथान्यत्तृतीयं तत्रैव बुद्धौ आभासमात्रं प्रतिबिंबस्वरूपं किमिव जले त्रिप्रकारं गगनमिव विभाति । अथ प्रकारत्रयमाह—एकं अंभोवच्छिन्नं उदकावृतं अपरं अस्मिन्नेवोदके प्रतिफलितं प्रतिबिंबितं तृतीयं अतोऽस्मात्पाथसः उदकात्सकाशात् अंतर्बहि-श्चान एवं पूर्णावच्छिन्नयोगे सति उपाधिभूताविद्या स्वकार्यैः प्रतिबिंबादिभिः सह लयं नाशं याति अधिष्ठानसाक्षात्कारे आभासो नश्यतीत्यर्थः ॥ ५४ ॥

अन्वयः—अम्भोवच्छिन्नं अस्मिन् प्रतिफलितं अतः पाथसः अंतर्बहिः च इति जले त्रिप्रकारं गगनं इव परं बुद्ध्यवच्छिन्नं अन्यत्तत्रैव आभास-मात्रं इति इह पूर्णात्मानात्मभेदात् ( ब्रह्म ) त्रिविधं आभाति । ( एवं ) पूर्णाव-च्छिन्नयोगे ( सति ) अविद्या स्वकार्यैः सह एव लयं व्रजति ।

अर्थः—पाण्यानें वेष्टित होऊन तेवढेंच निराळें भासणारें, पाण्यांत प्रतिबिंबित झालेलें व त्याला आंतून व बाहेरून व्यापणारें असें जलांत तीन प्रकारचें आकाश जसें भासतें; तसेंच एक पूर्ण, दुसरें बुद्धियुक्त व तिसरें बुद्धींतच प्रतिबिंबित झालेलें असें ब्रह्मही पूर्ण, आत्मा व अनात्मा अशा तीन प्रकारचें भासतें. (ह्याप्रमाणें ) पूर्ण व उपाधिव्यापि अशीं हीं दोन्हीं तत्त्वें एकच आहेत असें अखण्ड ज्ञान झालें कीं आपल्या कार्यांसहवर्तमानच अविद्या नाश पावते.

विवरणः—उपाधीमध्येंच तीन प्रकारची ब्रह्मप्रतीति येते असें भगवान् आचार्य ह्या श्लोकांत सांगतात. ह्या अंतःकरणरूप जीवाच्या उपाधीमध्यें सर्वव्यापि पूर्ण परब्रह्म, आत्मा व अनात्मा अशा तिघांचाही भास होतो. त्यांतून पहिलें जें परिपूर्ण ब्रह्म तें उपाधीच्या

आंतबाहेर ओतप्रोत भरलेलें असतें; दुसरें अंतःकरणवेष्टित झाल्यानें तेवढेंच पूर्ण ब्रह्मापासून पृथक् होऊन केवळ बुद्धीलाच व्यापून राहतें; व तिसरें बुद्धीमध्यें केवळ प्रतिबिंबासारखें भासतें. हीच गोष्ट जास्त स्पष्टपणें लक्ष्यांत यावी म्हणून उदकामंध्यें तीन प्रकारांनीं भासणाऱ्या गगनाचा दृष्टांत देतात. जलाला अंतर्बहिर् व्यापून राहणारें, जल जेवढें असेल तेवढेंच पूर्णाकाशापेक्षां पृथक् भासणारें, व त्यांत प्रतिबिंबित होणारें असें एकच आकाश जसें उपाधीमुळें तीन प्रकारचें भासतें, तसेंच एक परब्रह्म उपाधीमुळें तीन प्रकारचें होतें. पण ज्ञानाच्या योगानें त्याच्या अखंडत्वाचा ( म्ह० तिन्ही ठिकाणीं भासणारें तत्त्व एकच आहे असा ) निश्चय झाला कीं तत्क्षणींच उपाधिभूत अविद्या आपल्या प्रतिबिंबादिक कार्यासह स्वाश्रयामध्यें जाऊन मिळते. सारांश अधिष्ठानाचा साक्षात्कार झाला असतां भ्रम नाहींसा होतो. ॥ ५४ ॥

दृश्यन्ते दारुनार्यो युगपदगणिताः स्तंभसूत्रप्रयुक्ताः ।
संगीतं दर्शयंत्यो व्यवहृतिमपरां लोकसिद्धां च सर्वाम् ॥
सर्वत्रानुप्रविष्टादभिनवविभवाद्यावदर्थानुबंधा-
त्तद्वत्सूत्रात्मसंज्ञाद्व्यवहरति जगद्भूर्भुवःस्वर्महान्तम् ५५

टीकाः—अथ सूत्ररूपं सर्वात्मकं ब्रह्माह—दृश्यंत इति । युगपदेकसमयाव-च्छेदेन अगणिता अनेकाः दारुनार्यः काष्ठरचिताः अचेतना अपि नार्यो नर्तक्यः संगीतं वाद्यनृत्यात्मकं दर्शयंत्यो दृश्यंते न ह्यचेतनेषु तथात्वं युक्तमित्याशंक्याह—किंभूता नार्यः स्तंभसूत्रप्रयुक्ताः शिल्पकेन रचितं यत् स्तंभांतःसूत्रं तेन प्रयुक्ताः तालादिनियमेन चेष्टां प्रापिताः । अथ न केवलं संगीतं दर्शयंत्यः किंतु लोकसिद्धां सर्वां व्यवहृतिं च लोकप्रसिद्धा सर्वा व्यवहृतिः व्यवहारः मल्लयुद्धखड्गाराधना मृगयादिः तामपि दर्शयंत्यः तद्वत्सर्वत्रानुप्रविष्टात्सूत्रात्मसंज्ञात्परमात्मनः प्रेरकात् भूर्भुवःस्वर्महांतं जग-द्व्यवहरति किंभूतात् अभिनवविभवात् अनवद्यसामर्थ्यात् पुनः किंभूतात् यावदर्थानुबंधात् यावानर्थः प्रयोजनं तावानेव संबंधो यस्मात् यस्मिन्व्यवहारे यावत्प्रयोजनं तावदेवानुप्रविशति नियतत्वेन संबंधं प्रापयति मर्यादितत्वेन ॥ अत्र श्रुतिः " वायुर्वै गौतम तत्सूत्रं वायुना वै गौतम सूत्रेण अयं च लोकः परश्च लोकः सर्वाणि च भूतानि संदृब्धानि भवंति " इति ॥ ५५ ॥

**अन्वयः**—युगपत् अगणिताः स्तंभसूत्रप्रयुक्ताः दारुनार्यः संगीतं अपरां लोकसिद्धां सर्वां व्यवहृतिं च दर्शयंत्यः दृश्यन्ते । तद्वत् सर्वत्रानुप्रविष्टात् आमनर्वाविभवात् यावदर्थानुबंधात् सूत्रात्मसंज्ञात् भूर्भुवःस्वर्महान्तं जगत् व्यवहरति ।

**अर्थः—एकाच कालीं कलासूत्रानें प्रेरित होणाऱ्या लांकडाच्या असंख्य बाहुल्या नृत्यगायनादिक व तसेंच लौकिक सर्व व्यवहार करून दाखवितात असें दिसतें. त्याचप्रमाणें सर्वव्यापी, अतर्क्य सामर्थ्यवान् व कर्मानुरूप फल देणारा जो सूत्रात्मसंज्ञक परमात्मा त्याच्याकडून प्रेरित होऊन भूर्भुवःस्वर् व महर्लोकापर्यंत सर्व जग व्यवहार करितें.**

**विवरणः**—आतां ह्या श्लोकामध्यें सूत्ररूप सर्वव्यापि परब्रह्माचा निर्देश करितात. कलासूत्री बाहुल्यांच्या खेळांत एकाच कालीं अनेक बाहुल्यांनां सूत्रधार पडद्यामध्यें बसून बारीक तारांच्या योगानें नाचवितो; व त्यांच्याकडून मल्लयुद्ध, शिकार, इत्यादि लौकिक व्यवहारही करवितो. तो सूत्रधार बाहुल्यांपासून पडद्यांतील खांबापर्यंत शिल्पकारानें जोडलेल्या तारांच्या द्वारा हे व्यवहार करितो. त्याचप्रमाणें सर्वही कार्यांमध्यें ओतप्रोत भरून रहाणाऱ्या विश्वव्यापी, अतर्क्य सामर्थ्यवान्, कर्मानुरूप फल देणाऱ्या व फलाकरितां देशकालानुरूप व्यवहार करविणाऱ्या सूत्रात्म्याकडून प्रेरित होऊन भूर्लोकापासून महर्लोकापर्यंत सर्व विश्वांतील प्राणी व्यवहार करितात. तात्पर्य 'ईश्वरप्रेरणेवांचून वृक्षाचें पानही ' हालत नाहीं अशी जी लौकिक म्हण आहे ती अगदीं यथार्थ आहे. "वायुर्वै गौतम यत्सुत्रं० संदृब्धानि भवंति" ही छांदोग्य श्रुति ह्या श्लोकांतील प्रतिपादनाला प्रमाण आहे. ॥ ९९ ॥

तत्सत्यं यत्त्रिकालेष्वनुपहतमदः प्राणदिग्व्योममुख्यं ।
यस्मिन्विश्रान्तमास्ते तदिह निगदितं ब्रह्म सत्यस्य सत्यम्
नास्त्यन्यत्किंच यद्वत्परमधिकमतो नाम सत्यस्य सत्यं
सच्च त्यच्चेति मूर्ताद्युपहितमनरं सत्यमस्यापि सत्यम् ॥

टीका:—अथ सत्यशब्दस्वपदंदर्शं आचष्टे—तत्सत्यमिति । यत्त्रिकालेषु भूतभवि-

ष्यद्वर्तमानेषु अनुपहतमबाधितं अदः अमूर्तं प्राणदिग्व्योममुख्यं प्राणाः मुख्यप्राणादयः दिग्व्योममुख्यशब्दात् कालादि तदेव सत्यम् । तथा प्रकारान्तरेणाह—यद्यस्माद्ब्रह्मणः सकाशादन्यत्परमुत्कृष्टं अधिकं महत्किंचिदपि सत्यस्य नाम नास्ति यद्यस्ति तर्हि वेदेषु कथं न प्रसिद्धं अतः ब्रह्मैव सत्यसत्यव्यपदेश्यम् । अथ सत्यशब्दव्युत्पत्तिमाह—सच्च त्यच्चेति । सन्मूर्तं पृथिव्यप्तेजोरूपं त्यच्चेति यदमूर्तौ वाय्वाकाशौ ताभ्यामुपहितं आश्रितं यत् अवरं शबलं ब्रह्म तस्यापि सत्यं ब्रह्म ॥ ९१ ॥

अन्वयः—यत् त्रिकालेषु अनुपहतं अदः प्राणदिग्व्योममुख्यं तत् सत्यं । (इदं) यस्मिन् विश्रान्तं आस्ते तत् ब्रह्म इह सत्यस्य सत्यं निगदितम् । किंच यद्वत् अतः परं अधिकं (वा) अन्यत् सत्यस्य सत्यं नाम नास्ति । सच्च त्यच्च इति मूर्तामूर्तोपहितं अवरं सत्यं (ब्रह्म तु) अस्य अपि सत्यम् ।

अर्थः—जें त्रिकालींही नष्ट न होणारें हें प्राण, दिशा, व्योम इत्यादि अमूर्त जग तें सत्य होय. हें सत्य ज्याचा आश्रय करून रहातें त्या ब्रह्माला शास्त्रांत सत्याचेंही सत्य असें म्हटलें आहे. शिवाय ज्याच्यासारखें किंवा ज्याच्याहून अधिक व श्रेष्ठ असें सत्याचें सत्य या नांवाचें दुसरें कांहीं नाहीं. सत् व त्यत् या नांवाच्या व्यक्त व अव्यक्त भूतांनीं ज्याचा आश्रय केला आहे तें शबल ब्रह्म सत्य व (शुद्ध ब्रह्म तर) त्याचेंही सत्य होय.

विवरणः—ब्रह्मच सत्य या शब्दाला पात्र आहे असें येथें सांगतात. भूत, भविष्य व वर्तमान या तिन्हीं कालांत ज्याचा बाध होत नाहीं अशा ह्या प्राणादि अव्यक्त जगाला सत्य असें व्यवहारांत म्हणतात. पण हें प्राणादि जग ज्याच्या आधारानें राहतें त्या ब्रह्माला आत्मानुभवी पण्डित सत्याचें सत्य म्हणतात. ह्या ब्रह्मासारखें किंवा याहून अधिक असें सत्याचें सत्य दुसरें कांहींही नाहीं. कारण तसें जर कांहीं असतें तर त्याचा सर्वप्रकाशक वेदांत अवश्य कोठें तरी उल्लेख असता. पण तसा उल्लेख कोठेंही नाहीं. अर्थात् ब्रह्मच सत्य आहे. या श्लोकाच्या चतुर्थचरणांत सत्यशब्दाची व्युत्पत्ति सांगतात. सत् म्हणजे पृथ्वी, आप् व तेज हीं साकार व त्यत् म्ह० वायु व आकाश हीं निराकार भूतें, ज्याच्या आश्रयानें राहतात त्या शबल ब्रह्माला सत्य असें म्हणतात; पण शुद्ध ब्रह्म या सत्याचेंही सत्य आहे. ॥ ९१ ॥

यत्किंचिद्भात्यसत्यं व्यवहृतिविषये रौप्यसर्पांबुमुख्यं
तद्धि सत्याश्रयेणेत्ययमिह नियमः सावधिर्लोकसिद्धः ॥
तद्वत्सत्यस्य सत्ये जगदखिलमिदं ब्रह्मणि प्राविरासी-
न्मिथ्याभूतं प्रतीतं भवति खलु यतस्तच्च सत्यं वदन्ति ५७

टीका:—अथ सत्यस्य सत्यमिति दृढीकुर्वन् सदृष्टांतमाह—यदिति। लोके व्यवहारविषये दृश्यजाते यत्किंचिद्रौप्यसर्पांबुमुख्यमसत्यं भाति शुक्तिकायां रजतं रज्ज्वां सर्पः मरीचिकास्वंबु एवमेतत्प्रमुखमसत्यं यद्भासते तत्सत्याश्रयेणैव भासते। शुक्तिकाद्यधिकरणं हि व्यावहारिकं सत्यं तदाश्रयेणैव रौप्यसर्पांबुमुख्यमसत्यं भाति तदव्यतिरेकेण प्रतिभासासंभवात् इह लोकेऽयं नियमः सावधिः लोकसिद्धो दृष्टः सत्याश्रयेणैवासत्यं भातीति नियमः लोकसिद्धोऽस्ति किंभूतो नियमः सावधिः अवधिसहवर्तमानः नैवं रजतमित्युत्तरकालेबाधदर्शनात्। एवं बाधज्ञानदर्शनं तावदेव रजतादि भासते। अत एवास्य सत्यस्य तद्वत्सत्यस्यसत्ये ब्रह्मणि इदमखिलं जगत् प्राविरासीत्। प्रादुर्भूतं तदपि सावधित्वात्प्रातिभासिकमित्यर्थः। प्रकारांतरेण सत्यं दृढीकरोति--मिथ्येति। मिथ्याभूतं रजतादि येन प्रतीयते प्रतीतिविषयो भवति तत्सत्यमिति निश्चयेन सत्यं वदंति ॥ ५७ ॥

अन्वय:--यत् किंचित् रौप्यसर्पांबुमुख्यं व्यवहृतिविषये असत्यं भाति तत् हि सत्याश्रयेण इति अयं नियमः सावधिः लोकसिद्धः ( दृष्टः ) तद्वत् सत्यस्य सत्ये ब्रह्मणि इदं अखिलं जगत् प्राविरासीत्। मिथ्याभूतं च यतः प्रतीतं भवति तत् खलु सत्यं वदंति।

अर्थ:—व्यवहारांतील दृश्य पदार्थांमध्यें जें कांहीं रुपें, सर्प, मृगजळ इत्यादि असत्य भासतें तें सर्वही सत्याच्या आश्रयानें असतें असा हा अवधियुक्त (साधिष्ठान) नियम लोकसिद्ध आहे. त्याचप्रमाणें सत्याचेंही सत्य असें जें ब्रह्म, त्याच्या आधारावर हें सर्व जग व्यक्त होतें; आणि मिथ्याभूत सर्वही पदार्थांचा ज्याच्या योगानें प्रत्यय येतो, तेंच सत्य असें लोक म्हणतात.

विवरण:—या श्लोकामध्यें आतां पूर्णब्रह्माचें प्रतिपादन करितात. शिंपीच्या ठिकाणीं रुपें, रज्जूच्या ठिकाणीं सर्प, व मरुभूमीवर मृगजळ इत्यादि जेवढे म्हणून पदार्थ भ्रमानें भासतात, तेवढे सर्वही

शुक्ति, रज्जु, भूमिइत्यादि सत्य पदार्थांच्या आश्रयानें भासतात. रौप्यादिक भ्रम, शुक्तिका रज्जु इत्यादि व्यवहारांतील सत्य पदार्थांच्या आश्रयानें होतात. कारण शुक्ति इत्यादिक अधिष्ठान नसेलं तर ते भ्रम होणेंच संभवनीय नाहीं. सारांश या व्यवहारामध्येंसुद्धां प्रत्येक भ्रम साधिष्ठान असतो, व अधिष्ठान सत्य असतें; असा हा सावधि नियम सिद्ध झाला. सावधि म्हणजे अवधिसह. हें रजत नसून शुक्तिका आहे असें ज्ञान होईपर्यंत जो अवधि, त्या अवधीनें युक्त असा हा भ्रम असतो. किंवा अवधि म्हणजे सीमा असा अर्थ घेतल्यास, शुक्तिकेसारख्या सत्य वस्तूच्या ज्ञानापर्यंत भ्रमाची मर्यादा असते. म्हणजे सत्य अशा अधिष्ठानाचें ज्ञान होतांच भ्रमाच्या अस्तित्वाचा लोप होतो; तस्मात् असत्य हें सत्याश्रयानें असतें हा सावधि नियम सर्वलोकसिद्ध आहे. तात्पर्य अधिष्ठानाचें ज्ञान होऊन भ्रमनिरास होईपर्यंत सर्व भास सत्य वाटतात; पण अशा भ्रामक सत्याचेंही सत्य जें ब्रह्म त्याच्या आश्रयानें हें सर्व जग व्यक्त झालें आहे. तात्पर्य असें हें सत्यत्वानें भासणारें जग सावधि असल्यामुळें खरें नसून भ्रामक आहे. भ्रमांतील वस्तु ज्याच्या सत्तेमुळें प्रतीतीला येतात तेंच खरोखर सत्य असें शास्त्रज्ञ म्हणतात. ॥५७॥

यत्राकाशावकाशः कलयति च कलामात्रतां यत्र कालो
यत्रैवाशावसानं बृहदिह हि विराट्पूर्वमर्वागिवास्ते ॥
सूत्रं यत्राविरासीन्महदपि महतस्ताद्धि पूर्णाच्च पूर्णं ।
संपूर्णादर्णवादेरपि भवति यथा पूर्णमेकार्णवांभः ॥ ५८ ॥

टीकाः—अथ पूर्णं ब्रह्म दर्शयति—यत्रेति । अहो इत्याश्चर्ये तद्बृहन्महदपि स्थूलमपि विराट्पूर्वं ब्रह्म विराडिति पूर्वं उपलक्षणं यस्य एवंविधं विश्वरूपाख्यं अर्वागिवास्ते तत्किं यत्र यस्मिन्नाकाशावकाशः आकाशस्याप्यवस्थानं तथा यत्र कालः कलामात्रतां कलयति प्राप्नोति तथा यत्राशावस्थानं दिक्पर्यवस्थानं भवति एवंविधमपि अर्वागेवास्ति यथा तत्र सूत्रं आविरासीत् किंभूतं महतोपि विराजोपि महत् हिरण्य-

गर्भोत्पन्नमित्यर्थः । एवंविधं यत् तदिति निष्कर्षेण तदेव पूर्णात्पूर्णं ब्रह्म । अथ दृष्टांतमाह—यथेति । यथा स्वरूपेणैव पूर्णादर्णवादेः समुद्रादिजलाशयात् एकार्णवांभः एकीभूतं सप्तसमुद्रोदकं पूर्णात्पूर्णं तद्वत्प्रकृतेऽपीत्यर्थः । अथ श्रुतिः– "पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते" ५८

अन्वयः---यथा संपूर्णात् अर्णवादेः अपि एकार्णवांभः पूर्णं भवति ( तथा ) यत्र आकाशावकाशः अयं च कालः कलामात्रतां कलयति यत्र एव आशावसानं इह हि बृहत् विराट्पूर्वं अर्वाक् इव आस्ते यत्र महतः अपि महत् सूत्रं आविरासीत् तत् हि पूर्णात् पूर्णं ।

अर्थः—ज्याप्रमाणे उदकानें परिपूर्ण असणाऱ्या समुद्रादिकांपेक्षां सातही समुद्रांचें एकत्र झालेलें पाणी अधिक पूर्ण असतें त्याप्रमाणें ज्याठिकाणीं आकाश रहातें, जेथें हा अगणित काल एका कलेसारखा भासतो, जेथें दश दिशांनांही रहाण्यास जागा मिळते, आणि जेथें हें स्थूल विराट्ब्रह्मसुद्धां अर्वाचीन असल्यासारखें असतें, व जेथें विराडात्म्यापेक्षांही अति मोठा असा सूत्रात्मा प्रकट होतो, तें ब्रह्म निःसंशय पूर्णाहून पूर्ण आहे.

विवरणः—आतां ह्या श्लोकामध्यें "पूर्णमदः पूर्णमिदं० अवशिष्यते" या श्रुतींत प्रतिपादन केल्याप्रमाणें ब्रह्म पूर्णाहून पूर्ण आहे असें सांगतात. ज्याप्रमाणें उदकानें तुडुंब भरलेल्या एका समुद्रापेक्षां अथवा नदीपेक्षां सप्त समुद्रांचें ऐक्य झालें असतां त्याचें उदक अधिक पूर्ण असतें, त्याप्रमाणें ज्यामध्यें आकाशालाही जागा मिळते, जेथें सृष्टीच्या आरंभापासून सृष्टीच्या अंतापर्यंतचा अगणित काल एका क्षणासारखा भासतो, ज्यामध्यें दहाही दिशांचा अनायासें अंतर्भाव होतो, असा विराट्संज्ञक स्थूल समष्टीचा अभिमानी वैश्वानरही ज्याच्यामुळें अर्वाचीनसा ठरतो, तसेंच ज्या ठिकाणीं ह्या विराडापेक्षांही मोठा ( विराडाचें कारण ) हिरण्यगर्भ ( सूक्ष्मसमष्टि ) व्यक्त झाला, तें शुद्ध ब्रह्म सर्व पूर्णापेक्षां पूर्ण आहे. आकाशादिक कांहीं भूतें सर्वव्यापी असल्यामुळें पूर्ण असतात पण हें ब्रह्म त्याहूनही ह्मणजे निरतिशय पूर्ण आहे. ॥१८॥

अन्तः सर्वौषधीनां पृथगमितरसैर्गंधवीर्यैर्विपाकै-
रेकं पाथोदपाथःपरिणमति यथा तद्वदेवान्तरात्मा ॥
नानाभूतस्वभावैर्वहति वसुमती येन विश्वं पयोदो
वर्षत्युच्चैर्हुताशः पचति दहति वा येन सर्वांतरोसौ ५९

टीकाः—अथ सर्वांतरं ब्रह्माह-स्पष्टार्थमिदं पद्यम् । श्रुतिरपि—"यःपृथिव्यांतिष्ठन्पृथिव्या अंतरोयंपृथिवीनवेदेत्यादिका" ॥ ५९ ॥

अन्वयः—यथा एकं पाथोदपाथः सर्वौषधीनां अंतः अमितरसैः गंधवीर्यैः विपाकैः पृथक् परिणमति । तद्वत एव अंतरात्मा । नानाभूतस्वभावैः येन वसुमती वहति । ( येन ) पयोदः विश्वं उच्चैः वर्षति । हुताशः येन पचति दहति वा ( सः ) असौ सर्वांतरः ( अस्ति ) ।

अर्थः—एकच मेघोदक अनेक औषधींमध्यें अनेक रस, अनेक गंध, निरनिराळी शक्ति व पृथक् पाक इत्यादि निरनिराळ्या प्रकारांनीं जसें परिणत होतें ( ह्मणजे एकच उदक निरनिराळ्या वनस्पतीमध्यें गेलें असतां जसें निरनिराळ्या गुणधर्मांनीं युक्त होतें ), त्याप्रमाणेच हा अंतरात्मा ( परिणाम पावतो ), नानाप्रकारच्या भूतस्वभावांनीं ही पृथ्वी ज्याच्यामुळें व्यवहार युक्त होते, ज्याच्यायोगानें पृथ्वीवर मेघ जलाचा मोठा वर्षाव करितो, व ज्याच्यामुळें अग्नि पाक व दाह करितो, तोच हा सर्वांच्या अंतर्यामीं रहाणारा परमात्मा होय.

विवरणः—या श्लोकामध्यें ब्रह्मच सर्व सृष्ट पदार्थांमध्यें ओतप्रोत भरून राहिलें आहे, असें "यःपृथिव्यां तिष्ठन्" इत्यादि बृहदारण्यकाच्या तिसऱ्या अध्यायांतील सातव्या खंडामध्यें सांगितलें आहे; व आचार्यांनीं तीच गोष्ट मेघोदकाच्या दृष्टांतानें येथें स्पष्ट केली आहे. जसें एकच उदक नानाउपाधींच्या संसर्गानें नानाप्रकारचे रस, रूप, गंध इत्यादिकांनीं युक्त होतें, तसेंच अनेक उपाधींच्या योगानें एकच ब्रह्म अनेक प्रकारांनीं भासतें. ॥५९॥

भूतेष्वात्मानमात्मन्यनुगतमखिलं भूतजातं प्रपश्ये-
त्प्रायःपाथस्तरंगान्वयवदथ चिरं सर्वमात्मैव पश्येत् ॥
एकं ब्रह्माद्वितीयं श्रुतिशिरसि मतं नेह नानास्ति किंचि-
न्मृत्योराप्नोति मृत्युं स इह जगदिदं यस्तु नानेव पश्येत् ॥

टीका:-अथ ब्रह्मण एकत्वे भूलश्रुतिउद्धारिणीमीशावास्योपनिषच्छ्रुतिं सं-वादयन्नाह-भूतेष्विति। भूतेषु वस्तुषु आत्मानं एकं पश्येत् तथा एकस्मिन्नात्म-नि अखिलं समग्रं भूतजातं प्रायः बाहुल्येन चिरकालं प्रपश्येत्। किमिव पाय-स्तरंगावयववत् पायश्च तरंगाश्च तेषामन्वयः संबंधः तद्वत्। अथैकस्मिन्नुदके सहस्रशस्तरंगाः दृश्यंते तथा सर्वेषु तरंगेषु एकं जलमेव दृश्यते नान्यत् किंचित्पदार्थांतरं अनुभूयत इत्यर्थः। एवमनेकैकप्रकारैः एकमद्वितीयं ब्रह्मैव श्रुतिभिर्वर्णितं निरूपितं परंतु इह किंचिन्नाना नाम न विद्यते वस्तुतस्तु नाना न भवति परंतु यः नानेव पश्येत्स मृत्योर्देहाहंकाराभिनिवेशात्पुनर्दुः-खमेवाप्नोतीति। श्रुतिरपि— "यस्तु सर्वाणि भूतान्यात्मन्येवानुपश्यति। सर्वभूते-षु चात्मानं ततो न विजुगुप्सते" ॥ "उत्तमाधमभावेन तारतम्यं करोति यः"। "तथा मृत्योः समृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति" ॥ १० ॥

अन्वयः—भूतेषु आत्मानं आत्मनि च अखिलं भूतजातं पायस्तरंगावयवत् अनुगत प्रायः प्रपश्येत्। ब्रह्म एकं अद्वितीयं (च) श्रुतिशिरसिमतं (अतः) अथ चिरं सर्वं आत्मा एव पश्येत्। यः तु इदं जगत् नाना इव पश्येत् स मृत्योः मृत्युं आप्नोति (यतः) इह किंचित् नाना न अस्ति।

अर्थः-अनेक भूतांमध्यें एक आत्मा व एका आत्म्याचे ठिकाणीं, जल आणि त्याचे तरंग यांच्या संबंधाप्रमाणें, हें समग्र भूतजात ओतप्रोत भरलेलें आहे असें पहावें. ब्रह्म अद्वितीय व एक आहे असें उपनिषदांत सांगितलें आहे; म्हणून सर्वत्रां सर्वही सृष्टि आत्माच आहे असें पहावें. जो ह्या जगाकडे द्वैतरूपानें पहातो तो मृत्युपरंपरेमध्यें सांपडतो; कारण ह्या जगामध्यें अनेक असें कांहीं नाहीं.

विवरण:—ह्या श्लोकांत ब्रह्म एक आहे असें प्रतिपादन कर-णाऱ्या अनेक मूल श्रुतींना पुष्टि देणाऱ्या 'यस्तु सर्वाणि० न विजु-गुप्सते' या ईशावास्यश्रुतीचा व 'जगांत नानात्वाची भावना ठेवणा-रा पुरुष मृत्यूच्या परंपरेंत सांपडतो' असें सांगणाऱ्या 'मृत्योः स मृत्युमाप्नोति०' इत्यादि कठश्रुतीचा अनुवाद केला आहे. ज्याप्रमाणें एकाच उदकांत हजारों तरंग दिसतात व त्यांत एकाउदकावांचून अन्य कांहीं नसतें; त्याचप्रमाणें जड व चर असे अनेक पदार्थ आपणाला जगांत दिसतात खरे पण त्या सर्वांमध्यें एक आत्मा भरून राहिलेला आहे व हीं सर्व भूतें आत्म्यामध्यें भरून राहिलीं आहेत. शिवाय अनेक श्रुतींमध्यें आत्मा सजातीय, विजातीयादि

भेदरहित आहे असेंच प्रतिपादन केलेलें आहे. वास्तव साधकानें तात्त्विक दृष्टीनें सर्वत्र एक आत्मतत्त्वच आहे अशी भावना ठेवावी. पण या अनुशासनाविरुद्ध जो जगांत परमार्थतः अनेकत्वाची भावना ठेवितो तो देहाभिमान नष्ट न झाल्यामुळें जन्ममरणपरंपरेंत पडतो. सारांश परमार्थदृष्टीनें सर्वत्र अद्वैतभावना ठेवणें परमश्रेयस्कर आहे.६०

प्राक् पश्चादस्ति कुंभाद्गगनमिदमिति प्रत्यये सत्यपीदं ।
कुम्भोत्पत्तावुदेति प्रलयमुपगते नश्यतीत्यन्यदेशम् ॥
नीते कुंभेन साकं व्रजति भजति वा तत्प्रमाणानुकारं ।
इत्थं मिथ्या प्रतीतिः स्फुरति तनुभृतां विश्वतस्तद्वदात्मा ॥

टीकाः—अथोक्तं प्रमेयं दृष्टान्तेन दृढीकुर्वन्नाह—प्रागिति । इदं गगनमाकाशः कुंभात्सकाशात्प्राक् पश्चादस्तीति प्रत्यये सत्यपि तनुभृतां इत्थमितिप्रकारैर्मिथ्याप्रतीतिः स्फुरति । अथ तमेवाह—इदं घटावच्छिन्नं गगनं घटोत्पत्तौ सत्यां उदेति उत्पद्यते तथैव घटे प्रलयं नाशमुपगते घटाकाशो नश्यति तथा कुंभे अन्यदेशं प्रदेशान्तरं नीते सति गगनमपि कुंभेन साकं व्रजति तत्प्रमाणानुकारं भजति लघीयसि महति च घटे तत्प्रमाणं भवति । यथा दीर्घे वक्रे निम्ने वा घटे तत्तदाकारं तद्वत् विश्वतश्चराचरात्प्राक् पश्चाच्चात्मा वर्तत इति ज्ञात्वापि पूर्ववत्तथापि स्यामकल्पनं भ्रान्तमेवेत्यर्थः ॥ ६१ ॥

अन्वयः—कुंभात् प्राक् पश्चात् च इदं गगनं अस्ति । इति प्रत्यये ( सति ) अपि इदं कुंभोत्पत्तौ उदेति । प्रलयं उपगते नश्यति । अन्यदेशं नीते ( सति ) कुंभेन साकं व्रजति वा तत्प्रमाणानुकारं भजति इत्थं तनुभृतां मिथ्या प्रतीतिः स्फुरति तद्वत् विश्वतः आत्मा ( अस्ति )।

अर्थः—घटाच्या उत्पत्तीपूर्वी व नाशानंतर हें आकाश असतें; असा प्रत्यय येत असूनही हें घटाकाश घटोत्पत्ति झाली असतां उत्पन्न होतें, घट नष्ट होतांच तें नष्ट होतें, तो घट अन्य ठिकाणीं नेला असतां त्याच्यासह जातें, व घटाच्या प्रमाणाचें होतें; इत्यादि प्राण्यांना मिथ्याप्रतीति अशी होते, तसाच विश्वाच्या पूर्वी व नंतर हा आत्मा असतो.( पण तो उत्पन्न होतो,लय पावतो इत्यादि मिथ्या ज्ञान होतें.)

विवरणः—श्रीमत् आचार्यांनीं पूर्वश्लोकांत ज्या सिद्धांताचें

प्रतिपादन केलें, त्याचेंच ह्या श्लोकांत ते दृढीकरण करितात. हें आकाश सर्वदा स्वस्वरूपानें असतें; तरी घटाची उत्पत्ति झाली असतां महाकाशाहून निराळें असें घटाकाश उत्पन्न होतें; घट नष्ट झाला असतां तेंही नाश पावतें; घट इकडे तिकडे नेला असतां तेंहि त्याबरोबर जातें, व घटाकाराप्रमाणेंच तें वर्तुलाकार, लहान, मोठें होतें अशी सर्व प्राण्यांना खोटीच प्रतीति येते. त्याप्रमाणेंच ह्या सर्व चराचर सृष्टीच्या पूर्वी व नंतर आत्मा स्वरूपानेंच असतो; असें जाणूनही दृष्टान्तांतील आकाशाप्रमाणेंच प्राणी त्याविषयीं भ्रांतिमूलक अनेक कल्पना करितात.॥ ६१ ॥

यावान्पिण्डो गुडस्य स्फुरति मधुरिमैवास्ति सर्वोऽपि तावा-
न्यावान्कर्पूरपिण्डःपरिणमति सदामोद एवात्र तावान् ॥
विश्वं यावद्विभाति द्रुमनगनगरारामचैत्याभिरामं ।
तावच्चैतन्यमेकं प्रविकसति यतस्तत्तदात्मावशेषम् ॥

टीकाः—अथ प्रकारान्तरेणापि ब्रह्मणः सर्वात्मकत्वमाह—यावान्पिण्ड इति। स्पष्टार्थमिदं पद्यम्। ॥ ६२ ॥

अन्वयः—यावान् गुडस्य पिण्डः स्फुरति तावान् सर्वः अपि मधुरिमा एव अस्ति। ( तथा ) यावान् कर्पूरपिण्डः अत्र तावान् सदा आमोदः एव परिणमति। यावत् द्रुमनगनगरारामचैत्याभिरामं विश्वं विभाति तावत् चैतन्यं एकं प्रविकसति यतः तत् तत् आत्मावशेषम्।

अर्थः—जेवढा गुळाचा खडा दिसतो तेवढा तो पूर्णपणें गोडीनें युक्त असतो. तसेंच जेवढा कापुराचा खडा असतो तेवढा तो सर्वही सर्वदा वासानें भरलेला असतो. त्याचप्रमाणें वृक्ष, पर्वत, नगरें, उपवनें, यज्ञभूमि इत्यादिकांनीं रमणीय वाटणारें हें जग जेवढें म्हणून प्रत्ययाला येतें तेवढें तें सर्वही एक चैतन्यच स्फुरत असतें. कारण तें तें सर्वही पदार्थजात आत्म्याचाच अंश आहे.

विवरणः—पुनः अन्य तऱ्हेनें आत्म्याचें सर्वात्मकत्व सिद्ध करितात. जेवढा गुळाचा खडा तेवढी गोडी किंवा जेवढा कापूर तेवढाच परिमल असा व्यवहारांत आपणाला नेहमी अनुभव येतो.

त्याचप्रमाणें वृक्षादि अनेक पदार्थांनीं भरलेलें हें जग जेवढें म्हणून प्रत्ययाला येतें तेवढें तें सर्वही चैतन्यच आहे; अन्य कांहीं नाहीं. कारण जो जो पदार्थ आपण पहावा तो तो सर्वही आत्म्याचाच शेष आहे. तो परमात्मा आपल्या एका अंशानें सर्व सृष्टीला व्यापितो, व त्याचे तीन अंश केवल अवस्थेंत असतात; असें वेदवचनही आहे.१२

वाद्यान्नादानुभूतिर्यदपि तदपि सा नूनमाघातगम्या ।
वाद्याघातध्वनीनां पृथगनुभवतः किंतु तत्साहचर्यात् ॥
मायोपादानमेतत्सहचरितमिव ब्रह्मणा भाति तद्व-
त्तस्मिन्प्रत्यक्प्रतीते न किमपि विषयीभावमाप्नोति यस्मात्

टीका:—अथ पुनरपि ब्रह्मणः सर्वात्मकत्वमाह—वाद्यादिति । यद्यपि वाद्यात्सकाशान्नादानुभूतिर्भवति तदपि तथापि सा नादानुभूतिः आघातगम्या आघातव्यतिरेकेण नोत्पद्यते आघात इत्युपलक्षणं क्वचिदाघातेन क्वचिद्वादनेन क्वचिद्वायोरास्फुरणेन नादानुभूतिर्भवति किंतु साहचर्यादेकस-मवायच्छेदेन भवतीति प्रत्यक्षसिद्धं तद्वदेतन्मायोपादानं विश्वं ब्रह्मणा सार्कं सहचरितमेवाभाति । अत्र श्रुतिः—'यथा दुन्दुभेर्हन्यमानस्य न बाह्याञ्छब्दाञ्छ-क्नुयाद्ग्रहणाय दुन्दुभेस्तु ग्रहणेन दुन्दुभ्याघातस्य वा शब्दो गृहीतः ॥ १३ ॥

अन्वयः—यदपि वाद्यात् नादानुभूतिः तदपि नून सा आघातगम्या वाद्याघात-ध्वनीनां अनुभवतः पृथक् किंतु तत् साहचर्यात् ( अनुभूयते ) तद्वत् एतत् मा-योपादानं ब्रह्मणा सहचरितं इव आभाति । यस्मात् तस्मिन् प्रत्यक्प्रतीते सति किमपि विषयीभाव न आप्नोति ।

अर्थः—जरि वाद्यापासून नाद निघतो असें वाटतें तरि तो खरोखर आघातामुळें निघत असतो. वाद्य, आघात व ध्वनि हीं वस्तुतः पृथक् असतात. परंतु, त्यांचा अनुभव मात्र एकदम येतो. तसेंच हें मायाद्रव्यानें तयार झालेलें जग ब्रह्मासहव-र्तमान असल्यासारखें भासतें ( पण तें पृथक् आहे ). कारण तें ब्रह्मच माझा आत्मा आहे असा प्रत्यय आला असतां त्या पुरु-षाला कोणत्याच विषयाची भावना होत नाहीं.

विवरणः—ह्या श्लोकांत सुद्धां आचार्य ब्रह्माच्या सर्वात्मकतेचेंच प्रतिपादन करितात. नगारा, नौबत इत्यादि वाद्यांवर काठीनें प्रहार केला असतां त्यांचा मोठा ध्वनि होतो. पण तो आघातावांचून कधीं-

च होत नाहीं. आतां वाद्य, प्रहार व ध्वनि हे तीन पदार्थ एकमेकांहून अगदीं निरनिराळे आहेत, असें सर्वांनाही जगीं ठाऊक असतें तरी वाद्यांचा ध्वनी ऐकतांना हें कोणाच्या ध्यानांत येत नाहीं; तर आम्हाला वाद्य, प्रहार, व ध्वनि यांचा एकाच कालीं प्रत्यय येतो. तसेंच मायाद्रव्यानें बनलेलें हें जग ब्रह्मावरोबर भासतें. ब्र० ब्रह्म व जग हीं निरनिराळ्या धर्मांचीं व परस्पर विरुद्ध अशीं दोन तत्त्वें. पृथक् न भासतां एकरूपानें भासतात. पण खरोखर पहातां ब्रह्म जगाहून अगदी भिन्न आहे. कारण एकदां 'चित्स्वरूप ब्रह्म मी आहें' असा अनुभव आला कीं मग जगाचें भानच नाहींसें होतें व त्यामुळें मी विषयी आहें व जगांतील इतर पदार्थ माझे विषय आहेत असें कधींच वाटत नाहीं. 'यथा दुंदुभेर्हन्यमानस्य०' इत्यादि प्रमाणभूत श्रुतींतील ध्वनीचा दृष्टान्तच येथें आचार्यांनीं दिला आहे. आघात या शब्दाचा अर्थ उपलक्षणेनें प्रहार, किंवा तोंडानें फुंकिणें असा करावा. कारण सनईसारख्या वाद्यांचा ध्वनि तोंडानें फुंकिलें असतां होतो हें सर्वप्रसिद्ध आहे. ॥६३॥

दृष्टः साक्षादिदानीमिह खलु जगतामीश्वरः संविदात्मा ।
विज्ञानस्थाणुरेको गगनवदभितः सर्वभूतान्तरात्मा ॥
दृष्टं ब्रह्मातिरिक्तं सकलमिदमसद्रूपमाभासमात्रं ।
शुद्धंब्रह्माहमस्मीत्यविरतमधुनात्रैव तिष्ठेदनीहः ॥६४ ॥

टीका—अथ निरूपितप्रमेयस्य पर्यवसितमर्थमाह—दृष्ट इति । स्पष्टोर्थः । विज्ञानकोशप्रकरणं समाप्तम् ॥ ६४ ॥

**अन्वयः**—इह खलु संविदात्मा विज्ञानस्थाणुः एकः गगनवदभितः सर्वभूतान्तरात्मा जगतां ईश्वरः इदानीं साक्षात् दृष्टः । ब्रह्मातिरिक्तं इदं सकलं असद्रूपं आभासमात्रं दृष्टं । अहं शुद्धं ब्रह्म अस्मि । इति अधुना अनीहः अत्र एव अविरतं तिष्ठेत् ।

**अर्थः—खरोखर ह्याच देहामध्यें, ज्ञानरूप, अनुभवाचा जणुं स्तंभ, एक, आकाशासारिखा व्यापी व सर्वभूतांचा अंतरात्मा असा जगाचा नियन्ता मीं आतां साक्षात् पाहिला; तसेंच ब्रह्माहून**

निराळें असें हें सर्व जग शून्यरूप व केवळ भास आहे असेंही पाहिलें; व मीच शुद्धब्रह्म आहें, ह्मणून आतां कोणतीही क्रिया न करितां सर्वदां याच स्थितीमध्यें असावें.

**विवरण:**—येथपर्यंत निरूपण केलेल्या सिद्धान्ताचें आतां फल सांगतात. आत्मज्ञानाच्या उपायांचें पूर्णपणें अनुष्ठान केल्यामुळें चित्त-शुद्धि होऊन ह्याच देहामध्यें असतांना मला जगन्नियंत्याचा अनुभव आला. तत्त्वभूत ब्रह्माहून अन्य पदार्थजात मिथ्या आहे, व त्याचा जो प्रत्यय येत असतो तो केवल भास आहे. अशीही माझी खात्री झाली; व शुद्ध ब्रह्म तें मीच आहें असा मला निःसंशय अनुभव आला; ह्मणून आतां यापुढें मी निष्क्रिय होऊन मरेपर्यंत असाच या देहांत रहाणार. सारांश या सिद्धस्थितीतच मीं (साधकानें) सर्वदां रहावें एवढीच मी इच्छा करितों. या ठिकाणीं या ग्रंथांतील विज्ञानकोश प्रकरण समाप्त झालें. ॥ ६४ ॥

इन्द्रेन्द्राण्योः प्रकामं सुरतसुखजुषोः स्याद्रतान्तः सुषुप्ति-
स्तस्यामानन्दसान्द्रं पदमतिगहनं यत्स आनंदकोशः ॥
तस्मिन्नो वेद किंचिन्निरतिशयसुखाभ्यन्तरे लीयमानो
दुःखीस्याद्बोधितः सन्निति कुशलमतिर्बोधयेन्नैव सुप्तम्

टीका:—अथानंदकोशं व्याख्यायते । तत्रानंदस्वरूपस्य ब्रह्मणोऽभि-व्यक्तिः सुषुप्तौ भवतीति सुषुप्तिस्वरूपमाह—इंद्रेन्द्राण्योरिति । इंद्रश्च इंद्राणी च तयोः प्रकामं स्वेच्छया सुरतसुखमभिलषतोः योरन्तः सुरतसमा-प्तिः सा सुषुप्तिः । यथा लोके शुक्रक्षयोपलक्षितं सुरतान्ते सुखाविर्भावो भवति तथैवेंद्रेंद्राण्योः सुषुप्तौ सुखाविर्भावो भवति । तत्रेंद्रो नाम दक्षिणाक्षिपुरुषः । तथा वामनेत्रस्थं अर्थप्रकाशकं ज्योतिः इंद्राणी, तयोर्जाग्रत्यां भ्रूमध्यंतरस्थाने स्वाप-काले तस्मादवरुह्य हृदयाकाशे पुरीतन्नाडीस्थाने तिष्ठतोस्तयोः सुरतप्रसंगः स्वभावस्था सुरतान्तः सुषुप्तिः तस्यां यदानंदसान्द्रं पदं स्थानं स एवानंदकोशः तस्मिन्सुषुप्त्युपलक्षित आनंदकोशे जीवः किंचिदपि वेद न जानाति कुत इत्यत आह निरतिशयसुखाभ्यंतरे लीयमानः । न विद्यते अतिशयो यस्मात्तन्निर-तिशयं सुखं परमानंदः तत्र लीयमानो लुप्ताहंकारत्वात् । अथ तस्य सुखस्य निरतिशयत्वं प्रकटयन्नाह । दुःखी स्यादिति—यतो बोधितः बलात्कारेण

जागरयिता प्राणिनः सन् दुःखी भवति दुःखं प्राप्नोति । भोजनादिविषयसु-खप्राप्त्यर्थं अपि बोधितः दुःखमाप्नोति तस्माद्विषयसुखापेक्षया आत्मसुखमेव निरतिशयमित्यर्थः । यस्मादेवं तस्मात्कारणात्कुशलमतिः ज्ञाता पुरुषः सुप्तं सुषु-प्त्यवस्थं पुरुषं नैव बोधयेत् । निद्राभंगं न कुर्यात् । श्रुत्युक्तप्रत्यवायश्रवणात् एवमिंद्रेंद्राणीरतान्तविषयं जगन्मिथ्यात्वप्रकरणे बह्वृचः शतपथश्रुतयः संभाष्य सम्यगुदाहृता भवन्ति । अथ स्वप्नसुषुप्तिविषयिणी श्रुतिः—"अथ हैतत्पुरुषः स्वपिति नाम गृहीत एव प्राणो भवति गृहीता वाक्गृहीतं चक्षुः गृहीतं श्रोत्रं गृहीतं मनः सयत्रैतत्स्वप्नया चरति तेहास्य लोकास्तदुतेव महाराजो भवति उतेव महाब्राह्मण उतेवोच्चावचं निगच्छति स यथाकामं परिवर्तते" तथा—"अथ-यदा न कस्य चन वेद हिता नाम नाड्यो द्वासप्ततिसहस्राणि हृदयात्पुरीततमभिप्रतिष्ठ-न्ते ताभिः प्रत्यवसृप्य पुरीतति शेते । स यथा कुमारो वा महाब्राह्मणो वाऽतिघ्नीमानन्द-स्य गत्वा शयीतैवमेवैष एतच्छेते" ॥ ६५ ॥

**अन्वयः**— प्रकाम सुरतसुखजुषोः इन्द्रेन्द्राण्योः रतान्तः सुषुप्तिः स्यात् । यत् अतिगहन आनन्दघनं पदं स आनंदकोशः । तस्मिन् निरतिशयसुखाभ्य-न्तरे लीयमानः किंचित् न वेद । बोधितः सन् दुःखी स्यात् इति कुशलमतिः सुप्तं नैव बोधयेत् ।

**अर्थः**—यथेच्छ संगमसुखाचा अभिलाष करणाऱ्या इंद्र-इंद्राणीची जी रतिसमाप्ति तीच सुषुप्ति होय. त्या अवस्थेंतील अति गहन व आनंदघन असें जें स्थान तोच आनंदकोश होय. त्या निद्रावस्थेंतील अत्यन्त सुखामध्यें लीन झालेला प्राणी कांहींच जाणत नाहीं. व त्याला झोपेंतून जागें केलें असतां दुःख होतें. ह्मणून शहाण्यापुरुषानें निद्रितालां उठवूं नये.

**विवरणः**—आतां यापुढें आनंदमय कोशाचें व्याख्यान करितात. आनंदस्वरूप ब्रह्माचा निद्रावस्थेंत स्पष्ट अनुभव येत असतो, म्हणून प्रथमतः त्या अवस्थेचेंच स्वरूप ह्या श्लोकांत सांगतात. दक्षिण नेत्रांतील दृक्शक्तिमान् पुरुषाला इंद्र व डाव्या नेत्रांतील विषयप्रका-शक ज्योतीला इंद्राणी असें म्हणतात. त्या दोघांच्या संगमाची जी समाप्ति तीच निद्रावस्था होय. लौकिक सुरताच्या अंतीं ह्मणजे रेतस्खलनाच्या वेळीं जसें सुख होतें तसेंच इंद्र व इंद्राणी यांच्या संभोग समाप्तिकालीं (म्ह० निद्रावस्थेंत) सुख होतें. जाग्रतीमध्यें तीं दोघें भुवयांच्या मध्यभागीं राहतात; निद्रा आली असतां तीं दोघें

तेथून निघून हृदयाकाशांतील पुरीतति नांवाच्या सूक्ष्म नाडींत जाऊन एकत्र रहातात. तेथें जो त्यांचा सुरतप्रसंग (संगम) होतो तीच स्वप्नावस्था व त्या संगमाची समाप्ति हीच निद्रावस्था होय. त्या गाढ निद्रेंतील जें आनंदानें भरलेलें स्थान तोच शेवटचा (पांचवा) आनंदमय कोश होय. त्या सुषुप्तिरूप आनंदकोशामध्यें जीव मग्न झाला कीं त्याला कांहीं समजत नाहीं. कारण तो त्यावेळीं निरतिशय सुखामध्यें गुंग होऊन गेलेला असतो. आतां 'दुःखी स्यात्०' इत्यादि चतुर्थ चरणांत त्या सुखाचा सर्वातिशयपणा व्यक्त करितात. निद्रित पुरुषाला जर झोंपेंतून बलात्कारानें उठविलें तर त्याला मोठें दुःख होतें. फार काय पण त्याच्याच हिताकरितां (म्ह० भोजनादि विषयसुख घेण्याकरितां) जरि त्याला एकदम जागें केलें तरि तो उठविणाऱ्यावर अतिशय रागावतो. तस्मात् सर्व विषयजन्य सुखांहून आत्मसुखच श्रेष्ठ आहे ही गोष्ट सिद्ध झाली. सारांश आत्मसुख सर्वांत अधिक असल्यामुळें, निद्रावस्थेंत सुख भोगीत असलेल्या पुरुषाला सुज्ञ मनुष्यानें जागें करूं नये. कारण श्रुतीमध्येंही निद्राभंग करण्यांत मोठा दोष सांगितला आहे. ह्या श्लोकांतील प्रतिपादनाला अनेक शतपथ श्रुति प्रमाण आहेत. स्वप्न व सुषुप्ति यांविषयीं 'अथ हैतत्पुरुषः० कामं परिवर्तते' 'अथ यदा न कस्य च न० एवमेवैष तच्छेते' इत्यादि अनेक श्रुति श्लोकप्रतिपादित अर्थाचेंच पुष्टिकरण करित आहेत ॥ ६२ ॥

सर्वे नन्दति जीवा अधिगतयशसा गृह्णता चक्षुरादी-
नन्तःसर्वोपकर्त्रा बहिरपि च सुपुप्ता यथा तुल्यसंस्थाः॥
एतेषां किल्बिषस्पृक् जठरभृतिकृते यो बहिर्वृत्तिरास्ते
त्वक्चक्षुःश्रोत्रनासारसनवशमितो याति शोकं च मोहम्

टीकाः—अथास्मिन्नर्थे कठवाक्यीयां श्रुतिं संवादयन्नाह सर्वे इति। अधिगतेन प्राप्तेन यशसा ब्रह्मणा कृत्स्ना सर्वे जीवाः नन्दन्ति परमसुखं प्राप्नुवन्ति आत्मसाक्षात्कारे वर्णाश्रमादयः प्रयासका भवन्ति किंभूतेन बहिरपि च

सर्वोपकर्त्रा इंद्रियद्वाराविषयभोगदानेनाराद्युपकारकेण किंभूताः जीवाः तुल्यसंस्थाः आत्मप्राप्तौ तुल्या संस्था संस्थानं येषां ते जातिप्रयुक्ततारतम्यवर्जिता इत्यर्थः । अत्र दृष्टांतमाह-सुषुप्ताविति । सुषुप्तौ यथास्माकारांतःकरणवृत्तौ सत्यां सकलजीवानां सुखतारतम्यं नास्ति तद्वदात्मप्रतीतावपि । अथैतेषां जीवानां मध्ये यः जठरभृतिकृते अन्नादिविषयभोगार्थं बहिर्वृत्तिरास्ते स किल्बिषं दुःखं स्पृशति स तथा । अथैतदेव प्रकटयन्नाह—त्वगित्यादि त्वक्चक्षुःश्रोत्रनासारसनवशामितः इंद्रियाधीनत्वं प्राप्तः सन् शोकं मोहं च याति विषयाप्राप्तौ शोकप्राप्तौ च मोहमित्यर्थः । श्रुतिः—'सर्वे नंदंति यशसागतेन सभासाहेन सख्या सखायः । किल्बिषस्पृत्पितुषणिर्ह्येषामरंहितो भवतिवाजिनाय'' ॥ ६६ ॥

अन्वयः—चक्षुरादीन् अंतः गृह्णता बहिः अपि च सर्वोपकर्त्रा अधिगतयशसा यथा सुषुप्तौ (तथा) तुल्यसंस्थाः सर्वे जीवाः नन्दन्ति । एतेषां यः जठरभृतिकृते बहिर्वृत्तिः आस्ते (सः) किल्बिषस्पृक् । (सः) त्वक्चक्षुःश्रोत्रनासारसनवशं इतः सन् शोकं मोहं च याति ।

**अर्थः—आंत चक्षुरादिक इंद्रियांना व्यापणाऱ्या व बाहेरही (विषयद्वारा) सर्वांवर उपकार करणाऱ्या आणि (सर्वदा सर्वांना) प्राप्त असलेल्या ब्रह्मानें, गाढ निद्रावस्थेप्रमाणें सारख्या स्थितींत असणारे सर्व जीव आनंदित होतात. त्यांतील जो पोट भरण्यास्तव बहिर्वृत्ति (देहेंद्रियाभिमानी) होतो तो दुःख भोगतो (ह्मणजे) त्वक्, चक्षु, श्रोत्र, घ्राण व रसना यांच्या अधीन झाल्यानें त्याला शोक व मोह होतो.**

**विवरणः**—पूर्व श्लोकांत आत्मसुख सर्वांत श्रेष्ठ आहे असें सुषुप्तींतील अनुभवानें दाखविलें. आतां येथें त्याच अर्थाचें प्रतिपादन करणाऱ्या ऋग्वेदस्थ 'सर्वे नंदन्ति यशसा०' इत्यादि श्रुतीचा अनुवाद करितात. आत्मा (ब्रह्म) सर्वप्राण्यांच्या हृद्देशीं असल्यामुळें सर्वांना पूर्वींच प्राप्त झालेला आहे. अशा त्या सर्वांच्याही अगदीं जवळ असणाऱ्या, देहांत नेत्रादि इंद्रियांना दर्शन, श्रवण इत्यादिशक्ति देऊन (ह्म० त्यांना स्वाधीन ठेऊन) व देहाबाहेर रूपरसादि विषयांचा भोग करवून सर्व प्राण्यांवर उपकार करणाऱ्या आत्म्याच्या सत्तेनें सर्वांना आनंद होत असतो. निद्रावस्थेमध्यें सर्व एका अनिर्वाच्य रूपाला जाऊन मिळत असतात; व त्यामुळें त्यांच्यामध्यें जसा कोणत्याही प्रकारचा भेद रहात नसतो, तसाच ह्या सर्वही प्राण्यांमध्यें

वस्तुतः वर्णाश्रमादि कोणत्याही प्रकारचा भेद नाहीं. पण ह्यांच्यापैकीं जो प्राणी उदरभरणार्थ अन्नादि विषय संपादन करूं लागतो तो तत्क्षणींच दुःखी होतो. त्वचेनें स्त्र्यादि स्पर्शाच्या, नेत्रानें सौंदर्यादि रूपाच्या, श्रोत्रानें गायनादि श्रवणाच्या, घ्राणानें सुगंधादि वासाच्या व रसनेनें मिष्टान्नादि रसाच्या पुरुष अधीन झाला कीं मोहित होऊन दुःखांत पडतो. सारांश हा संसार अनर्थकर होण्याला हे विषयच कारण आहेत. तस्मात् विचारवानानें निरतिशय सुखरूप आत्म्याकडे अनुसंधान ठेऊन केवळ विषयचिंतनानेंच प्राप्त होणाऱ्या अनर्थाला टाळावें. हाच खरा पुरुषार्थ आहे. ॥ ६६ ॥

जाग्रत्यामन्तरात्मा विषयसुखकृतेऽनेकयत्नान्विधास्यन् ।
श्राम्यत्सर्वेंद्रियौघोधिगतमपि सुखं विस्मरन्याति निद्राम्॥
विश्रामाय स्वरूपे त्वतितरसुलभं तेन चातींद्रियं हि ।
सौख्यं सर्वोत्तमं स्यात्परिणतिविरसादिंद्रियोत्थात्सुखाच्च

टीका:—अथ परमानंदापेक्षया क्षुद्रानन्दानां अतितुच्छत्वं अनर्थास्पदत्वमने-कासिद्धत्वं निरूपयति—जाग्रत्यां जाग्रदवस्थायां अंतरात्मा जीवः विषयसुखनिमित्तं अनेकयत्नान्विधास्यन् कारयन् वर्तते तत्र विद्यार्जन-देशपर्यटनात् दुःशीलप्रभुसमाराधनात् शुश्रूषासेवादिना प्राणसमर्पणात् चौर-द्यूतहिंसापर्यवसन्नकर्मकरणात्मिति नानाविधायासोपजीविनः एवं सर्वोऽपि जनः स्वस्वाश्रमविरुद्धेन विषयसुखाय यतते। तत्र श्राम्यत्सर्वेंद्रियौघः शिथिलीभूतकरचरणवागादीन्द्रियसमूहः प्रमाणविनिवृत्तत्वात् प्राप्तमपि विषयं विस्मरन् विश्रामाय स्वस्वरूपावस्थानं स्वरूपं क्षण निद्रां याति अथापि विषयसमुद्विग्नस्य विश्रान्त्यै निद्रैव शरणमित्यर्थः। तेन कारणेन इंद्रियातीतस्वात्मसुखम् अतींद्रियसुखं सर्वोत्तमं सर्वापेक्षया श्रेष्ठतमं। तथा च अतितरसुलभं विषयसुखप्रयासापेक्षया अल्पप्रयाससाध्यमित्यर्थः। भगवत्प्रयाससाध्यं किमपि विषयसुखं क्षणभंगुरमंते च विरसमित्याह किंभूतादिंद्रियसुखात्प-रिणतिविरसात् परिणामे दुःखप्रदात् ॥ ६७ ॥

**अन्वयः**—जाग्रत्यां अंतरात्मा विषयसुखकृते अनेकयत्नान् विधास्यन् श्राम्यत्सर्वेंद्रियौघः अधिगतं सुखं अपि विस्मरन् स्वरूपे विश्रामाय निद्रां याति। तेन तु परिणतिविरसात् इंद्रियोत्थात् सुखात् च अतींद्रियं हि सौख्यं सर्वोत्तमं अतितरसुलभं च अस्ति।

**अर्थः—जाग्रत्यवस्थेमध्यें जीव विषयसुखाकरितां अनेक प्रयत्न करितो पण त्यामुळें त्याचा सर्व इंद्रियसमुदाय श्रान्त झाला असतां (विषयांपासून) प्राप्त झालेल्या सुखालाही विसरून श्रम परिहारार्थ तो स्वात्मस्वरूपांत निद्रित (लीन) होतो. यास्तव परिणामीं दुःख देणाऱ्या व इंद्रियांच्या योगानें प्राप्त होणाऱ्या सुखाहून हें अतींद्रिय सुखच श्रेष्ठ आणि अत्यंत सुलभ आहे.**

विवरणः—परमानंदापुढें हें विषयोपभोगापासून होणारें सुख अति क्षुद्र व तुच्छ आहे; आणि प्राण्यांचा अनुभवही असाच आहे. असें या श्लोकांत सांगतात. जाग्रतींत विषयसुखप्राप्त्यर्थ प्राणी अनेक प्रयत्न करीत असतो. ह्या विषयांकरितां, विद्वान् अति कष्टकर असें देशपर्यटन करितो; एकाद्या दुष्ट धन्याची सेवा करितो; नीचाकडेही याचना करितो. शूर योद्धा हे विषय भोगावयास सांपडावे ह्मणून समरांगणांत प्राणदेण्यासही तयार होतो; चोर ह्या विषयांस्तव दुसऱ्यांचे गळे कापतो व गारुडी इत्यादि कपटपटु लोक ह्या क्षुद्र, क्षणभंगुर, व अनर्थकर विषयांकरितां लोकांना अनीतीनें, असत्यानें व निर्दय-पणानें फसवितात. सारांश ह्याप्रमाणें बहुतेक सर्व प्राणी विषयांकरितां अश्रान्त श्रमकरून थकले असतां त्यांचीं सर्व इंद्रियें शिथिल (काम करण्यास असमर्थ) होतात; व असें झालें असतां दैवयोगानें व दीर्घ प्रयत्नानें प्राप्त झालेल्या विषयांनाही विसरून (त्यांचा अव्हेर करून) श्र-म परिहारार्थ ते आपल्या हृदयस्थ आत्मरूपांत प्रविष्ट होऊन कांहीं काल निद्रा घेतात. विषयप्राप्ति न झाल्यामुळें होणाऱ्या संतापाची शांति करण्याकरितांही प्राण्याला निद्रेचाच आश्रय करावा लागतो. अर्थात् परिणामीं दुःख देण्याऱ्या इंद्रियजन्य सुखाहून हें अतींद्रिय (इंद्रियांच्या सहायावांचून होणारें) सुख सर्वोत्कृष्ट आहे व या सुखाच्या प्राप्तीकरितां वैषयिकसुखप्राप्तीसारखे दीर्घ प्रयत्नही कराव-यास नकोत; असें प्रत्येक प्राण्याच्या अनुभवानें सिद्ध झालें आहे. सारांश वैषयिक आनंद कष्टसाध्य व कष्टद आहे आणि परमानंद सुखसाध्य व सुखद आहे. तर्‍हां आतां यांतील कोणत्या आनंदाचा अवलंब करावा हें ज्याचें त्यानेंच ठरविणें प्रशस्त होय. ॥ ६७ ॥

**पक्षावभ्यस्य पक्षी जनयति मरुतं तेन यात्युच्चदेशं ।**
**लब्ध्वा वायुं महान्तं श्रममपनयति स्वीयपक्षौ प्रसार्य ॥**
**दुःसंकल्पैर्विकल्पैर्विषयमनुकदर्थीकृतं चित्तमेत-**
**त्खिन्नं विश्रामहेतोः स्वपिति चिरमहो हस्तपादान्प्रसार्य**

टीकाः- अथात्र श्रुत्युक्तं दृष्टान्तमुपन्यस्यन् उक्तार्थमेव दृढीकुर्वन्नाह—पक्षाविति । पक्षी पक्षावभ्यस्य व्यापारयित्वा मरुतं वायुं उत्पादयति तेन वायुना उच्चदेशं याति तदोच्चैस्तरामाकाशदेशे महान्तं वायुं लब्ध्वा पक्षौ प्रसार्य प्राक्तनं श्रममपनयति स्वपिति एवं प्रकृते दुःसंकल्पैस्तद्विपरीतैर्विकल्पैश्च विषयमनुलक्षीकृत्य एतच्चित्तं कदर्थीकृतं ततः खिन्नं सत् हस्तपादान् प्रसार्य विश्रामहेतोश्चिरं स्वपिति अत्र श्रुतिः— "तद्यथास्मिन्नाकाशे श्येनो वा सुपर्णो वा विपरिपत्य श्रान्तः संहत्य पक्षौ संलयायैव ध्रियत एवमेवायं पुरुषः एतस्मा अन्ताय धावति यत्र सुप्तो न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति" ॥१८॥

**अन्वयः**—पक्षी पक्षौ अभ्यस्य मरुतं जनयति तेन उच्चदेशं याति । महान्तं वायुं लब्ध्वा स्वीयपक्षौ प्रसार्य श्रमं अपनयति । दुःसंकल्पैः विकल्पैः ( च ) विषयं अनु कदर्थीकृतं एतत् चित्तं खिन्नं सत् विश्रामहेतोः हस्तपादान् प्रसार्य अहो चिरं स्वपिति ।

**अर्थः**—पक्षी आपले दोन्ही पंख हालवून वायु उत्पन्न करितो; व त्याच्या योगानें ( आकाशांत ) उंच वर जातो. ( तेथें ) मोठ्या वायूपर्यंत पोंचला असतां आपले दोन्ही पंख पसरून ( आपले ) श्रम घालवितो. ( तसेंच ) दुष्ट संकल्प व विकल्प यांच्या योगानें, विषयांना अनुलक्षून, दीन ( रंक ) झालेलें हें चित्त खिन्न होऊन विश्रांतिस्तव हातपाय पसरून पुष्कळ वेळपर्यंत निजतें.

**विवरणः**—'तद्यथास्मिन्नाकाशे'० इत्यादि श्रुतींतील पक्ष्याच्या दृष्टान्तानेंच मागच्या श्लोकांतील अर्थ येथें निश्चित करितात. पक्षी पंख हालवून वारा उत्पन्न करितो व त्याच्या सहायानें आकाशांत उंच उडून जातो. अंतरिक्षांतील महावायूपर्यंत जाऊन पोंचल्यावर तो आपले पंख पसरून त्या महावायूच्या सहायानें तेथें तरंगत राहतो व त्यामुळें पंख हालविण्यापासून झालेल्या त्याच्या श्रमाचा परिहार होतो. त्याचप्रमाणें विषयांना उद्देशून हें चित्त अनेक संकल्प व तद्विपरीत विकल्प करितें; आणि त्यांच्या योगानें परस्वाधीन व दीन झालेलें

हें चित्त अत्यन्त खिन्न होतें व आपले श्रम घालविण्याकरितां हातपाय पसरून स्वस्थ झोंप घेतें. याठिकाणीं चित्त म्हणजे 'पुरुष, प्राणी' असा अर्थ समजावा. त्याप्रमाणें निद्रावस्थेंत सुख भोगीत असलेल्या प्राण्याला जागें केलें असतां तो अत्यंत दुःखी होतो. 'तं नायतं बोधयेदित्याहुः। यास्तव हातपाय पसरून स्वस्थ निद्रित पुरुषाला जागें करूं नये असें सांगतात.' अशी व 'तस्मादुत्स्वपन्तं० म्ह० म्हणून सुरतासक्त झालेल्या इंद्र व इंद्राणीच्या सुखाचा भंग करणें मला उचित नाहीं असा विचार करून निद्रिताला उठवूं नये' अशी श्रुति आहे. व या श्रुतीनें निद्राभंग करणाराला मोठा दोष सांगितला आहे. ॥६८॥

आश्लिष्यात्मानमात्मा न किमपि सहसैवांतरं वेद बाह्यं ।
यद्वत्कामी विदेशात्सदनमुपगतो गाढमाश्लिष्य कान्ताम् ।
यात्यस्तं तत्र लोकव्यवहृतिरखिला पुण्यपापानुबन्धः ।
शोको मोहो भयं वा समविषममिदं न स्मरत्येव किंचित्॥

टीकाः—अथ सुषुप्त्यवस्थामाह-आश्लिष्येति । आत्मा जीवः आत्मानं परमात्मानं सहसा अकस्मात् आश्लिष्य आलिंग्य एकीभूय किमप्यांतरं सूक्ष्मदेहानुभूतं स्वप्नं बाह्यं स्थूलदेहानुभूतं च न वेद न जानाति । सर्ववृत्तीनां लीनत्वात् । अथात्र दृष्टांतमाह—यद्वदिति । यद्वद्विदेशात्परदेशात्स्वकांतासदनं स्वगृहं उपगतः कामी चिरकालं प्रोषितत्वात्कामातुरः कांतां कमनीयां स्त्रियं गाढमत्यौत्कंठ्येन आश्लिष्य आलिंग्य बाह्यमांतरं वा किमपि विषयांतरं न वेद तद्वदित्यर्थः । अत्र श्रुतिः—"तद्वा अस्यैतदाप्तकाममात्मकाममकामं रूपं एवमेवायंपुरुषः प्राज्ञेनात्मनासंपरिष्वक्तोनबाह्यंकिंचनवेदनांतरं । तद्यथाप्रियया स्त्रियासंपरिष्वक्तोनबाह्यंकिंचनवेदनांतरं" ।

अन्वयः—यद्वत् विदेशात् सदनं उपगतः कामी कांतां गाढं आश्लिष्य् किमपि बाह्यं आन्तरं वा न वेद तद्वत् आत्मा आत्मानं सहसा एव आश्लिष्य (न वेद) तत्र अखिला लोकव्यवहृतिः अस्तं याति । (तथा) पुण्यपापानुबन्धः शोकः मोह भयं इदं समविषमं वा किंचित् न स्मरति एव ।

अर्थः—ज्याप्रमाणें परदेशांतून घरीं आलेला विषयी पुरुष स्त्रीला आलिंगून सुख घेतो व त्यापुढें आं(गृहां)तील व बाहेरील दुसरें कांहींएक जाणत नाहीं, त्याचप्रमाणें जीव परमात्म्याला एकाएकीं

आलिंगितो आणि (त्यामुळें) आं(देहां)तील व बाहेरील ज्ञान त्याला होत नाहीं. त्या अवस्थेमध्यें सर्वही लोकव्यवहार नष्ट होतो. (तसेंच) पुण्यपापव्यवहार, शोक, मोह, भय किंवा अन्य (दुसऱ्या) सर्व समविषम भावना यांतील कांहींएक त्याला आठवत नाहीं.

विवरणः—येथें निद्रेची पूर्ण गाढावस्था सांगितली आहे. एकादा कामी पुरुष पुष्कळ दिवसांनी परदेशांतून घरीं परत आला असतां स्त्रीला दृढालिंगन देऊन फार सुखी होतो व त्याला त्या सुखापुढें अंतर्बहिर् कोणत्याच सुखाचें भान रहात नाहीं. तसेंच जीव परमात्म्याशीं निद्रावस्थेंत एकरूप होतो; व त्या सुखापुढें स्वप्नांतील सूक्ष्म किंवा जाग्रतींतील स्थूल सुख त्याला मुळींच भासत नाहीं. कारण सर्व अंतःकरणवृत्तींचा त्या अवस्थेंत लय झालेला असतो. त्यामुळेंच ह्या सर्व लोकव्यवहाराचाही तेथें अस्त होतो. तसेंच पुण्यपापादिसंबंध व शोकादिक यांपैकींही त्याला तेथें कांहीं एक स्मरत नाहीं. 'तद्वा अस्यै तदात्मिका०' इत्यादि श्रुति या श्लोकोक्त प्रतिपादनाला प्रमाण आहे. ॥ ६९ ॥

अल्पानल्पप्रपंचप्रलय उपरतिश्चेंद्रियाणां सुखाप्ति-
र्जीवन्मुक्तौ सुषुप्तौ त्रितयमपि समं किंतु तत्रास्ति भेदः॥
प्राक्संस्कारात्प्रसुप्तः पुनरपि च परावृत्तिमेति प्रबुद्धो
नश्यत्संस्कारजातो न स किल पुनरावर्तते यश्च मुक्तः॥७०॥

टीकाः—इदानीं मुक्तसुषुप्त्योरैकरूप्यसाम्येऽपि वैलक्षण्यं दर्शयति—अल्पान-ल्पेति। जीवन्मुक्तौ सुषुप्तौ च एतत्त्रितयं समं तुल्यं तत्किं तत् अल्पानल्पप्रपंच-प्रलयः सूक्ष्मासूक्ष्मयोः प्रपंचयोः प्रलयः प्रकृतावात्यंतिको लयः तथेंद्रिया-णामुपरतिः परमो विलयः गृहीत एव प्राणो गृहीता वागित्यादि पूर्वमेवोक्तं तथा सुखप्राप्तिः। एवं चेत्तर्हि सुषुप्तिरेव मुक्तिरस्तु नाम कथं पुनर्मुक्तिसाध-नार्थं प्रयास इत्याशंक्याह—किंत्विति। किंतु तत्र सुषुप्तिमुक्त्योर्मध्ये भेदोऽस्ति तमेवाह—सुषुप्तः सुषुप्तिं प्राप्तः पुरुषः प्राक्संस्कारात्पुनरपि परावृत्तिं एति। तथा यश्च प्रबुद्धः प्रबोधं ज्ञानं प्राप्तो निरंतरं मुक्तः सन् नश्यत्संस्कारजातः सन् पुनर्नावर्तते आवृत्तिं न प्राप्नोति। अयमर्थः—यद्यपि सुषुप्तौ सर्वप्रलयो भवति तथापि तस्या दैनंदिनत्वात्प्राकृतिकत्वाच्च प्राक् पूर्वं जाग्रति समुत्पन्नाः संस्कारा बीजरूपेण तिष्ठंति तेनात्मा जीव आविद्यः पुनरावर्तते मुक्तो नु घनेज्ञानयोगा-त्सर्वसंस्कारनाशी भवति तेन न स पुनरावर्तते ॥ ७० ॥

**अन्वयः**—अप्यानल्पप्रपंचप्रलयः इंद्रियाणां उपरतिः सुखाप्तिः च ( इति ) त्रितयं अपि सुषुप्तौ मुक्तौ ( च ) समं किंतु तत्र भेदः अस्ति । प्रसुप्तः प्राक् संस्कारात् पुनः अपि च परावृत्तिं एति । यः च प्रबुद्धः सः मुक्तः सन् नश्यत्संस्कारजालः सन् न किल पुनः आवर्तते ।

**अर्थः**—स्थूलसूक्ष्मप्रपंचाचा लय, इंद्रियांची शांति व सुखप्राप्ति हीं तिन्हीही गाढ निद्रा व मुक्ति या दोन्हीं अवस्थेंत सारखींच आहेत. पण त्यांत भेद आहे. निद्रित पुरुष जाग्रतींतील संकल्पामुळें पुनःही जाग्रतींत परत येतो व जो ( अज्ञान नष्ट झाल्यामुळें ) सावध झालेला असतो तो मुक्त झाल्यामुळें व त्याचे सर्व संस्कार नष्ट झाल्यामुळें पुनः कधींही ( देहाभिमानाकडे ) परत येत नाहीं.

**विवरणः**—आतां मुक्ति व सुषुप्ति या अवस्थांचें लक्षण जरि एक असलें तरि त्यांच्यांत मोठा भेद आहे; असें या श्लोकांत सांगतात. जीवन्मुक्ति व गाढ निद्रा या अवस्थेंत सर्व स्थूलसूक्ष्मप्रपंचाचा लय, इंद्रियशांति व आनंदप्राप्ति हीं सारखींच असतात.—असें जर असेल तर मग मुक्तीकरितां इतके प्रयास करण्याचें काय कारण ?—असा कोणी प्रश्न करतील म्हणून आचार्य सांगतात. पण त्यांत एक मोठा भेद आहे. निद्रित पुरुष ( जीव ) जाग्रतींतील अनेक वासनांमुळें पुनः देहाभिमानावर येतो ( देहाभिमान धरितो ) व पूर्ववत् व्यवहार करूं लागतो; आणि आत्मज्ञानी पुरुष तत्क्षणींच मुक्त होत असल्यामुळें व त्याचे संचितक्रियमाण संस्कार नष्ट होत असल्यामुळें पुनः कधींही देहाभिमान धरीत नाहीं; आणि त्यामुळें त्याला या व्यवहारांतही पडावें लागत नाहीं. सारांश, प्राण्याच्या अनेक संकल्पविकल्पांमुळेंच त्याला पुनः पुनः जाग्रति, स्वप्न, जन्म, मरण इत्यादि अवस्था अनुभवाव्या लागतात. ॥ ७० ॥

आनन्दान्यश्च सर्वाननुभवति नृपः सर्वसंपत्समृद्ध-
स्तस्यानन्दः स एकः स खलु शतगुणः संप्रतिष्ठः पितॄणाम्
आदेवब्रह्मलोकं शतशतगुणितास्ते यदन्तर्गताः स्यु-
र्ब्रह्मानन्दः स एकोस्त्यथ विषयसुखान्यस्य मात्रा भवन्ति॥

टीका:—अथ सकलसुखापेक्षया आत्मसुखस्य निरतिशयत्वं श्रुत्या निरू-पयति—आनंदानिति । यः सर्वसंपत्समृद्धो नृपः सर्वानंदाननुभवति दरिद्राणाम-केकविषयप्राप्तावेक एवानंदो भवति मनागधिकानामानंदद्वयं एवमुत्तरोत्तरं यस्य यावतां विषयाणां प्राप्तिः तावंतस्तस्यानंदा भवंति । एवं सर्वविषयप्राप्ति-र्नृपस्यास्त्यतस्तस्य सर्वानंदभोगः । तथा च सर्वविषयानंदाः यत्र एकीभवन्ति स एको राज्ञ आनंदः स खल्वेतस्मिन्धारणे शतगुणः पितॄणामानंद स एवमुत्तरोत्तरं देवलोकमारभ्य ब्रह्मलोकपर्यंतं शतगुणिता आनंदा भवंति ते सर्वेपि यदंतर्गता अंतर्भूताः स्युः स एको ब्रह्मानंदोऽस्ति । अथास्य ब्रह्मानंदस्य विषयसुखानि पूर्वोक्तानि क्षुद्राः मात्राः अंशा भवंति यथाम्बरोपाधिवशेन पृथक् क्षुद्रत्वेन भासंते तथैव परमानंदोऽपि विषयसुखाकारेणेत्यर्थः । अत्र श्रुतिः "—स यो मनु-ष्याणां राद्धः समृद्धो भवति अन्येषामधिपतिः सर्वैर्मानुष्यकैः कामैः संपन्नतमः मनुष्याणां परमानंदः अथ ये शतं मनुष्याणामानंदाः स एकः पितॄणां जितलोकाना-मानंदः इत्यादि ।" तथा—"अथैष ब्रह्मलोक सम्राडिति हैनमनुशशासैषास्य परमा ग-तिरेषास्य परमो लोकः एषोऽस्य परमानंदः अथैतस्यैवानंदस्यान्यानि भूतानि मात्रा-मुपजीवंतीति" ॥ ७१ ॥

**अन्वयः**—यः सर्वसंपत्समृद्धः नृपः सर्वान् आनंदान् अनुभवति सः तस्य एकः आनंदः । स खलु शतगुणः संप्रतिष्ठः पितॄणां ( एकः । एव ) आब्रह्म-देवलोकं शतशतगुणिताः ते यदन्तर्गताः स्युः सः एकः ब्रह्मानंदः अस्ति । अथ विषयसुखानि अस्य मात्राः भवन्ति ।

**अर्थः**—एकादा सर्व संपत्तीनें समृद्ध असणारा राजा सर्व सुखांचा अनुभव घेतो तो त्याचा एक आनंद होय. तोच शतपट झाला असतां पितरांचा ( एक आनंद होतो. सारांश ) देवलोकापासून ब्रह्मलोकापर्यंत शतपटीनें अधिक अस-णारे हे सर्वही आनंद ज्यांत अंतर्भूत होतात तो एक ब्रह्मानंद होय; आणि हीं सर्व विषयसुखें या ब्रह्मानंदाचेच अंश आहेत.

**विवरणः**—सर्व ऐहिक व पारलौकिक सुखापेक्षां आत्मसुख श्रेष्ठ व अधिक आहे असें येथें (अनुमानादि) तर्कानें दाखवितात. दरिद्री पुरुषांना अन्न, स्त्री, पुत्र यांपैकीं एकाद्याच विषयाची प्राप्ति झाली तरि तेवढाच आनंद होत असतो. हा झाला एक आनंद. मध्यम स्थितींतल्या पुरुषांना त्याहून एकाद्या अधिक विषयाची प्राप्ति झाली कीं, तितक्याच मानानें थोडा अधिक आनंद होतो. हे झाले दोन आनंद. याप्रमाणेंच उत्तरोत्तर जशी जशी अधिक विषयप्राप्ति तसा तसा प्राण्याला अधिकाधिक आनंद होतो. या न्यायानें पाहिलें असतां

निष्कंटक सार्वभौम राज्य, सुंदर स्त्री, संतति, शरीरदृढता इत्यादि सर्व ऐहिक सुखानें संपन्न असलेल्या राजाचा एक मानुष आनंद होतो. त्या आनंदाहून पितरांचा एक आनंद शंभरपटीनें अधिक असतो. देवांचा आनंद त्याहून शतपट असतो. सारांश याप्रमाणें ब्रह्मलोकापर्यंत प्रत्येक लोकांतील आनंद शतपटीनें अधिक असतो. मृत्युलोकापासून ब्रह्मलोकापर्यंतच्या सर्वही आनंदांचा मिळून एक ब्रह्मानंद होतो. म्ह० पूर्वोक्त सर्व वैषयिक सुखें हे या ब्रह्मानंदाचेच क्षुद्र अंश आहेत. अंशांहून अंशी श्रेष्ठ असतो हा न्याय; व हस्तपादादि अवयवांपेक्षां त्यांचा समूह जो देह तो श्रेष्ठ आहे असें लोक मानितात हा व्यवहारिक अनुभव या प्रतिपादनाला प्रमाण आहे. सारांश ब्रह्मानंद सर्वांत श्रेष्ठ आहे ही गोष्ट सिद्ध झाली. जसा एकच आत्मा उपाधींच्या योगानें अनेक असल्यासारखा भासतो, तसाच परमानन्दही विषयसुखांच्या रूपानें क्षुद्रत्वानें प्रत्ययाला येतो. या श्लोकोक्त प्रतिपादनाला "स यो मनुष्याणां राद्ध०" व "अथैष ब्रह्मलोकः सम्राडिति०" इत्यादि श्रुति प्रमाण आहेत. ॥७१॥

यत्रानन्दाश्च मोदाः प्रमद इति मुदश्चासते सर्व एते ।
यत्राप्ताः सर्वकामाः स्युरखिलविरमात्केवलीभाव आस्ते ॥
मां तत्रानंदसांद्रे कृधि चिरममृतं सोम पीयूषपूर्णां ।
धारामिंद्राय देहीत्यपि निगमगिरो भ्रूयुगांतर्गताय ७२

टीकाः—अथास्मिन्नर्थे ऋक्शाखीयां श्रुतिं संवादयन्नाह-यत्रेति । यत्र यस्मिन्परमानंदे सर्वानंदाः मनुष्यानंदास्तथापितॄणामानंदा आजानदेवानां एवमुत्तरोत्तरं सर्वे अपि भासते वर्तंते तथा यत्र यस्मिन्परमानंदे सर्वे कामाः सत्यलोकादिप्राप्तिरूपाः आप्ताः प्राप्ताः स्युः तथा यत्र अखिलविरमात्स्थूल-सूक्ष्मप्रपंचविलयात्केवलीभाव आस्ते भो सोम षोडशकलारूप हिरण्मयरूप मां जीवदशापन्नं तत्र सांद्रानंदे चिरं अमृतं कृधि कुरुष्व तथा इन्द्राय जीवात्मने पूर्णां पीयूषधारां देहि । मुक्तानां सोमपानादमृतप्राप्तिर्भवतीति योगशास्त्रे प्रसिद्धम् । किंभूताय इंद्राय भ्रूयुगांतर्गतायेति । एवमुक्तप्रमेयं निगमगिरः प्राहुः । अत्र श्रुतिः सप्तमाष्टके—"यत्रानंदाश्चमोदाश्चमुदःप्रमुद आसते । कामस्य यत्राप्ताः कामास्तत्र माममृतं कृधीन्द्रायेन्दो परिस्रव ॥ ७२ ॥

**अन्वयः**—मोदाः च प्रमदः च मुदः इति एते सर्वे आनंदाः यत्र आसते यत्र सर्वकामाः आप्ताः स्युः (यत्र) अखिलविरमात् केवलीभावः आस्ते। तत्र आनंदसान्द्रे हे सोम मां चिरं अमृतं कृधि। भ्रूयुगांतर्गताय इंद्राय पीयूषपूर्णां धारां देहि इति अपि नियम गिरः (प्राहुः)।

**अर्थः**—(मनुष्य, पितर व देव यांचे) मोद, प्रमद व मुद या नांवांचे सर्व आनंद जेथें आहेत; जेथें सर्वही तृष्णा पूर्ण होतात; सर्व कार्यांचा लय होत असल्यामुळें जेथें कैवल्य असतें त्या आनंदपूर्ण पदीं, हे सोम, मला चिरकाल मरणधर्मरहित कर; आणि भृगुगुलाच्या मध्यें असणाऱ्या जीवात्म्याला पूर्ण अमृतधार दे. असेंच श्रुतीही सांगतात.

**विवरण:**—पूर्वनिर्दिष्ट अर्थाचेंच प्रतिपादन करणाऱ्या ऋग्वेदाच्या सातव्या अष्टकांतील "यत्रानंदाश्चमोदाः०" इत्यादि श्रुतीचें तात्पर्य या श्लोकांत सांगतात. ज्या परमानंदामध्यें सर्वही उत्तरोत्तर अधिक असणारे मनुष्यादिकांचे आनंद रहातात; ज्या परमानंदामध्यें सत्यलोकप्राप्त्यादि सर्व कामना पूर्ण होतात; व ज्या ठिकाणीं सर्व स्थूलसूक्ष्म प्रपंचाचा लय होत असल्यामुळें कैवल्य (केवलभाव) राहतें; त्या परमानंदपूर्ण स्थळीं, हे षोडशकलारूप सोम, (चंद्ररूप परमात्म्या) जीवदशेला प्राप्त झालेल्या मला घेऊन जा; व तेथें नेऊन मला अमर कर. तसेंच ह्या जीवात्म्याला अमृताची पूर्ण धार दे. तो जीवात्मा दोन्ही भुवयांच्या मध्यभागीं राहतो. अनेक श्रुतींनीं असेंच वर्णन केलें आहे. शिवाय मुक्त (समाधिस्थ) साधकांच्या टाळूंतील सोमनांवाच्या चक्रापासून अमृतस्राव होत असतो असें योगशास्त्रांतही प्रसिद्ध आहे. ॥ ७२ ॥

आत्मार्कपः सुखात्मा स्फुरति तदपरा त्वन्यथैव स्फुरंती।
स्थैर्यं वा चंचलत्वं मनसि परिणतिं याति तत्रत्यमस्मिन्
चांचल्यं दुःखहेतुर्मनस इदमहो यावदिष्टार्थलब्धि-
स्तस्यां यावत्स्थिरत्वं मनसि विषयजं स्यात्सुखं तावदेव

टीकाः—सम्वर्तीन्द्रियं सुखं हि परमानंदः तथा विषयसुखं इंद्रियजन्यं एवमुभयोर्मध्ये वैषम्यं अनुभवसिद्धं सति कथमुक्तं एतस्यैवानंदस्यान्यानि

भूतानि मात्रामुपजीवन्तीत्याशंक्य श्लोकद्वयेनोत्तरयति—आत्मेति । आत्मा तावदकंपः कंपरहितः तथा सुखात्मा सुखरूपोऽपि 'विज्ञानमानंदं ब्रह्मेति' आत्मन आनंदरूपत्वं श्रुतिसिद्धं सुषुप्त्यवस्थायामनुभवसिद्धं चातः स्फुरती-त्युक्तं तथा तदपरा तद्विलक्षणा माया अन्यथा उक्ता तद्विपरीतस्वभावा सकंपा दुःखरूपा चात्मसहचारित्वेन स्फुरन्ती पूर्ववदनुभवसिद्धास्ति । एवं तयोरात्ममाययोरनुगतं स्थैर्यं चंचलत्वं वा अस्मिन्मनसि परिणतिं परि-णामं याति तच्च विषयानंदाधिरूपत्वम् । अहो इति संबुद्धौ यावदिष्टार्थलब्धिः अभीष्टविषयप्राप्तिस्तावत्प्रयत्नशताकुलस्य मनसश्चांचल्यमिदं दुःखहेतुर्भवति । अथ तस्यां विषयप्राप्तौ सत्यां कृतकृत्यत्वेन मनसि यावत्स्थिरत्वं तावदेव विषयजं सुखं स्यात् ॥ ७३ ॥

**अन्वयः**--आत्मा अकंपः सुखात्मा स्फुरति । तदपरा तु अन्यथा एव । स्फुरन्ती । तत्रत्यं स्थैर्यं चचलत्वं वा अस्मिन् मनसि परिणतिं याति । अहो यावत् इष्टार्थलब्धिः ( तावत् प्रयत्नशताकुलस्य ) मनसः इदं चांचल्यं दुःखहेतुः ( भवति । ) तस्यां सत्यां मनसि यावत् स्थिरत्वं तावदेव विषयजं सुखं स्यात्।

**अर्थः**--आत्मा निष्कंप ( चलनरहित ) व आनंदरूप आहे असा प्रत्यय येतो. ( परंतु ) त्याच्याहून निराळी जी प्रकृति ती तर त्याच्याहून विपरीतच आहे व त्याच्यामुळेंच ती अ-नुभवाला येणारी आहे. त्यांच्या ( आत्म्याच्या व प्रकृतीच्या ) ठिकाणचें स्थैर्य व चंचलता हीं ह्या मनामध्यें परिणत ( व्यक्त ) होतात. अहो इष्ट विषयाची प्राप्ति होईपर्यंत तदर्थ अनंत प्र-यास करून थकलेल्या मनाचें हें चांचल्य दुःखाला कारण होतें. व तो इष्टप्राप्ति झाली असतां जेवढा वेळ मनाची स्थिरता अ-सते तेवढा वेळच विषयजन्य सुख होतें.

**विवरणः**—आतां याविषयीं कोणी—परमानन्द, हें अतींद्रिय सुख व विषयानन्द हें इंद्रियजन्य सुख असा ह्या दोन सुखांत विलक्षण भेद अनुभवसिद्ध असतांना ह्याच परमानंदाच्या अंशाचा आश्रय करून अन्य प्राणी सुख भोगितात असें कसें म्हणतां येईल ?—अशी शंका घेईल ह्मणून आचार्य ह्या व पुढच्या श्लोकांत त्याचें समाधान करितात. आत्मा कंपरहित व सुखरूप आहे. ह्याला 'विज्ञानमानन्द०' ही श्रुति व सुषुप्तींतील प्रत्येकाचा अनुभव हींच दोन उत्तम प्रमाणें आहेत; आणि असा त्याचा प्रत्यय येतो ह्मणूनच 'स्फुरति' ( स्फुरण पवतो, अनुभवाला येतो ) असें श्लोकांत म्हटलें आहे. तसेंच

त्याच्यापेक्षां विलक्षण जी माया ती त्याच्या विरुद्ध (उ० चांचल्य, दुःख इत्यादि ) धर्मांनीं युक्त आहे असें सांगितलें आहे;व आत्म्याच्या आश्रयानेंच तिचा अनुभव येतो. तात्पर्य त्या आत्म्यामध्यें व मायेमध्यें असणारे ( स्थिरता व चंचलता हे ) गुण मनामध्यें स्पष्टपणें प्रतीत होतात. कारण चैतन्य व जडवर्ग या दोघांची ग्रंथि ( संधि ) ह्मणजेच मन होय. सारांश, इष्ट विषयाची प्राप्ति होईपर्यंत अश्रांत श्रम करणाऱ्या मनाचें चांचल्य प्राण्याला दुःख देतें; व एकदां विषयप्राप्ति झाली कीं, मी कृतकृत्य झालों असें जीवाला वाटल्यामुळें जोंपर्यंत त्याचें मन स्थिर असतें तोंपर्यंतच विषयांपासून त्याला सुख होतें. तात्पर्य मनांतील स्थैर्य हा आत्म्याचा गुण असून त्यापासून आनंद व चांचल्य हा प्रकृतीचा गुण असून त्यापासून दुःख प्राप्त होतें. ॥७३॥

यद्वत्सौख्यं रतान्ते निमिषमिह मनस्येकताने रसे स्या-
त्स्थैर्यं यावत्सुषुप्तौ सुखमनतिशयं तावदेवाथ मुक्तौ ॥
नित्यानंदः प्रशांते हृदि तदिह सुखस्थैर्ययोः साहचर्यं ।
नित्यानंदस्य मात्रा विषयसुखमिदं युज्यते तेन वक्तुम् ७४

टीकाः—अथात्र विनीयभक्तेन दृष्टांतद्वयमाह—यद्वदिति । यथा इहास्मदनुभवसिद्धे रतान्ते शृंगाररसेन मनस्येकताने एकाग्रे सति निमिषं निमिषमात्रं सौख्यं भवति तथा सुषुप्तौ मनसि यावत्स्थैर्यं तावदेवानतिशयसुखं अथ मुक्तावपि हृदि प्रशान्ते सति नित्यानंदो भवति । तत्तस्मात्कारणादिह सुखस्थैर्ययोः साहचर्यं सहचारित्वमनुभवसिद्धं तेन कारणेन इदं विषयसुखं नित्यानंदस्य मात्रेति वक्तुं युज्यते । इत्यानंदकाष्ठप्रकरणम् ॥ ७४ ॥

अन्वयः--इह रतान्ते मनसि एकताने रसे सति यद्वत् निमिषं सौख्यं स्यात् तथा सुषुप्तौ मनसि यावत् स्थैर्यं तावदेव अनतिशयं सुखं भवति । अथ मुक्तौ हृदि प्रशांते [ सति ] नित्यानंदः [ भवति ] तत् सुखस्थैर्ययोः इह साहचर्यं [ अनुभवसिद्धं ] तेन इदं विषयसुखं नित्यानंदस्य मात्रा इति वक्तुं युज्यते ।

अर्थः—सर्वानुभवसिद्ध संभोगाच्या अंतीं मन शृंगार रसाशीं एकरूप (शृंगाररसमय) झालें असतां जसें क्षणभर सुख होतें; तसेंच निद्रावस्थेंत मनामध्यें जेवढी स्थिरता तेवढेंच निरति-

ज्ञाय सुख असें होतें. त्याचप्रमाणें मोक्षावस्थेमध्यें अंतःकरण शांत झालें असतां नित्यानंद होतो. त्याअर्थी सुख व चित्तस्थैर्य यांचें एकांत साहचर्य आहे ( हें अनुभवसिद्ध झालें. सारांश ) ह्याव-रून हें विषयजन्य सुख हा नित्यानंदाचा एक अंश ( कला ) असें म्हणणें युक्त आहे.

विवरण:—आतां ह्या श्लोकांत विषयसुखें नित्यानंदाच्या कला आहेत; हें दाखविण्याकरितांच अणखीं दोन दृष्टान्त देतात. स्त्रीसंभो-गाचे अंतीं मन विषयरसांत तल्लीन ( एकाग्र ) होऊन गेलें असतां एक क्षणभर सुख होतें. गाढ निद्रा लागली असतांही मन स्थिर होतें. व तें स्थिर असेपर्यंत जीवाला अत्यंत आनंद होतो. मुक्ती-मध्येंही अंतःकरण अत्यन्त शांत झाल्यामुळें नित्यानंदाचा अनुभव येतो. त्याअर्थीं चित्तस्थैर्य असेल तर आनंद व तें नसेल तर आनंदाचा अभाव असें अन्वयव्यतिरेकानें यांचें साहचर्य ( व्याप्ति ) सिद्ध झालें; आणि याच कारणास्तव विषयसुख ही नित्यानंदाची एक कला आहे असें म्हणणें सयुक्तिक होय. येथें आनंदकोश प्रकरण समाप्त झालें ॥७४॥

श्रांतं स्वांतं सबाह्यव्यवहृतिभिरिदं ताः समाकृष्य सर्वा-
स्तत्संस्कारयुक्तं ह्युपरमति परावृत्तमिच्छन्निदानम् ॥
स्वाप्नान्संस्कारजातप्रजनितविषयान् स्वाप्नदेहेनुभूतान् ।
प्रोत्स्यांतःप्रत्यगात्मप्रवणमिदमगाद्भूरिविश्राममस्मिन्॥७५

टीका:—अथ जगन्मिथ्यात्वप्रकरणमुच्यते। तत्र प्रपंचमिथ्यात्वे प्रथमतः स्वप्नदशानिदर्शनेन दर्शयन् स्वप्नरूपं निरूपयति—श्रांतमिति। इदं स्वांतं मनः बाह्यव्यवहृतिभिः स्त्रीपुत्रादिपोषणप्रभृतिभिः श्रांतं सत् उपरमति विरमति विरतव्यापारं भवति किं कृत्वा ताः सर्वा बाह्येंद्रियार्थरूपा व्यवहृतीः समा-कृष्य यद्वा इदंताः इंद्रियैः कृत्वा इदंताकारेण भासमानाः विषयास्तान् अंतः समाकृष्य एवं यद्यपि बाह्यव्यवहारस्तथापि पूर्वानुसंधानो-त्पन्नतत्तत्संस्कारयुक्तं सत्परावृत्तं अथ किमुद्दिश्य परावृत्तमित्याशंक्याह निदानं इच्छन् निदानं स्त्रीयमादिकारणं आत्मरूपं इच्छन् यथा बहुदेशाटनैः खिन्नः पांथो विश्रांत्यै स्वगेहागमनमभिच्छति तद्वदित्यर्थः। अत्र श्रुतिः— "अथैतत्पुरुषःस्वपितिनामसता सोम्य तदा संपन्नो भवति स्वमपीतो भवति तस्मादेनं स्वपितीत्याचक्षते स्वं ह्यपी-तो भवतीति"। ततः स्वप्नाभिरूढसंस्कारजातेन प्रजनितविषया-

स्वाप्नान्सूक्ष्मभेदानुभूतानपोह्य त्यक्त्वा प्रत्यगात्मप्रवणं परमात्मसंयोगोन्मुखं सदस्मिन्नात्मनि विश्रामं विश्रांतिमगादगच्छत् । यथा महद्भूपदर्शनाय कश्चिदग्रगः सामंतो बहिर्द्वारि सेनासमाजं त्यक्त्वा कतिपयैः पार्षदैः सह प्रविशति रूपांतर्द्वारि तानपि त्यक्त्वा केवलरूपेणैव समक्षं गच्छति तद्वदित्यर्थः । अनेन मनसः प्रथमतः सुषुप्तिरेवोदिता स्वप्नावस्था तु विविधव्यापारांतरालिकैषो-त्पन्नेत्युक्तम् ॥ ७९ ॥

**अन्वयः**—सबाह्यान्यव्याप्तिभिः श्रान्तं निदानं इच्छत् ( च ) परावृत्तं इदं स्वान्तं ताः सर्वाः समाकृष्य तत्तत्संस्कारयुक्तं हि उपरमति । स्वाप्नदेहे अनुभूतान् स्वाप्नान् संस्कारजातप्रजनितविषयान् प्रोत्स्य इदं अन्तः प्रत्यगात्मप्रवणं अस्मिन् भूरि विश्रामं अगात् ।

**अर्थः—सर्व स्थूलसूक्ष्म व्यवहार करून थकलेलें (व त्यामुळें) स्वतःच्या कारणा( मध्यें लीन होण्या )ची इच्छा करून परत-लेलें हें मन ते सर्व व्यवहार बंद करून त्यांच्या त्यांच्या संस्कारांसह शांत होतें. ( नंतर ) स्वप्नदेहामध्यें अनुभविलेले, बीज-भूत संस्कारापासून उत्पन्न झालेले स्वाप्निक ( खोटे ) विषय टाकून हें प्रत्यगात्म्याकडे अंतर्मुख झालेलें ( वळलेलें ) मन परमात्म्यामध्यें अत्यंत विश्रान्ति घेतें.**

**विवरणः**—आतां येथून पुढें जगन्मिथ्यात्वप्रकरण सुरू झालें. प्रपंच मिथ्या आहे असें प्रतिपादन करीत असतां स्वप्नांतील प्रपंचासारखाच तो आहे हें दाखविण्याकरितां प्रथमतः स्वप्नाच्या स्वरूपानें वर्णन करितात. स्त्री, पुत्र, सेवक इत्यादिकांच्या पोषणाकरितां अनेक स्थूल व्यवहार करून थकलेलें व अत्यन्त आनंदस्वरूप अशा आपल्या कारणामध्यें जाऊन विश्रांति घेण्याची इच्छा करून अन्तर्मुख झालेलें मन सर्व व्यापार बंद करून शांत होतें. ह्या अवस्थेलाच सुषुप्ति असें ह्मणतात. श्लोकांत 'इदंताः' असें पद आहे त्याचा 'इदं' व 'ताः' ( व्यवहृतीः ) असा पदच्छेद करावा किंवा 'इदंताः' ( म्ह० 'हे' असे प्रत्यक्षत्वानें भासणारे विषय ) असें एकच पद घ्यावें. ह्याप्रमाणें बाह्य व्यवहार जरी मनानें टाकिले तरी त्यांच्या दृढ चिंतनानें झालेले संस्कार त्याच्या बरोबरच असतात. त्यामुळें शरीर निश्चेष्ट असतांनाच त्या विषयांचें स्मरण होतें. या स्मरणरूप अवस्थेलाच स्वप्नावस्था असें ह्मणतात. त्या स्मरणारूढ झालेल्या संस्कारांपासून उत्पन्न होणाऱ्या स्वप्नांतील सूक्ष्म विषयांनाही टाकून परमात्म्याशीं संयुक्त होण्याच्या इच्छेनें परतलेलें मन ह्या हृदयस्थ साक्षीमध्यें विश्रान्ति

घेतें. जसा कोणी राजा एकाद्या मोठ्या पुरुषाचें दर्शन घेण्याकरितां गेला असतां सैन्यादि इतर सर्व अनुयायांना द्वाराबाहेर ठेऊन प्रधानादि दोघां तिघांसह आंत जातो; व पुढें गेल्यावर त्यांनाही शेवटच्या द्वारापाशीं सोडून स्वतः एकटाच दर्शनाकरितां आंत शिरतो; त्याप्रमाणेंच हें मन आत्मदर्शनाला निघालें असतां करितें. या श्लोकांत मनाला प्रथमतः निद्रावस्थाच प्राप्त होते व स्वप्नावस्था ही मध्येंच केव्हां तरी कर्मयोगानें प्राप्त होणारी आहे असें सुचविलें आहे.७५

**स्वप्ने भोगः सुखादेर्भवति ननु कुतः साधने मूर्छमाने।**
**स्वाप्नं देहांतरं तद्व्यवहृतिकुशलं नव्यमुत्पद्यते चेत् ॥**
**तत्सामग्र्या अभावात्कुत इदमुदितं तद्धि सांकल्पितं चे-**
**त्तत्किं स्वाप्ने रतांते वपुषि निपतिते दृश्यते शुक्रमोक्षः ७६**

टीका:—अथ पूर्वपक्षमुद्भाव्य दृढीकुर्वन् श्लोकमाह—स्वप्न इति । नन्वित्याक्षेपे साधने भोगसाधने स्थूलशरीरे ज्ञानकर्मेंद्रियैः संमूर्छमाने निश्चेष्टतया पतिते सति स्वप्ने स्वप्नावस्थायां सुखादेः सुखदुःखसाधकविषयभोगः कुतः कस्माद्भवतीति । अथ चेदेवं ब्रूषे स्वाप्नं स्वप्नसंबंधि देहांतरं तद्व्यवहृतिकुशलं स्वाप्नविषयभोगकुशलं नव्यं नवीनं उत्पद्यते तेन स्वाप्नव्यवहारोऽस्तु किं प्राक्तनेन शरीरेणेति । तत्रापि दूषयति—तदिति तत्सामग्र्याः तस्य स्वाप्नदेहस्य या सामग्री पित्रोः शुक्रशोणितरूपा तस्याः अभावात् कुतःकस्मात् स्वाप्नदेहोत्पत्तिः।इदमुदितं उत्पन्नं असद्रूपं भूतावेशन्यायेनो-त्पन्नमिति चेत् स्वाप्ने रतांते स्वाप्नस्त्रीभोगांते शुक्रस्रावः स्वाप्नशरीर एवास्तु स निपतिते वपुषि निश्चेष्टे स्थूलशरीरे किमिति दृश्यते । मृषारूपस्य देहस्य सुरतान्तेऽपि मृषैवास्तु सुरतानामभिव्यञ्जकः शुक्रस्राव: प्रातः सत्यत्वेन कथमुपलभ्यते इत्यर्थः ॥ ७६ ॥

**अन्वयः**--ननु साधने मूर्च्छमाने सति स्वप्ने सुखादेः भोगः कुतः भवति तद्व्यवहृतिकुशलं नव्यं स्वाप्नं देहान्तरं उत्पद्यते चेत् तत्सामग्र्याः अभावात् इदं कुतः उदितं। तत् हि सांकल्पितं चेत् तत् स्वाप्ने रतान्ते शुक्रमोक्षः निपतिते वपुषि किं दृश्यते ।

**अर्थ:—अहो देहादि भोगसाधनें निश्चेष्ट पडलीं असतां स्वप्नांत सुखादिकांचा उपभोग ( प्राण्याला ) कसा होतो? स्वप्नांतील व्यवहाराला योग्य असें नवीन दुसरें स्वाप्न शरीर उत्पन्न होतें असें जर म्हणशील तर देहोत्पत्तीची सामग्री नसतांना तें कसें उत्पन्न होतें? तें शरीर केवळ संकल्पमय आहे असें म्हणावें तर स्वप्नांतील स्त्रीसंभोगानंतर निश्चेष्ट पडलेल्या शरीरांत शुक्रस्राव झाल्याचें कां दिसतें?**

**विवरणः**—आतां पूर्वपक्ष उघड करून आचार्य येथें स्वमत दृढ करितात. स्थूल देह सुखदुःखादि भोगांचें साधन आहे. तें साधन-भूत देह ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यांसह निश्चेष्ट होऊन पडला असतां स्वप्नावस्थेमध्यें सुखदुःख देणाऱ्या विषयांचा भोग कोणत्या साध-नानें ( देहानें ) होतो ? स्वप्नांतील विषयांचा उपभोग घेण्यास योग्य असा नवीनच दुसरा देह तेथें उत्पन्न होतो व त्याच्या द्वारा स्वाप्निक भोग होतात असें जर म्हणशील तर त्या देहाच्या उत्पत्तीला लागणारी शुक्रशोणितादि सामग्री नसतांना तो कसा उत्पन्न होतो ? पिशा-च्यसंचारप्रमाणें तो केवळ कल्पनेनें खोटाच उत्पन्न होतो असें म्हणशील तर स्वप्नावस्थेंतील स्त्रीसंभोगाच्या अंतीं ह्या निश्चेष्ट पडलेल्या देहांत रेतस्खलन कां होतें. त्या स्वाप्निक खोट्या देहांतच तें कां होत नाहीं. कारण खोट्या देहाचा भोगही खोटाच असणें युक्त आहे. मग स्त्रीसंभोगाचें द्योतक जें रेतस्खलन तें जागृत झाल्यावर या निश्चेष्ट देहांत प्रत्यक्ष कां दिसतें ? ॥ ७६ ॥

भीत्या रोदित्यनेन प्रवदति हसति श्लाघते नूनमस्मा-
त्स्वप्नेऽप्यंगानुबंधं त्यजति न सहसा मूर्छितेऽप्यंतरात्मा ॥
पूर्वं येऽनुभूतास्तनुयुवतिहयव्याघ्रदंशादयोऽर्था-
स्तत्संस्कारस्वरूपान्सृजति पुनरमून् श्रित्य संस्कारदेहम्

टीका— दूषणांतरमाह भीत्येति । स्वाप्निकस्त्रिया व्याघ्रादिभीत्या अनेन स्थूलदेहेन कृत्वैव रोदिति गद्गदानि रोदनं करोति न स्वाप्नशरीरेणे-त्यर्थः । न केवलं रोदिति अनेनैव प्रवदति यत्किंचिज्जल्पति तथा हसति श्लाघते अहंकृतार्थ इति । एवं पूर्वपक्षमनूद्य प्रागुक्तं पर्यवसितमर्थमाह—नूनमिति । नूनं निश्चयेन अस्माद्देहात् अंतरात्मा स्वप्नेऽपि अंगं स्थूलदेहं मूर्छितेऽपि सहसा अनुबंधं संबंधं न त्यजति । अथ योऽनुबंधः पूर्वं स एव निराकृतः कथमिदानीमनुबंधः प्रोच्यते इत्याशंक्याह—पूर्व-मिति पूर्वं जाग्रदवस्थायां ये ये अर्थाः अनुभूताः ते के तनुयुव-तिहयव्याघ्रदंशादयः तनुः शरीरं युवतिः स्त्री स्वकीया परकीया वा हयाश्च प्रयाणनिमित्तं व्याघ्रो भयनिमित्तं दंशाः कादयादिप्रदेशः आदि-शब्दादन्येऽपि विषयास्तेषां पूर्वमनुभूतानां यः संस्कारः स एव रूपं स्वरूपं

एषां स तथाविधास्तानमून् तदनुरूपानेव पुनः सृजति त एव विषयाः संस्काररूपत्वेन आभासंत इत्यर्थः । अथांतरात्मा किं सृजतीत्याह—संस्कारदेहं लिंगदेहं श्रित्य अधिष्ठाय तस्मिन् देहे सर्वे संस्काराः उद्बुद्धाः संतः तत्तद्विषयाकारेण परिणमंतीत्यर्थः ॥ ७७ ॥

**अन्वयः**--भीत्या अनेन रोदिति (तथा अनेन) प्रवदति हसति श्लाघते। नूनं अस्मात् अंतरात्मा स्वप्ने अपि अंगे मूर्च्छिते अपि सहसा अनुबंधं न त्यजति पूर्वं तनुयुवतिहयव्याघ्रदेशादयः ये ये अर्थाः अनुभूतः तत्संस्कारस्वरूपान् अमून् पुनः संस्कारदेहं श्रित्य सृजति।

**अर्थः** स्वप्नांत भीति वाटल्यानें या देहानें रडतो. ह्यानेंच बडबडतो, ह्यानेंच हंसतो व ह्यानेंच स्वतःची स्तुति करितो. तेव्हां यावरून खरोखर अंतरात्मा स्वप्नांत सुद्धां देह निश्चेष्ट पडला असला तरीही त्याचा संबंध एकाएकीं सोडित नाहीं असें झालें. पूर्वी अनादि जाग्रतींत देह, स्त्री, अश्व, व्याघ्र, प्रदेश इत्यादि जे जे विषय अनुभविले होते त्यांच्या संस्काररूप असे हे सर्व विषय तो पुनः लिंगदेहाचा आश्रय करून उत्पन्न करितो.

**विवरणः**--स्वप्नांत अन्य देह उत्पन्न होतो असें मानल्यास आणखी कोणता दोष येतो तें सांगून पुनः स्वमत स्पष्ट करितात. स्वप्नांत चोराची किंवा व्याघ्राची भीति वाटून प्राणी स्थूलदेहानेंच मोठमोठ्यानें आक्रोश करितो. यानेंच कांहींतरी बडबडतो, हंसतो व मी कृतकृत्य झालों अशी स्वतःचीच वाहवा करितो; हें सर्वप्रसिद्ध आहे. ह्याप्रमाणें पूर्वपक्षाचा अनुवाद करून आतां पूर्वी सांगितलेलीच गोष्ट सिद्ध झाली असें सांगतात. ह्यावरून स्वप्नांत स्थूल देह निश्चेष्ट असला तरी अंतरात्मा त्याचा संबंध सहसा टाकीत नाहीं असेंच निश्चित झालें. अहो पूर्वी त्यांचा कांहीं संबंध नाहीं असें सांगून आतां येथें त्याच्या विरुद्ध कसें सांगतां असा प्रश्न कोणी विचारितील म्हणून सांगतात. अनादिकालापासून प्रवृत्त झालेल्या ह्या जन्ममरणरूप संसारांत हा प्राणी अनेक देहांनीं अनेक जाग्रतींत असंख्य भोग भोगतो. ते जे पूर्वभुक्त उच्चनीच देह, स्वकीय किंवा परकीय स्त्री, गमनसाधन अश्व, भयकारण व्याघ्र, काशी इत्यादि प्रदेश इत्यादि विषय त्यांचा मनाला संस्कार झालेला असतो. संस्कार (स्मृतीचें

कारण, बीज ) हेंच रूप आहे ज्यांचें असे ते शरीरादि विषय पूर्वी- प्रमाणें जसेच्या तसे भासतात. सारांश अंतरात्मा सूक्ष्म शरीराचा आश्रय करितो व त्यामध्यें सर्व संस्कार जागृत होऊन त्या त्या विषयरूपानें व्यक्त होतात. ॥ ७७ ॥

सन्धौ जाग्रत्सुषुप्त्योरनुभवविदिता स्वाप्न्यवस्था द्वितीया
तत्रात्मज्योतिरास्ते पुरुष इह समाकृष्य सर्वेंद्रियाणि ॥
संवेश्य स्थूलदेहं समुचितशयने स्वीयभासांतरात्मा ।
पश्यन्संस्काररूपानभिमतविषयान्याति कुत्रापि तद्वत्

टीका:—अथ श्रुत्यर्थानुरूपामुक्तार्थप्रक्रियां निरूपयति—संधाविति । जाग्रत्सुषुप्त्यारवस्थयोः संधौ अनुभवसिद्धा स्वाप्नी द्वितीयावस्था । तत्र तस्यां अवस्थायां इह स्वरूपे सर्वेंद्रियाणि समाकृष्य पुरुषोंतरात्मा आत्मज्योति- रास्ते । इंद्रियाभावात् तस्यां अवस्थायां विषयप्रकाशनं तदात्मज्योतिषैव संपद्यतीत्यर्थः । ननु तदा स्थूलदेहस्य का गतिरित्यत आह—स्थूलदेहं समुचितशयने यथाप्राप्तनिद्रास्थले निवेश्य प्रसारितहस्तपादं संवेश्य तथा स्वीयभासा स्वसामर्थ्येन स्वमंतःसंस्काररूपसमुच्चितेंद्रियगणाभिमतान् यत्र कु- त्राप्यभीष्टस्थाने तद्वत्संस्काररूपेणैव याति विचरति ॥ ७८ ॥

**अन्वयः**—जाग्रत्सुषुप्त्योः संधौ ( या ) अनुभवविदिता स्वाप्नी अवस्था ( सा ) द्वितीया । तत्र इह सर्वेंद्रियाणि समाकृष्य पुरुषः आत्मज्योतिः आस्ते । स्थूलदेहं समुचितशयने संवेश्य संस्काररूपान् अभिमतविषयान् स्वीयभासा पश्यन् अन्तरात्मा कुत्र अपि तद्वत् याति ।

**अर्थः**—जाग्रदवस्था व सुषुप्त्यवस्था यांच्या संधींत ( मध्यें ) जी सर्वांच्या अनुभवाला येणारी स्वप्नावस्था ती दुसरी होय. त्या अवस्थेमध्यें स्वस्वरूपांत सर्वही इंद्रियें ओढून घेऊन आत्मा स्वप्रकाशानें युक्त होऊन रहातो. ज्या शयनावर तो निजलेला असतो तेथेंच स्थूल देह ठेऊन संस्काररूप इष्ट विषयांना स्वप्र- काशानें पाहणारा अंतरात्मा पाहिजे तेथें संस्काररूपानेंच जातो.

· **विवरणः**—मागील श्लोकांत सांगितलेला सिद्धान्त श्रुतिसंमत आहे असें आतां येथें सांगतात. जाग्रदवस्थेचा अंत व निद्रावस्थेचा आरंभ यांच्या मध्यें असणारी व सर्वही प्राण्यांच्या अनुभवाची

अशी ही स्वप्नावस्था दुसरी होय. जाग्रत् पाहिली, स्वप्न दुसरी व सुषुप्ति तिसरी असा ह्या अवस्थांचा क्रम शास्त्रांत सांगितला आहे. त्या अवस्थेमध्यें स्वतःच्या स्वरूपांत सर्वही सूक्ष्म इंद्रियांना लीन करून आत्मा आपल्या साक्षिरूपानें रहातो. विषयांचा भोग होण्याला इंद्रियांची अवश्यकता असते; पण या द्वितीय अवस्थेमध्यें सर्व इंद्रियें लीन होत असल्यामुळें हा अंतरात्मा स्वतःच्या ज्ञानरूपानेंच तेथें स्वाप्निक विषयांचा भोग घेतो. तर मग त्यावेळीं स्थूल देहाची काय वाट होते? असें कोणी विचारतील म्हणून सांगतात; जाग्रत् कालीं ज्या तल्पावर ( अंथरुणावर ) तो निद्रा घेण्याकरितां हातपाय पसरून पडतो तेथेंच त्या स्थूल देहाला तसाच टाकून स्वतःच्या ज्ञानसामर्थ्यानें संस्कारानुरूप स्वप्नदेह व इंद्रियसमूह उत्पन्न करून वाटेल त्या स्थळीं त्या संस्काररूपानेंच जाऊन व्यवहार करितो. सारांश त्या अवस्थेंत देह वस्तुतः उत्पन्न होत नाहीं, किंवा तो संकल्पात्मकही नाहीं; तर संस्कारद्वारा व आत्म्याच्या ज्ञानमाहात्म्यानेंच त्या अवस्थेचा प्राण्याला अनुभव येतो. ॥ ७८ ॥

रक्षन् प्राणैः कुलायं निजशयनगतं श्वासमात्रावशेषै-
र्माभूत्प्रेतकल्पाकृतकमिति पुनः सारमेयादिभक्ष्यम् ॥
स्वप्ने स्वीयप्रभावात्सृजति हयरथान्निम्नगाः पल्वलानि
क्रीडास्थानान्यनेकान्यपि सुहृदबलापुत्रमित्रानुकारान् ॥

टीका—पूर्वोक्त देहं विसृज्य याति इत्युक्तं तत्र जीवन् अजीवन्वा विसृजति जीवंश्चेत्तर्हि कथमव्यापारं अजीवंश्चेत्तर्हि कथं श्वासाद्युपेतमित्याशंक्य श्लोकद्वयेनोत्तरमाह—रक्षन्निति । निजशयनगतं कुलायं शरीरं प्राणैः कृत्वा रक्षन् एव कुत्रापि यातीति पूर्वेणान्वयः । नहि तत्र क्षुत्पिपासादिप्राणकृत्यं कथं न दृश्यते इत्याशंक्याह किंभूतैः प्राणैः श्वासमात्रावशेषैः श्वासमात्रं अवशिष्टं एषां तैः । नहि प्रयोजकव्यतिरेकेण प्राणाः कर्म कुर्वंति अथ तद्रक्षणे हेतुमाह तत्पुनः शरीरं प्रेतकल्पाकृतकं माभूदिति । अथास्तां तथात्वमिति चेत्तत्र बाधकमाह—सारमेयादिभक्ष्यं माभूदिति निर्जीवस्य गंधं गृह्णतां सारमेयादीनां श्वापदानां भक्ष्यं मा भूदिति भय

पूर्वभांके स्वानेडशाकिशीयैरुक्तं तदर्थप्रतिपादकं श्रुत्यर्थं दर्शयति –स्वो स्वीयप्रभावात् स्वसामर्थ्यात् हयरथान् निम्नगा नदी पल्वलानि ईषदुत्तं चितोडकानि तथानेकानि क्रीडास्थानानि तथा सुहृदवलापुत्रमित्रानुकारांश्च सृजति । अनुकारशब्देन प्रागुक्तसंस्कारोत्पन्नानित्यर्थः ॥ ७९ ॥

अन्वयः –( इदं ) प्रेतकल्पाकृतकं पुनः मारमेयादिभक्ष्यं मा भूत् इति श्वासमात्रावशेषैः प्राणैः निजशयनगतं कुलायं रक्षन् , यत्र कुत्रापि याति इति पूर्वेण सबन्धः ) स्वप्ने स्वीयप्रभावात् हयरथान् निम्नगाः पल्वलानि अनेकानि क्रीडास्थानानि अपि च सुहृद्वनितापुत्रमित्रानुकारान् सृजति ।

अन्वयः--हें शरीर प्रेतासारखें अमंगल किंवा कोल्ह्याकुत्र्यांचें भक्ष्य होऊं नये ह्मणून केवल श्वासरूपानें अवशिष्ट रहाणाऱ्या प्राणांच्या योगानें स्वतःच्या शय्येवर पडलेल्या शरीराचें रक्षण करणारा जीवात्मा हवा तेथें जातो. तो स्वप्नावस्थेंत स्वतःच्या सामर्थ्यानें घोडे, रथ, नद्या, लहान जलाशय, अनेक विहारस्थानें तसेंच सुहृद्, स्त्रिया, पुत्र, मित्र इत्यादिकांना पूर्वींच्या सुहृदादिकांप्रमाणेंच उत्पन्न करितो.

विवरणः---पूर्व श्लोकांत देहाला पूर्वस्थळींच सोडून जीवात्मा जातो असें म्हटलें आहे. पण त्याविषयीं तो ह्या देहाला जीवंत अवस्थेंत सोडतो कि निर्जीव अवस्थेंत सोडतो? जीवंत अवस्थेंत सोडित असल्यास पूर्वीप्रमाणें तो देहव्यापार कां करीत नाहीं? व निर्जीव अवस्थेंत सोडित असल्यास त्यामध्यें श्वास कसा रहातो! असे प्रश्न कोणी करतील ह्मणून आचार्य ह्या व पुढच्या श्लोकांत त्यांना उत्तर देतात. पूर्वी निजलेल्या ठिकाणींच असणाऱ्या निश्चेष्ट शरीराची आप्तांनीं शवाप्रमाणें व्यवस्था करूं नये किंवा वासावरून शवाला अं-ळखणाऱ्या पशुपक्ष्यांनीं त्याला खाऊं नये ह्मणून केवल श्वासरूपानें मागें रहाणाऱ्या प्राणांनीं त्याचें रक्षण करून स्वप्नभोग भोगण्याकरितां हा अंतरात्मा इष्ट स्थळीं जातो; व स्वतःच्या ज्ञान सामर्थ्यानेंच तो अनेक काल्पनिक विषय निर्माण करितो. प्राण जड असल्यामुळें त्यांना प्रेरणा करणारा कोणी तरि सचेतन असल्यावांचून त्यांची क्रिया होणें संभवनीय नाहीं. ह्मणून अंतरात्मा प्राणांना श्वासरूपानें शरीररक्षण करण्याकरितां ठेऊन जातो असें म्हटलें आहे. ॥७९॥

मातंगव्याघ्रदस्युद्विषदुरगकपीन्कुत्रचित्प्रेयसीभिः ।
क्रीडन्नास्ते हसन्वा विहरति कुहचिन्मृष्टमश्नाति चान्नम् ॥
म्लेच्छत्वं प्राप्तवानस्म्यहमितिकुहचिच्छंकितःस्वीयलोका-
दास्ते व्याघ्रादिभीत्या प्रचलति कुहचिद्रोदिति ग्रस्यमानः॥

टीका:—तथा मातंगव्याघ्रदस्युद्विषदुरगकपींश्च सृजति तत्र कुत्राप्यहं ब्राह्मणः सन् म्लेच्छत्वं प्राप्तवानिति स्वीयसुहृल्लोकाच्छंकितः आस्ते । "स्वप्ने शूद्रत्वमापन्नः" इत्यादि वासिष्ठोक्तेः । तथा कुहचित् व्याघ्रादिभीत्या प्रचलति पलायनं करोति पलायनसमर्थोऽपि व्याघ्रादिना ग्रस्यमानः सन् क्रंदते रोदिति उक्तार्थोपन्यासिकाः क्रमेण श्रुतयः—"सयत्रायंप्रस्वपित्यस्य सर्वावतोमात्रामपादायस्वयंविहत्यस्वयंनिर्मायस्वेनभासास्वेनज्योतिषाप्रस्वपितीत्यत्रायं पुरुषःस्वयंज्योतिर्भवतिनतत्ररथानरथयोगानपंथानोभवंतिअथरथान्रथयोगान् पथःसृजतेनतत्रानंदामुदःप्रमुदोभवंत्यथानंदान्मुदःसृजतेनतत्रवेशांताःपुष्करिण्यः स्रवंत्यः सृजतेसहिकर्तातथाप्राणेनरक्षन्नवरंकुलायंबहिःकुलायादमृतश्चरित्वा तथा स्वप्नांतउच्चावचमीयमानो रूपाणिदेवःकुरुतेबहूनिउतेवस्त्रीभिःसहमोदमानाजक्षदुतेवापिभयानिपश्यन्" ॥ ८० ॥

अन्वयः—मातंगव्याघ्रदस्युद्विषदुरगकपीन् (सृजति इति पूर्वेण संबंधः) कुत्रचित् प्रेयसीभिः क्रीडन् हसन् वा आस्ते । कुहचित् विहरति मृष्टं अन्नं च अश्नाति । अहं म्लेच्छत्वं प्राप्तवान् अस्मि इति कुहचित् स्वीयलोकात् शंकितः आस्ते । व्याघ्रादिभीत्या प्रचलति कुहचित् ग्रस्यमानः रोदिति ।

**अर्थः**—तसेंच चाण्डाल, व्याघ्र, चोर, शत्रु, सर्प, कपि इत्यादिकांनाही उत्पन्न करितो. कोठें आवडत्या स्त्रियांशीं क्रीडा करीत किंवा हंसत असतो. कोठें विहार करितो तर कोठें स्निग्ध अन्न खातो. मी म्लेच्छ झालों आहे असें समजून कोठें स्वतःच्या आप्तादिकांना लाजून (लपून) राहतो. कोठें व्याघ्रादिकांच्या भीतीनें पळतो तर कोठें ते खात आहेत असें पाहून रडतो.

**विवरणः**—अनेक स्वाप्निक भोगांतील कांहींचा येथें स्पष्ट उल्लेख केला आहे. व्याघ्र, सर्प यांसारखा एकादा दुष्ट प्राणी मागें लागला आहे असें पाहून तो पळूं लागतो, पण पाय अगदीं लुले पडून पळतां येत नाहीं असें पाहून, अति दुःखी होतो. इतक्यांत त्यानें येऊन पकडलें आहे व आपल्याला खात आहे असें

पाहून तो मोठ्यानें आक्रोश करितो. सारांश या अवस्थेंत अनेक इष्ट व अनिष्ट भोगांचा उपभोग प्राणी घेतो. या दोन श्लोकांतील प्रतिपादनाला "स यत्रायं प्रस्वपितीत्यस्य० अपि भयानि पश्यन्" ही बृहदारण्यक श्रुति प्रमाण आहे. ॥ ८० ॥

**यो यो दृग्गोचरोर्थो भवति स स तदा तद्भूतात्मस्वरूपा-**
**विज्ञानोत्पद्यमानः स्फुरति ननु यथा शुक्तिकाज्ञानहेतुः॥**
**रौप्याभासो मृषैव स्फुरति च किरणाज्ञानतोंभो भुजंगो**
**रज्ज्वज्ञानान्निमेषं सुखभयकृदतो दृष्टसृष्टं किलेदम् ८१**

टीका:—य इति । जाग्रदवस्थायां यो योऽर्थः पदार्थः नृपपशुपक्षिसर्प-गादिरूपो दृग्गोचरो दृष्टिविषयो भवति स स पदार्थः तदा तद्दर्शनसमये तद्भू-तात्मस्वरूपाविज्ञानोत्पन्न एव स्फुरति तच्छब्देन पूर्वोक्तः पदार्थः । तद्भूतं सर्वम-न्तर्यामित्वेन स्थितं यदात्मरूपं तस्य अविज्ञानमज्ञानं तस्मादुत्पद्यमान एव स्फुरति दृग्गोचरीभूतपदार्थोत्पत्तावात्मस्वरूपाज्ञानमेव कारणमित्यर्थः । तदेव दृष्टान्तेन द्रढयति—यथेति । यथा रौप्याभासः शुक्तिकाज्ञानहेतुरिति शुक्ति-काया अज्ञानमेव हेतुः कारणं यस्य शुक्त्यज्ञानेनोत्पादितो रजताभासः इदं रजतमित्याकारेण स्फुरति । तद्वदात्माज्ञानेन पदार्थाकारः स्फुरति यतः सुषुप्ता-वात्माकारान्तःकरणवृत्तौ सत्यां पदार्थमात्रं न स्फुरति एवं किरणाज्ञानतो मरी-च्यज्ञानान्मृगजलोत्पत्तिः । तथा रज्ज्वज्ञानाद्भुजंगोत्पत्तिः एवं स प्रातिभासि-कोऽपि पदार्थः निमेषं निमेषसमयं यावत्सुखभयकृद्भवति यतो रजतोपपत्तितस्य च रौप्यमरीच्यम्बुदर्शनादाश्वासनेन सुखं भवति तथैव भुजंगदर्शनाद्भयं भवति तथा प्रातिभासिकस्यापि पदार्थस्यैतत्कार्यक्षमत्वं दृष्टमस्ति । तद्वत् प्रकृतेऽपि क्षणिकसुखदुःखोत्पत्तिजनकत्वमस्तीत्यर्थः । अत इदं पदार्थजातं किलेति निर्धा-रणे दृष्टसृष्टं दर्शनकाल एव सृष्टं परंतु दृढसंस्कारानुबंधेन जायते यथोल्मुके भ्राम्यमाणे परिधिरूपं तेजो गोचरीभवति नोल्मुकं भवतीत्यर्थः ॥ ८१ ॥

**अन्वयः**--ननु यथा शुक्तिकाज्ञानहेतुः रौप्याभासः किरणाज्ञानतः अम्भः रज्ज्वज्ञानात् भुजंगः निमेषं सुखभयकृत् मृषैव स्फुरति । तथा यः यः दृग्गोचरः अर्थः भवति सः सः तदा तद्भूतात्मस्वरूपाविज्ञानोत्पद्यमानः स्फुरति । अतः किल इदं दृष्टसृष्टम् ।

**अर्थः--खरोखर ज्याप्रमाणें शिंपेच्या अज्ञानानें रुप्याचा भास, किरणांच्या अज्ञानापासून मृगजळ, रज्जूच्या अज्ञानामुळें भुजंग इत्यादि क्षणिक सुख व भय देणारे खोटेच पदार्थ भासतात; त्याच-**

**प्रमाणें जो जो इंद्रियगोचर पदार्थ असतो तो तो त्याकाळीं त्या पदार्थांत असणाऱ्या आत्मस्वरूपाच्या अज्ञानानें उत्पन्न होऊनच भासतो. म्हणून खचित हें सर्व केवळ दर्शनकालींच उत्पन्न होतें.**

विवरणः--या श्लोकांत आत्म्याच्या अज्ञानानेंच सर्व पदार्थ भासतात असें दृष्टान्त देऊन सिद्ध करितात. शीपीच्या तुकड्याचें ज्ञान न झाल्यामुळें तें रुपें आहे असा भ्रम होतो. किंवा सूर्यकिरणांचें ज्ञान न झाल्यानें माखडांतील भूमीवर जलाचा भास होतो. अथवा दोरीचें ज्ञान न झाल्यानें तो सर्प आहे असें वाटतें; पण तें वाटणें खरें नसतें असा ज्याप्रमाणें नेहमीं व्यवहारांत अनुभव येतो. त्याचप्रमाणें जाग्रदवस्थेमध्यें जे जे मनुष्य, पशु, पक्षि, कीड, वृक्ष, पाषाण इत्यादि पदार्थ दिसतात ते ते सर्वही त्यांत गूढ असणाऱ्या आत्म्याचें ज्ञान न झाल्यामुळें दिसतात. म्ह० आत्म्याच्या अज्ञानानेंच त्यांची उत्पत्ति होते; कारण सुषुप्तीमध्यें आत्मरूप अंतःकरणवृत्ति झाल्यामुळें कोणताच पदार्थ दिसत नाहीं. पण अहो हा संसार जर खरोखरच भ्रामक आहे तर त्यापासून सुखदुःखादिकांची प्राप्ति कशी होते ? अशी शंका घेऊं नये. कारण दरिद्री पुरुष रस्त्यांत पडलेल्या शीपेच्या तुकड्यास तें रुपें आहे असें समजून मोठ्या आनंदानें घेऊं लागतो, तृषित पुरुष मृगजलाकडे पाहून आनंदित होतो व रज्जुसर्पाला पाहून भीतीनें तो दुःखी होतो ह्या गोष्टी सर्वानुभूत आहेत. सारांश जगांतील भ्रामक पदार्थांपासून क्षणिक सुख किंवा दुःख होणें अशक्य नाहीं. तात्पर्य हें जग आपण पाहतों तेव्हांच उत्पन्न होतें व त्याच्या उत्पत्तीला आत्म्याचें अज्ञान हेंच एक कारण आहे. वस्तुतः असें आहे तरी त्याकडे एकसारखें पाहण्याची प्राण्यांना सवय लागल्यामुळें हेंच सत्यासारखें वाटून सत्य जी आत्मवस्तु ती असत्य वाटते. जोरानें फिरविलेलें कोलित जसें वर्तुलाकृति भासतें तसेंच हें जगही दृढ वासनेमुळें सत्य वाटतें. ॥ ८१ ॥

**मायाध्यासाश्रयेण प्रविततमखिलं यन्मया तेन मत्स्था-**
**न्येतान्येतेषु नाहं यदपि हि रजतं भाति शुक्तौ न रौप्ये ॥**

**शुक्त्यंशस्तेन भूतान्यपि मयि निवसंतीति विश्वग्विनेता**
**प्राहास्माद्दृश्यजातं सकलमपि मृषैवेंद्रजालोपमेयम् ८२**

टीकाः—अर्थोक्तार्थं भगवद्वाक्यं संवादयन्नाह—मायेति । यद्यस्मात्कारणान्मायारूपो योऽयमध्यासः आरोपस्तस्याश्रयीभूतेन मया अखिलं विश्वजातं नामरूपात्मकं प्रविततं विस्तारितं तेन कारणेन एतानि भूतानि मदाश्रयवर्तीनि इति प्रतीयते परंतु तेषु भूतेषु अहं नास्मि असंगोऽहं न वर्ते ननु कारणं हि स्वकार्यमभिव्याप्य तिष्ठतीति प्रसिद्धिरस्ति कथमुक्तं तेषु नाहमित्याशंक्य दृष्टांतेनोत्तरयति—यद्यपीति । यद्यपि शुक्तौ रजतं भाति परंतु रौप्ये शुक्त्यंशो न दृश्यते अथ यदि दृश्येत भ्रम एव न स्यात् तेन कारणेन मयि भूतान्यारोपितानि परंतु तेषु नाहमित्यर्थः । इति विश्वग्विनेता जगद्गुरुः श्रीशंकराचार्यः प्राह । तस्मात्कारणात्सकलमपि दृश्यजातं मृषैव किं भूतं इंद्रजालोपमेयं इंद्रजालवदुपमीयते तत् । तदुक्तं भगवता—"मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना । मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः" ॥ ८२ ॥

**अन्वयः**-यत् मायाध्यासाश्रयेण मया अखिलं प्रविततम् । तेन मत्स्थानि एतानि अहं एतेषु न । हि यद्यपि शुक्तौ रजतं भाति (परंतु) रौप्ये शुक्त्यंशः न (भाति) तेन भूतानि अपि मयि निवसन्ति इति विश्वग्विनेता प्राह । अस्मात् सकलं अपि दृश्यजातं इंद्रजालोपमेयं मृषा एव ।

**अर्थः**—(जगाच्या) खोट्या आरोपाला आश्रय होणाऱ्या मीं हें सर्व जग पसरिलें आहे. म्हणून हीं सर्व भूतें माझ्या आश्रयानें रहातात. मी मात्र त्यांच्यामध्यें नाहीं. कारण जरि शुक्तीच्या ठिकाणीं रुपें भासतें तरि त्या रुप्यांत शुक्तीचा अंश मुळींच दिसत नाहीं. म्हणूनच भूतें माझ्यामध्यें असतात पण मी त्यांच्यांत नसतों असें विश्वोपदेशक भगवान् म्हणाले. यास्तव हें सर्वही दृश्यजात गारुडाप्रमाणें खोटेंच आहे.

**विवरणः**—पूर्व प्रतिपादित अर्थाचेंच भगवद्वाक्य या श्लोकांत आचार्य सुचवितात. गौडबंगालासारखा जो हा जगद्भ्रम प्रत्ययाला येत आहे, त्याला आधार मीच आहे अर्थात् मीच ही सर्व नामरूपात्मक सृष्टि सर्वतः पसरिली आहे; आणि त्यामुळेंच हीं (सर्व भूतें) माझ्या आश्रयानें असल्यासारखीं वाटतात. पण मी असंग (कोठेंही आसक्त न होणारा) असल्यामुळें त्यांच्यामध्यें नसतों. कारण कार्याला व्यापून असतें असा जगांत अनुभव असतांना मी त्यांत नसतों असें

भगवान् कसें ह्मणतात?—अशी शंका कोणी विचारतील ह्मणून आचार्य 'यदपि हि रजतं०' इत्यादि ग्रंथानें उत्तर देतात. जरी शिंपेच्या ठिकाणीं रुपें भासतें तरी त्या भासणाऱ्या रुप्याच्या ठिकाणीं शिंपेचा किंचित्‌ही अंश भासत नसतो. आणि जर कदाचित् शिंपे-चा अंश भासूं लागला तर मग तेथें रुप्याचा भ्रमच होणार नाहीं. तस्मात् मी अधिष्ठान असल्यामुळें तीं सर्व भूतें माझ्यामध्यें आहेत पण मी त्यांच्यामध्यें नाहीं. म्ह० त्यांच्या अस्तित्वाला माझी जशी गरज असते तशी मला त्यांची कधींच गरज लागत नाहीं. मी तिन्ही काळीं स्वतःच्या सत्तारूपानें असतों. पण तीं भूतें केवळ मध्यावस्थेंत (वर्तमानकालीं) मात्र माझ्या सत्तेनें सत्तावान् होतात. असेंच यादवेंद्र गोपालकृष्णांनीं 'मया ततमिदं सर्वं०' इत्यादि गीतोक्त श्लोकांत स्पष्ट-पणें सांगितलें आहे. त्यावरून हें सर्वही दृश्यजात गारुडासारखें खोटें (कांहीं काळ भासणारें) आहे असें अनुमान करितां येतें. ॥ ८२ ॥

हेतुः कर्मैव लोके सुखतदितरयोरेवमज्ञोविदित्वा
मित्रं वा शत्रुरित्थं व्यवहरति मृषा याज्ञवल्क्यार्तभागौ ॥
यत्कर्मैवोचतुः प्राक् जनकनृपगृहे चक्रतुस्तत्प्रशंसां
वंशोत्तंसो यदूनामिति वदति न कोप्यत्र तिष्ठत्यकर्मा ८३

टीकाः—अथ कर्ममीमांसाप्रकरणं व्याख्यायते—हेतुरिति। तत्र सर्वप्राणिनां सुखदुःखफलहेतुः कर्मैवास्ति इति निरूपयति लोके सुखदुःखयोः हेतुः कारणं कर्मैव नान्यत्। एवमुक्तप्रमेयमविदित्वा अज्ञो ज्ञानहीनो जंतुः मित्रं शत्रुर्वा इत्थं मृषैव व्यवहरति। मित्रं सुखहेतुः शत्रुर्दुःखहेतुरित्थं अभिनि-विष्टः सन् व्यवहरतीत्यर्थः। यद्यस्मात्कारणात् प्राक् पूर्वं याज्ञवल्क्यार्तभागौ जनकगृहे यज्ञमंडपे कर्मैवोचतुः तथा तच्छब्देन कर्म तस्यैव प्रशंसां चक्रतुः। न केवलं तौ प्रशंसतुः किंतु यदूनां वंशोत्तंसः श्रीकृष्णोऽपि इति वदति स्म इतीति किं अत्र अस्मिँल्लोके कोऽप्यकर्मा न तिष्ठतीति। तदुक्तं गीतासु—"न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्। कार्यते ह्यवशः क-र्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः" इति ॥ ८३ ॥

अन्वयः—लोके सुखतदितरयोः हेतुः कर्म एव एवं अज्ञः अविदित्वा मित्रं शत्रुः वा इत्थं मृषा व्यवहरति। यत् प्राक् जनकनृपगृहे याज्ञवल्क्यार्तभागौ कर्म एव ऊचतुः तत्प्रशंसां (च) चक्रतुः। अत्र कः अपि अकर्मा न तिष्ठति इति यदूनां वंशोत्तंसः (अपि) वदति।

**अर्थः—व्यवहारांतील सुखदुःखाचें कारण कर्मच आहे. पण अज्ञ हें न जाणून हा मित्र किंवा हा शत्रु असा उगाच व्यवहार करितो. कारण पूर्वी जनकराजसभेंत याज्ञवल्क्य व आर्तभाग यांनीं ( सुखदुःखाचें कारण ) कर्मच सांगितलें व त्याची प्रशंसा केली. व्यवहारांत कोणीही कर्म न करितां रहात नाहीं असें यदुकुलश्रेष्ठही सांगतो.**

विवरणः—आतां येथून पुढें कर्ममीमांसा प्रकरण लागलें. या श्लोकांत प्राण्यांच्या बऱ्यावाइट भोगाला त्यांचें कर्मच कारण आहे असें निरूपण करितात. प्राण्यांच्या सुखदुःखाला त्यांच्या कर्माहून अन्य कांहींएक कारण नाहीं. पण हें अज्ञ प्राण्यांना समजत नाहीं. ते उगीच जगांत कांहीं पदार्थ इष्ट व कांहीं अनिष्ट मानितात. ज्यांच्या पासून सुख होतें ते भार्यापुत्रादि आप्त व ज्यांच्यापासून दुःख होतें ते अनाप्त असें प्राणी मानितो. पण पूर्वी जनकसभेंत मोठा वादविवाद करून याज्ञवल्क्य व आर्तभाग यांनीं कर्म हेच सुखादिकांचें कारण आहे असें ठरविलें व त्याचीच प्रशंसाही केली. शिवाय भगवान् गोपालकृष्णांनींही 'एक क्षणभरसुद्धां कोणा प्राण्याला जगांत कर्म न करितां रहतां येत नाहीं' असें स्पष्ट सांगितलें आहे. ८३

वृक्षच्छेदे कुठारः प्रभवति यदपि प्राणिनोद्यस्तथापि ।
प्रायोन्नं तृप्तिहेतुस्तदपि निगदितं कारणं भोक्तृयत्नः ॥
प्राचीनं कर्म तद्वद्विषमसमफलप्राप्तिहेतुस्तथापि ।
स्वातंत्र्यं नश्वरेस्मिन्नहि खलु घटते प्रेरकोस्यांतरात्मा ८४

टीकाः—अथ पूर्वपद्ये यद्यपि कर्मणः प्रशंसा कृता तथापि केवलस्य कर्मणो न फलदानसामर्थ्यं कुतः अचेतनत्वात् । किंतु ईश्वरप्रेरितस्यैवेति सदृष्टांतमाह वृक्षच्छेद इति । यद्यपि वृक्षच्छेदे कुठारः प्रभवति समर्थो भवति तथापि सः प्राणिनोद्यः प्राणो अस्यास्तीति प्राणी जीवस्पुरुषस्तेन नोद्यः प्रेर्यमाण एव भवति न स्वातंत्र्येणेत्यर्थः । अथ पुनर्दृष्टांतमाह—प्राय इति । अन्नं प्रायो निश्चयेन तृप्तिहेतुर्भवत्येव भोक्तृयत्नः पचनभोजनक्रियाकरः कारणं निगदितः । अथ यदर्थं दृष्टांतद्वयमुक्तं तदाह प्राचीनमिति । तदुक्तदृष्टांतवत् प्राचीनं कर्म प्राक् जन्मकृतं कर्म यद्यपि विषमसमफलहेतुर्भवति तथापि अस्मिन्नश्वरे कर्मणि फलदाने स्वातंत्र्यं नहि घटते किंतु तत्प्रेरकोऽन्तरात्मा भवति । अयमर्थः क्रियमाणं सदसत्कर्म नश्वरं नश्यति तद्धर्माधर्मरूपेण आत्मनि

सिद्धाति। सच्चिदात्मना प्रेरितं सत्कर्मभोगानुकूलं भवति फलभोगस्तु कर्मसाक्षिणे-श्वरेण प्रेरितस्याविद्यया देहाभिमानिनो जीवस्यैव संभवात् "पुण्यः पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेति श्रुतेः" तदुक्तं भगवता—"कार्यकारणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते । पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते" इति ॥ ८४ ॥

**अन्वयः**—यद्यपि वृक्षच्छेदे कुठारः प्रभवति तथापि प्राणिनोद्यः। प्रायः अन्नं तृप्तिहेतुः तदपि भोक्तृयत्नं कारणं निगदितम्। तद्वत् प्राचीनं कर्म विषमसमफल-प्राप्तिहेतुः तथापि नश्वरे अस्मिन् स्वातन्त्र्यं न हि खलु घटते (अतः) अस्य प्रेरकः अन्तरात्मा।

**अर्थः-कुऱ्हाड जरी वृक्ष तोडण्यास समर्थ आहे तरि प्राणी तिला प्रेरणा करील तेव्हांच ती तें कार्य करिते. क्षुधाशान्तीला जरि अन्न कारण आहे तरी त्याला भोक्त्याचा प्रयत्नही कारण असतो, असें सांगितलें आहे. तसेंच प्राक्तन कर्मच जरि बऱ्यावाईट फलप्राप्तीला कारण आहे तरि त्या विनाशी कर्माच्या ठिकाणीं स्वतंत्रता संभवत नाहीं. (तें स्वतःच फल देण्यास समर्थ नाहीं.) म्हणून त्यांचा प्रेरक अन्तरात्मा(च होय.)**

**विवरणः**—पूर्व श्लोकांत जरि कर्माची प्रशंसा केलेली आहे तरी केवल कर्म अचेतन असल्यामुळें फल देण्यास असमर्थ असतें. म्हणून सचेतन ईश्वर जेव्हां त्याला प्रेरित करील तेव्हांच तें फलाला कारण होतें असें दृष्टान्त देऊन येथें सिद्ध करितात. वृक्ष तोडण्यास कुऱ्हाडच पाहिजे. तिच्यावाचून वृक्षच्छेद कधींही होणार नाहीं; हें खरें. पण ती जड असल्यामुळें प्राण्याच्या सहायावांचून तिला ती क्रिया करितां येत नाहीं. किंवा अन्नच क्षुधाशांतीला जरी कारण असलें तरि ग्रास उचलणें. चर्वण करणें. कोठ्यांत तें जिरविणें इत्यादि क्रिया करण्याकरितां सचेतनाची अवश्यकता असते हें सर्वांना ठाऊक आहे. तसेंच पूर्वकर्म जरी सम किंवा विषम फल देण्यास कारण आहे तरि तें दृष्टान्तस्थ कुऱ्हाडीप्रमाणें किंवा अन्नाप्रमाणें अचेतन आहे. शिवाय कर्म तत्क्षणींच नाश पावत असतें हेंही प्रत्यक्षसिद्ध आहे. अर्थात् त्यांना फलोन्मुख होण्याविषयीं प्रेरणा करणाऱ्या आत्म्याचें सहाय लागतें. या सर्वाचें तात्पर्य असें:—प्राणी जीं बरींवाईट कर्में करितो तीं तत्क्षणींच नष्ट होतात; पण त्यांचे धर्माधर्मरूप संस्कार आत्म्यामध्यें असतात. पुढें फलभोगाची वेळ आली असतां त्यांना तो कर्मसाक्षी प्रेरणा करितो; व अविद्येनें देहाच्या ठिकाणीं आत्माभिमान ठेवणारा जीव त्यांचा भोग घेतो. श्रुतिस्मृतींतूनही असेंच प्रतिपादन केलेलें आहे. ८४

स्मृत्या लोकेषु वर्णाश्रमविहितमदो नित्यकाम्यादिकर्म
सर्वं ब्रह्मार्पणं स्यादिति निगमगिरः संगिरन्तेतिरम्यम् ॥
यन्नासानेत्रजिह्वाकरचरणशिरःश्रोत्रसंतर्पणेन ।
तुष्येदंगीव साक्षात्तरुरिव सकलो मूलसंतर्पणेन ॥ ८५ ॥

टीका.—क्षुद्रदेवताराधनमपि ब्रह्मार्पणमेव भवतीत्याह—स्मृत्येति । लोकेषु मनुष्यलोकेषु स्मृत्या वर्णाश्रमक्रमेण यन्नित्यकाम्यादि कर्म विहितं तत्सर्वं निषिद्धव्यतिरेकेण पञ्चविधं ब्रह्मार्पणमेव स्यात् इति निगमगिरः अतिरम्यं युक्तियुक्तं संगिरन्ते । यद्यपि कर्तारः फलाभिसंधानादन्यदेवतोद्देशेन कर्म कुर्वन्ति तथापि ब्रह्मार्पणमेव । कर्तारस्तु तत्तद्वासनाभिर्लिप्यन्ते । तत्र पञ्चविधानि कर्माण्यभिहितानि नित्यान्यकरणे प्रत्यवायसाधनानि संध्यावन्दनादीनि काम्यानि इष्टसाधनानि ज्योतिष्टोमादीनि । नैमित्तिकानि पुत्रजन्माद्यनुबन्धीनि जातेष्ट्यादीनि । प्रायश्चित्तानि पापक्षयसाधनानि । उपासनानि देवताराधनरूपाणि । प्रतिषिद्धानि हिंसादीनि । तत्र नित्यादीनां बुद्धिशुद्धिः परमं प्रयोजनं उपासनानां तु चित्तैकाग्र्यं । "विविदिषन्ति यज्ञेन" इत्यादिश्रुतेः । "तपसा किल्बिषं हन्ति" इत्यादिस्मृतेश्च । नित्यनैमित्तिकयोरुपासनानां चावान्तरफलं पितृलोकप्राप्तिः । "कर्मणा पितृलोको विद्यया देवलोकः" इति श्रुतेः । अथान्यदेवतोद्देशेन कर्म कृतं तद्ब्रह्मार्पणमित्यत्र युक्तिमाह—यदिति । नासानेत्रजिह्वाकरचरणशिरःश्रोत्राणां अवयवानां संतर्पणेन साक्षात्प्रतीतिसिद्धोंऽगी देही तुष्येत् । तरुरिव मूलसंतर्पणेन यथा सकलो वृक्षः संतर्पितो भवति एवमन्यदेवतोद्देशेन कृतमपि कर्मापि अवयवीभूतः सकलदेवतात्मकः परमेश्वर एव तुष्यतीत्यर्थः ॥ ८५ ॥

**अन्वयः**—लोकेषु स्मृत्या यत् वर्णाश्रमविहितं अदः नित्यकाम्यादि कर्म तत् सर्वं ब्रह्मार्पणं स्यात् इति निगमगिरः अतिरम्यं संगिरन्ते । यत् नासानेत्रजिह्वाकरचरणशिरःश्रोत्रसंतर्पणेन मूलसंतर्पणेन सकलः तरुः इव साक्षात् अंगी इव तुष्येत् ।

**अर्थः**—ह्या मृत्युलोकांत स्मृतीनें वर्णाश्रमांच्या अनुरोधानें जीं नित्यकाम्यादि कर्में सांगितलीं आहेत तीं सर्व ब्रह्मार्पणच होतात, असें वेदवाणी सयुक्तिकपणानें सांगते. कारण ( पाणी घालून ) मुळांना तृप्त केलें असतां जसा सर्व वृक्ष तृप्त होतो तसा, घ्राण, नेत्र, जिह्वा, हस्त, चरण, मस्तक, कर्ण इत्यादिकांची तृप्ति केल्यानें, साक्षात् हा अंगी ( आत्माच ) तुष्ट होतो.

**विवरणः**—क्षुद्रदेवतांची जरी आराधना केली तरी ती ब्रह्मालाच अर्पण होते असें या श्लोकांत सांगतात. स्मृतीनें वर्णाश्रमव्य-

वस्येला अनुलक्षून जीं नित्य, काम्य इत्यादि कर्मे सांगितलीं आहेत; त्यांतीह निषिद्ध सोडून बाकीचीं पांच कर्मे ब्रह्मार्पणच होतात, असें श्रुतीनें मोठ्या मार्मिकपणानें वर्णन केलें आहे. कर्मकर्ता फलाच्या इच्छेनें जरी अन्य देवतांना उद्देशून काम्य कर्म करितो, तरि तें अवयवीभूत ब्रह्मालाच पोंचतें. पण कर्त्याची भावना मात्र तशी नसते. तर तो हीं कर्मे मी अमुक अमुक देवताप्रीत्यर्थ करीत आहें अशी दृढ वासना ठेवितो. नित्य, काम्य, नैमित्तिक, प्रायश्चित्त, उपासना व प्रतिषिद्ध अशीं सहा प्रकारचीं कर्मे आहेत. ज्यांचें अनुष्ठान न केल्यास दोष लागतो अशी संध्यावंदनादि नित्य, स्वर्गादि इष्ट फलांचीं साधनें जीं ज्योतिष्टोमादि तीं काम्य, पुत्रजन्मादिनिमित्तानें होणारीं जातेष्ट्यादि नैमित्तिक, पापक्षय करणारीं प्रायश्चित्त, देवतांची आराधना हें उपासना व हिंसादिक निषिद्ध कर्मे होत. त्यांतील नित्यादि चार कर्मांचें बुद्धिशुद्धि हें व उपासनेचें चित्तैकाग्र्य हें मुख्य फल आहे. नित्य, नैमित्तिक व उपासना यांचें पितृलोकप्राप्ति हें अवांतर (दुसरें, गौण) फल आहे. 'विविदिषन्ति यज्ञेन०' व 'कर्मणा पितृलोकः०' ह्या श्रुति व 'तपसा किल्बिषं हन्ति' ही स्मृति याला प्रमाण आहे. आतां अन्य देवतांना उद्देशून केलेलीं कर्मे ब्रह्माला कशीं अर्पण होतात ह्याविषयीं एक दृष्टान्त देऊन असें होणें सयुक्तिक आहे हें सुचवितात. वृक्षाच्या मुळांत पाणी घातलें असतां त्यांच्या तृप्तीनें जसा सर्व वृक्ष तृप्त होतो त्याप्रमाणें अन्य देवतांना उद्देशून जरि कर्म केलें तरी त्यानें अवयवीभूत (सर्व देवतारूप) परमेश्वरच तृप्त होतो. म्ह० नासिका, नेत्र, इत्यादि अवयव तृप्त झाले असतां त्या सर्वांचा समूह जो अवयवी देही तोच तृप्त होतो. ॥८९॥

यः प्रेत्यात्मानभिज्ञः श्रुतिविदपि तथा कर्मकृत्कर्मणोस्य
नाशः स्यादल्पभोगात्पुनरवतरणे दुःखभोगो महीयान् ॥
आत्माभिज्ञस्यलिप्सोरपिभवतिमहाञ्शाश्वतःसिद्धिभोगो
ह्यात्मातस्मादुपास्यःखलुतदधिगमे सर्वसौख्यान्यलिप्सोः

टीका:—अथेदानीमविशेषेण सत्कर्मकृतां तत्फलमस्याहाह—य इति । यः श्रुतिविदपि वेदज्ञोऽपि तथा कर्मकृत् यागादि कर्मकृत्पुरुषः आत्मानभिज्ञः आत्मपराङ्मुखः सन्प्रेति म्रियते अस्य पुरुषस्य कर्मणः नाशः स्यात् । कस्मात् अल्पभोगात् देवलोकादिभोगात् "ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं" इत्यादिभगवद्वचनात् । तथास्य पुरुषस्य पुनरवतरणे महीयान्दुःखभोगी भवति । अथात्माभिज्ञः सन् यः फलेप्सुर्भवति तस्य का गतिरित्याह । लिप्सोरप्यात्माभिज्ञस्य महान् शाश्वतः सिद्धिभोगो भवति । महान् स्वर्गलोकादप्यधिकः तथा शाश्वतः बहुकालभोग्यः एवंविधोऽणिमाद्यष्टसिद्धिभोगो भवति । तथा अलिप्सोः सिद्ध्यनपेक्षस्यात्माभिज्ञस्य पुरुषस्य तदधिगमे आत्मप्राप्तौ सर्वसौख्यानि भवन्ति । परमानन्दप्राप्तिर्भवतीत्यर्थः । अत्र श्रुतिः—"अथयोहवा अस्माल्लोकात्स्वर्लोकमदृष्ट्वा प्रैतिसएनमविदितोनभुनक्ति यथावेदोवाननूक्तोन्यद्वाकर्माकृतंयदिहवाअप्यनेवंविन्महत्पुण्यंकर्मकरोतितद्धास्यांततःक्षीयतएवात्मानमेवलोकमुपासीतसयआत्मानमेवलोकमुपास्तेनहास्यकर्मक्षीयतेस्माद्ध्येवात्मनोयद्यत्कामयतेतत्तत्सृजत-इति" ॥ ८६ ॥

अन्वयः—यः श्रुतिविद् अपि तथा कर्मकृत् आत्मानभिज्ञः सन् प्रैति अस्य कर्मणः अल्पभोगात् नाशः स्यात् । ( अस्य ) पुनः अवतरणे महीयान् दुःखभोगः ( भवति ) आत्माभिज्ञस्य लिप्सोः अपि महान् शाश्वतः सिद्धिभोगः भवति । अलिप्सोः तदधिगमे खलु सर्वसौख्यानि भवन्ति । तस्मात् आत्मा हि उपास्यः ।

अर्थः—जो वेदवेत्ता व तसेंच कर्मठ पुरुषही आत्म्याविषयीं अज्ञ राहूनच परलोकीं जातो त्याच्या कर्माचा ( स्वर्गांत ) कांहीं काल भोग मिळाला असतां नाश होतो; व त्याला पुनः जन्म घेऊन भोग भोगतांना अत्यंत दुःख होतें. आत्मज्ञानी असून जो कर्मफलाची इच्छा करितो त्यालाही श्रेष्ठ व नित्य असे अणिमादि सिद्धींचे भोग मिळतात. फलाच्या इच्छेनें कर्में न करणाऱ्या पुरुषाला आत्मज्ञान झालें असतां बरोबर सर्व सुखें प्राप्त होतात. म्हणून आत्म्याचीच उपासना करणें योग्य आहे.

विवरणः—ज्ञानरहित कर्म व ज्ञानसहित कर्म यांची फलव्यवस्था दाखवून सर्व सुखांच्या प्राप्तीकरितां आत्मज्ञान करून घेणेंच योग्य आहे असें येथें सांगतात. एकादा पुरुष मोठा वेदवेत्ता व मोठा कर्मठही असून आत्मज्ञानी नसला तर त्याला, स्वर्गलोकीं गेल्यावर कांहीं काल भोग भोगिल्यानें कर्मक्षय झाला असतां पुनः यालोकीं येऊन जन्म घ्यावा लागतो. पण त्यावेळीं त्याला अत्यन्त

दुःख होतें. भगवानांनीं 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति' इ० त्या विशाल स्वर्गलोकचे भोग भोगल्यानें कर्मे नष्ट झालीं असतां ते मृत्युलोकीं पुनः जन्म घेतात; असें सांगितलें आहे. कर्मक्षयामुळें स्वर्गलोकांतून भ्रष्ट होऊन मर्त्यलोकीं जन्म घेतांना प्राण्यांना अत्यंत दुःख होतें. कारण देहधारण व देहविसर्जन अतिकष्टकर आहे. शिवाय व्यवहारांत सुद्धां उच्च स्थितींतल्या पुरुषाला अवनति (हीनावस्था) आली असतां किती दुःख होतें हें सर्वांना ठाऊक आहेच. आत्मज्ञानी असून जो कर्मफलाची इच्छा करितो त्याला स्वर्गाहून श्रेष्ठ व पुष्कळ काळ रहाणाऱ्या अणिमादि अष्ट सिद्धि प्राप्त होतात. तसेंच कोणत्याच इच्छा न करणाऱ्या परोक्ष आत्मज्ञानी पुरुषाला साक्षात् आत्मज्ञान झालें असतां सर्व सुखें (परमानंद) प्राप्त होतात. 'अथयोहवा अस्मात्० कामयत तत्तत्सृजत' ही श्रुति या श्लोकोक्त प्रतिपादनाला आधार आहे.॥८६॥

सूर्याद्यैरर्थभानं न हि भवति पुनः केवलैर्नात्र चित्रं
सूर्यात्सूर्यप्रतीतिर्न भवति सहसा नापि चंद्रस्य चंद्रात्॥
अग्नेरग्नेश्च किंतु स्फुरति रविमुखं चक्षुषश्चित्प्रयुक्ता-
दात्मज्योतिस्ततोयं पुरुष इह महो देवतानां च चित्रम्॥८७

टीका:—अथ सूर्यचंद्रादीनां अर्थप्रकाशकत्वे न स्वातंत्र्यमस्तीति प्रकटयन्नाह—सूर्याद्यैरिति । सूर्याद्यैः सूर्यचंद्राग्निभिः केवलैः स्वतंत्रैरर्थभानं पदार्थज्ञानं न भवतीति प्राङ्निरूपितमेवास्तीति नात्र चित्रमपूर्वं । अथान्यदपूर्वमस्तीत्याह—सूर्यादीति । लोके सूर्याद्याः स्वस्वप्रकाशका इति प्रसिद्धिरस्ति सा न तात्त्विकी कुतः यतः सूर्यात् सूर्यप्रतीतिः सहसा अकस्मान्न भवति । तथा चंद्रप्रतीतिरपि चंद्रान्न भवति तथाऽग्निदीपादेर्वा प्रतीतिर्न दीपादग्नेर्वा भवति । किंतु रविमुखं सूर्यचंद्रप्रभृति चित्प्रयुक्ताच्चक्षुषां निमित्तभूतात् स्फुरति प्रकाशते न मिथ्याभूतस्य चाक्षुषस्य प्रकाशते तस्मात्कारणादयं यः कश्चित्पुरुषो जागृतौ स्वप्नेऽप्यात्मज्योतिः । स्वयंप्रकाशको यस्य स तथाविधोऽस्ति । इह इंद्रियव्यापारे चित्रं देवानां चक्षुरादीनां महत्त्वं रूपरसादिप्रकाशकमस्ति । अत्र श्रुतिः—"चित्रं देवानामुदगादनीकं चक्षुर्मित्रस्य वरुणस्याग्नेः । आप्रा द्यावापृथिवी अंतरिक्षं सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च" ॥ ८७ ॥

अन्वयः—सूर्याद्यैः केवलैः पुनः अर्थभानं न हि भवति इति अत्र न चित्रं । सूर्यात् सूर्यप्रतीतिः सहसा न भवति अपि च चंद्रस्य चंद्रात् अग्नेः अग्नेः च न (प्रतीतिः) किंतु चित्प्रयुक्तात् चक्षुषः रविमुखं स्फुरति । ततः अयं पुरुषः आत्मज्योतिः इह देवतानां च चित्रं महः अस्ति ।

अर्थः—केवल सूर्यादिकांच्या योगानें तर विषयज्ञान नाहींच होत; पण यांत कांहीं आश्चर्य नाहीं. सूर्यामुळें सूर्यप्रतीति कधींच होत नाहीं. तसेंच चंद्रामुळें चंद्राची व अग्नीमुळें अग्नीचीही प्रतीति होत नाहीं. तर चैतन्यप्रयुक्त नेत्रांच्या योगानें सूर्यादिक भासतात. यास्तव हा पुरुषच स्वयंज्योति व विषयभोगकालीं (चक्षुरादि) देवतांचें विचित्र तेज आहे.

विवरणः—चंद्रसूर्यादि ज्योति स्वतंत्रपणें विषय प्रकाशित करण्यास समर्थ नाहींत असें येथें सांगतात. केवल सूर्यादि ज्योतींच्या योगानें विषयांचें ज्ञान होत नाहीं असें जें पूर्वीं निरूपण केलें तेंच खरें आहे. त्यांत अपूर्व असें कांहीं नाहीं. सूर्यादि देवता आपापल्या विषयांचें ज्ञान करून देतात असें जें लोक समजतात तें मात्र चमत्कारिक आहे. कारण सूर्यामुळें सूर्य, किंवा चंद्रामुळें चंद्र किंवा अग्नीमुळें अग्नि कधींच प्रतीत होत नाहीं, तर चैतन्ययुक्त नेत्रांनीं त्या सर्वांची प्रतीति येते (दिसतात). कारण जात्यन्ध अथवा निद्रित पुरुषाला त्यांची प्रतीति कधींच होत नाहीं. हें सर्वप्रसिद्ध आहे. यास्तव हा आत्मा जाग्रतींत व स्वप्नांतही आत्मज्योति (स्वप्रकाशरूप, अन्य प्रकाशनिरपेक्ष) आहे; व इंद्रियव्यापारकालीं चक्षुरादिकांच्या रूपरसादि परस्पर विलक्षण विषयांना प्रकाशित करणारें तेज आहे. याला 'चित्रं देवानामुदगा०' ही श्रुति प्रमाण आहे. ॥ ८७ ॥

प्राणेनांभांसि भूयः पिबति पुनररसान्नमश्नाति तत्र ।
तत्पाकं जाठरोऽग्निस्तदुपहितबलो द्राक् शनैर्वा करोति ॥
व्यानः सर्वांगनाडीष्वथ नयति रसं प्राणसंतर्पणार्थं ।
निःसारं पूतिगंधं त्यजति बहिरयं देहतोपानसंज्ञः ॥८८॥

टीकाः—अथ प्राणादिकृत्यमाह—प्राणेनेति । असौ देही प्राणेन कृत्वा भूयः अंभांसि पिबति पुनः अन्नं चाश्नाति तस्य तस्य पीतस्य भक्षितस्य च तदुपहितबलो जाठराग्निः पाकं करोति । तेन प्राणेन उपहितबलः शीघ्र-

मानः सन् द्राक् शीघ्रं शनैर्वा यथा प्राणः प्रयत्नं करोति । अथ पाका-नंतरं परिपक्वान्नोदकस्य रसं सारभागं प्राणसंतर्पणार्थं व्यानः सर्वांगनाडीषु नयति प्राणशब्देनेंद्रियाणि तेषां संतर्पणार्थं करोति तथा शेषं निःसार-मन्नमुदकं पूतिगंधं मूत्रविष्ठादिरूपेण त्यजति बहिर्निःसारयति ऐहतः अपानसंज्ञः ॥ ८८ ॥

**अन्वयः**—असौ प्राणेन अंभांसि भूयः पिबति पुनः अन्नं च अश्नाति । तत्र तदुपहितबलः जाठरः अग्निः द्राक् शनैः वा तत्पाकं करोति । अथ व्यानः प्राणसंतर्पणार्थं सर्वांगनाडीषु रसं नयति । अयं अपानसंज्ञः निःसारं पूतिगंधं बहिः त्यजति ।

**अर्थः**—हा आत्मा प्राणद्वारा वारंवार पाणी पितो व पुनः अन्न खातो. अन्नादि भक्षण केल्यावर प्राणांच्या सहायानें (श्वासद्वारा) बलयुक्त झालेला जठराग्नि शीघ्र किंवा हळु हळु त्यां(अन्नादिकां)चें पचन करितो. नंतर व्यान प्राणांना तृप्त करण्याकरितां शरीरांतील सर्व नाड्यांमध्यें (त्यांतील) रस नेतो; (आणि) हा अपान नांवाचा वायु (अन्नोदकांचा) निःसार भाग मूत्र व विष्ठारूपानें बाहेर टाकितो.

**विवरणः**—या श्लोकांत क्रमानें प्राण, व्यान व अपान हे तीन वायु शरीरांत राहून काय करितात हें सांगितलें आहे. आत्मा प्राणाच्या योगानें अन्न खातो व उदक पितो. म्ह० क्षुधा व तृषा हे प्राणाचे धर्म असून त्यांच्या शांतीकरितां भक्षणादि क्रिया तोच करितो. पण त्यांपासून भोक्त्याला दुःख व तृप्ति होते. हे भोग त्याला प्राणाच्या द्वाराच होतात असें सुचविण्याकरितां प्रथमचरणांत 'आत्मा प्राणद्वारा खातो' इत्यादि म्हटलें आहे. प्राण श्वासोच्छ्वास करून जठराग्नीला प्रदीप्त करितो. तो जशी जलद किंवा मंद श्वसन क्रिया करील तसा तसा तो अग्नि खालेल्या अन्नादिकांचें शीघ्र किंवा हळु हळु पचन करितो. नंतर त्या पक्व अन्नोदकांतील सार व्यान सर्व शरीरांतील नाड्यांना पोंचवितो व त्यामुळें प्राणांची तृप्ति होऊन त्यांना पुनः सतत क्रिया करण्याचें सामर्थ्य येतें. येथें प्राणशब्दानें इंद्रियेंही घ्यावीं. कारण त्यांनाही आपापलें कर्म करण्याची शक्ति या सारभूत अन्नरसामुळेंच येते. याप्रमाणें पक्व अन्नोदकांतील सार व्यानानें घेतलें असतां त्याचा अवशिष्ट राहिलेला निःसार भाग अपान वायु मूत्र व विष्ठा या रूपानें देहाबाहेर टाकितो. ॥ ८८ ॥

व्यापारं देहसंस्थः प्रतिवपुरखिलं पंचवृत्त्यात्मकोसौ ।
प्राणः सर्वेंद्रियाणामधिपतिरनिशं सत्तया निर्विवादम् ॥
यस्येत्थं चिद्घनस्य स्फुटमिह कुरुते सोस्मि सर्वस्य साक्षी ।
प्राणस्य प्राण एषोप्यखिलतनुभृतां चक्षुषश्चक्षुरेषः ८९ ॥

टीका:—एवं प्राणादीनां कृत्यमुक्त्वेदानीं सर्वाखिलवृत्त्यात्मकस्य मुख्य-प्राणस्य सत्ताप्रकाशदानेन तत्साक्षिसच्चिदानंदमात्मानं विशदीकृत्य लक्षयति—व्यापारमिति । इह व्यष्टिदेहे समष्टिदेहे च चिद्घनस्य चेत्यरहितचिन्मात्रस्य यस्यात्मनः सत्तया सत्तां प्राप्य सन्भूत्वा पंचवृत्त्यात्मकः पूर्वोक्तप्राणनादिपंचवृत्तिमान् भूत्वा देहसंस्थः समष्टौ समष्टिरूपेण उपास्यो भूत्वा व्यष्टिदेहे व्यष्टिरूपेणोपासको भूत्वा स एव सर्वेंद्रियाणां सर्वेषां ज्ञानादिज्ञानसाधनानां समष्टिव्यष्टिदेहस्थानां करणानामधिपतिः स्वामी तं विना सर्वकरणव्यापारानुपपत्तेः असौ प्राणः पूर्वोक्तप्राणः जीवभूतः सन् प्रतिवपुः प्रत्येकं सर्वशरीरेषु स्फुटं व्यक्तं यथा तथा अखिलं संपूर्णं व्यापारं कुरुते निर्वर्तयति । स एवंविधः सर्वसत्ताप्रकाशदानेन निर्वाहकः अतएव सर्वस्य समस्तस्य कार्यस्य निमित्तोपादानत्वाभ्यां साक्षी अव्यवधानेन प्रकाशकः अस्मि भवामि स एवाहमस्मीत्यर्थः। अत्र श्रुतिं प्रमाणयति—एषः प्रत्यक्परोक्षत्वरहितः प्राणस्य समष्टिव्यष्टिरूपेण सकलजगद्व्यापारकारणस्य वायोः प्राणजीवनहेतुः ॥ ८९ ॥

**अन्वयः**—अनिशं यस्य चिद्घनस्य सत्तया इह पंचवृत्त्यात्मकः देहसंस्थः सर्वेंद्रियाणां अधिपतिः असौ प्राणः प्रतिवपुः निर्विवादं अखिलं व्यापारं स्फुटं कुरुते । स सर्वस्य साक्षी ( अहं ) अस्मि । अखिलतनुभृतां प्राणस्य प्राणः एषः चक्षुषः चक्षुः अपि एषः ।

**अर्थः**—सर्वदा ज्या चिद्रूप परमात्म्याच्या सत्तेनें या शरीरांत पांच वृत्तींनींयुक्त असणारा, देहांत राहणारा व सर्व इंद्रियांचा अधिपति असा हा प्राण (ह्याप्रमाणें) प्रत्येक शरीरांत निःसंशय सर्व व्यापार स्पष्टपणें करितो; तो सर्वसाक्षीच मी आहे. सर्व देहधाऱ्यांच्या प्राणांचा प्राण हाच व सर्वांच्या नेत्राचाहि नेत्र हाच आहे.

**विवरणः**—ह्याप्रमाणें पूर्व श्लोकांत प्राणादिकांचें कर्म सांगून आतां येथें सर्ववृत्तिसमूहरूप जो मुख्यप्राण त्याला सत्ता व प्रकाश देऊन त्याचा साक्षी होणारा जो सच्चिदानंदरूप आत्मा त्याचें

स्पष्टीकरण करण्याकरितां येथें लक्षण सांगतात. केवळ चैतन्यरूप आत्म्याच्या सत्तेनें ( अस्तित्वानें ) सद्रूप व पूर्वोक्त प्राणनादि पांच वृत्तींनीं वृत्तियुक्त होऊन हा मुख्यप्राण या व्यष्टि व समष्टि देहांत रहातो. तो समष्टिरूपानें उपास्य व व्यष्टिरूपानें उपासक होतो. तोच समष्टि व व्यष्टि देहांतील इंद्रियांचा ( ज्ञानकर्म साधनांचा ) स्वामी आहे. कारण त्याच्या वांचून कोणत्याच इंद्रियाची प्रवृत्ति होत नाहीं. असा तो हा प्राण जीवरूपानें प्रत्येक शरीरामध्यें अगदीं स्पष्टपणें सर्व व्यवहार करितो. ह्याप्रमाणें सर्वांना सत्ता ( अस्तित्व ) व प्रकाश ( ज्ञानशक्ति ) देऊन त्यांच्याकडून व्यवहार करवीत असल्यामुळें तो सर्व कार्यांचें निमित्त व उपादान कारण आहे. त्यामुळेंच असा हा सर्वांचा साक्षी ( प्रत्यक्ष प्रकाशक ) जो आत्मा तोच मी आहें. ह्याविषयीं प्रमाणभूत श्रुतीच्या एक देशाचा श्लोकांतच निर्देश करितात. हा प्रत्यगात्मा. सर्व व्यापाराला कारण होणाऱ्या वायुचेंही कारण व तसेंच सर्वांच्या ज्ञानशक्तीचेंही बीज आहे. ॥८२॥

यं भांतं चिद्घनैकं क्षितिजलपवनादित्यचन्द्रादयो ये ।
भासा तस्यैव चानु प्रविरलगतयो भांति तस्मिन्वसंति ॥
विद्युत्पंजोग्निसंघोप्युडुगणविततिर्भासयेत्किं परेशं ।
ज्योतिःशांतं ह्यनंतं कविमजममरं शाश्वतं जन्मशून्यम्

टीकाः—एवं सर्वप्रकाशकत्वेन लक्षीकृतस्यैव स्थूणानिखननन्यायेन दृढीकरणाय तस्य सर्वप्रकाशकत्वमुक्तमपि 'नतत्रसूर्योभातिनचंद्रतारकं नेमाविद्युतोभांतिकुतोयमग्निः। तमेवभांतमनुभातिसर्वंतस्यभासासर्वमिदंविभाति" इतिश्रुत्यंतरप्रमाणेन दृढयति । यं भांतमिति । प्रविरलगतयः अन्योन्यं न श्लिष्टा गतिः स्वरूपव्यवहारादिस्थितिर्येषां ते तादृशाः क्षितिः पृथ्वी जलं तोयं पवनो वायुः आदित्यः सूर्यः चंद्रः सोमः आदिर्येषां [illegible] ते सर्वे यं सच्चिदानंदघनं एकं निरपेक्षं अन्यनिर्वाहक्षमं आत्मानं भांतं स्वतः प्रकाशमानं संतं अनु पश्चात् भांति प्रकाशंते किंच तस्मिन् स्वस्व-कार्यसहस्थानि वसंति तिष्ठंति तस्यसत्तां प्राप्यैव स्वस्वव्यापारक्षमा भवंति इत्यर्थः । [illegible] परेशं सर्वव्यवहारप्रवर्तकं [illegible]

अथवाद्यन्ताऽभावं यथैतं भावस्वप्रकाशान्यथानुपपत्त्या स्वतो नाशहीनं । कविं ज्ञानरूपं सार्वज्ञोपनिषदेन सर्वज्ञोपलक्षितमित्यर्थः । अजं जन्मशून्यं अमरं मृतिशून्यं जन्मनाशान्यथानुपपत्त्या जन्ममरणहीनमित्यर्थः । तथैव हेतुगर्भं स्पष्टार्थं शाश्वतं नित्यं जन्मशून्यं जन्मरहितं एतेन यास्कपठिताः "जाय-तेऽस्ति वर्धतेविपरिणमतेऽपक्षीयतेविनश्यति" इति षड्विकारा अपि निरस्ता ज्ञेयाः। तमात्मानं विद्युत्पुंजो विद्युतां पुंजः समूहः लोकदृष्ट्या प्रकाशकोपि तथा अग्निसंघः वह्नीनां समूहस्तथाभूतोपि तथा उडूनां नक्षत्राणां गणस्य समूहस्य विततिः विस्तारः उपलक्षणमेतत् सूर्यादीनां । तं सर्वप्रकाशकात्मानं भासयेत्किं प्रकाशयेत् किं नैव प्रकाशयेत् । लोकेपि प्रकाशस्य प्रकाशक-प्रकाशवित्त्वमदृष्टचरमिति भावः ॥ १० ॥

**अन्वयः**—ये प्रविरलगतयः क्षितिजलपवनादित्यचन्द्रादयः ते यं चिद्घनैकं भातं सन्तं तस्य भासा एव च अनु भांति तस्मिन् वर्तन्ति । तं परेशं शान्तं ज्योतिः अनंतं कविं अजं अमरं हि शाश्वतं जन्मशून्यं विद्युत्पुंजः अग्निसंघः अपि उडुगणविततिः भासयेत् किं ।

**अर्थः**—जे स्वरूपतः अगदीं भिन्न असणारे पृथ्वी, वायु, सूर्य, चंद्र इत्यादि पदार्थ ते ज्या चैतन्यपूर्ण, एक व स्वप्रकाशरूप असणाऱ्या आत्म्याच्या प्रकाशामागून प्रकाशित होतात; व ज्याच्यामध्येंच रहातात; त्या शान्त, प्रकाशरूप, अंतरहित सर्वज्ञ, जन्मरहित, अमर, म्हणूनच नित्य व जन्मशून्य अशा पर-मेश्वराला वीज, अग्निसमूह किंवा तारागण प्रकाशित करील काय? [ कधींही नाहीं ].

**विवरणः**—'सर्व प्रकाशत्व' हें ब्रह्माचें लक्षण सांगून, स्थूणा-निखनन ( खुंटा हालवून हालवून घट्ट करणें या ) न्यायानें पुनः तेंच दृढ करून आतां 'न तत्र सूर्यो भाति०' या प्रमाणभूत श्रुती-च्या आधारानें पुनः तेंच निश्चित करितात. पृथ्व्यादि प्रत्येक तत्त्वाचें स्वरूप भिन्न भिन्न असल्यामुळें त्यांचा अगदीं पृथक् रीतीनें व्यव-हार होतो. तीं सर्व तत्त्वें जरी प्राण्याला प्रकाशरूप दिसतात तरि तो त्यांच्या अंगचा प्रकाश नसतो. तर तीं सर्वही सच्चिदानंदघन, दुसऱ्या प्रकाशाची अपेक्षा न धरितां स्वरूपानेंच प्रकाशित होणारा, एक, व सर्वांना प्रकाश देऊन व्यवहारपटु करणारा जो पर-मात्मा त्याच्या प्रकाशानें प्रकाशित होतात. शिवाय तीं सर्व तत्त्वें

त्याच्या सत्तेनेंच ( अस्तित्वानेंच ) सत्तावान् होतात; व आपापले व्यवहार करितात. सारांश सर्व जगाला कारण, वासनाशून्य, बाधरहित, सर्व शास्त्रांचें बीज असल्यामुळें सर्वज्ञ, नित्य अविकारी असल्यामुळें जन्मशून्य व मरणशून्य अशा त्या आत्म्याला लोकांना प्रकाशमय दिसणारा विजेचा गोळा, अग्नि, नक्षत्रमाला किंवा चंद्र-सूर्यादि तरी प्रकाशित करतील काय? छेः कधींच नाहीं. कारण सत्तारूप आत्म्यावांचून कधीच कोणाची स्थिति होणें संभवनीय नाहीं. शिवाय व्यवहारांत सुद्धां एक प्रकाश दुसऱ्या प्रकाशाला प्रकाशित करीत नाहीं असाच अनुभव आहे. या श्लोकांत यास्कमुनिपठित जन्म घेतो, जीवंत असतो, दुग्धादिकांनीं वाढतो, यौवनावस्थापन्न होतो, वृद्ध होतो व मरतो या सहा भावविक्रियांचा 'अज' इत्यादि पदांनीं निर्देश केला आहे. ॥ ९० ॥

तद्ब्रह्मैवाहमस्मीत्यनुभव उदितो यस्य कस्यापि चेद्वै
पुंसः श्रीसद्गुरूणामतुलितकरुणापूर्णपीयूषदृष्ट्या ॥
जीवन्मुक्तः स एव भ्रमविधुरमना निर्गतेनाद्युपाधौ
नित्यानंदैकधाम प्रविशति परमं नष्टसंदेहवृत्तिः ॥ ९१ ॥

टीकाः—एवंभूतात्मानुभवतो जीवन्मुक्तिः फलं भवतीत्याह—तद्ब्रह्मेति । यस्य कस्यापीत्युक्त्या जातिवर्णाश्रमवयोवस्थास्त्रीपुरुषधनीत्यादिभेदा लौकिकदृष्टाः न शास्त्रीयज्ञानप्रतिबंधका इति सूचितं । लौकिकानां भ्रमाधिकारित्वभ्रमभूतानामार्तवैशिकाधिकारित्वानिरूपकवाक्यैर्बोधस्य दृश्यमानत्वात्पुंसः इत्युक्त्या मुमुक्षोः मोक्षस्य मुख्यसाधनतत्त्वज्ञानकारणगुरुशुश्रूषापूर्वकश्रवणादिषु पुरुषप्रयत्न एवापेक्षित इति सूचितं । यस्य कस्याप्यधिकारिणः पुरुषस्य श्रीसद्गुरूणां मुक्तिश्रीसहितानां सतां सद्रूपब्रह्मसाक्षात्कारगुरूणां दैशिकवर्याणां गुरूणामुक्तिः ॥ श्रीमत्त्वे सत्त्वे च श्रुतिः "भद्रैषां लक्ष्मीर्निहिताधिवाचि" "अस्ति ब्रह्मेति चेद्वेद । संतमेनं ततो विदुरिति" । अतुलिता निरुपमा या करुणा तया पूर्णा भरिता अतएव पीयूषं अमृतं तज्जन्ममरणनिवर्तिका दृष्टिः ज्ञानं तया कृत्वा "दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या" इति श्रुतेः । गुरुतः प्राप्तया ब्रह्मविद्ययेत्यर्थः । तदुक्तलक्षणं ब्रह्मैव देशकालवस्तुकृतपरिच्छेदरहितं तत्पदलक्ष्यं अहमेव त्वंपदलक्ष्यं कूटस्थरूपमेव ततः पृथगहं न भवामीत्येवं निश्चयरूपः अनुभव

साक्षात्कारः उदितः आविर्भूतः चेत् यदि स्यात् तदानीमेव स पुरुषः भ्रमविधुरमनाः भ्रमेण विपरीतज्ञानेन विधुरं वियुक्तं मनः जीवन्मुक्तिव्यवहारयोग्यप्रारब्धशेषं यावन्मनो यस्य अतएव नष्टसंदेहवृत्तिः नष्टाः विलीनाः संशयविशिष्टाः वृत्तयो यस्य स तथाभूतः सन् जीवन्मुक्तः भवति तस्यैव विदेहमुक्तिफलमप्याह स एवेति । स जीवन्मुक्त एव प्रारब्धांते अनाद्युपाधौ निर्गते स्वरूपतो लयं प्राप्ते सति बीजनाशस्य पूर्वमेव ज्ञानसमकाल जातत्वात् परमं कार्यकारणास्पृष्टं निरुपाधिकमित्यर्थः । नित्यानंदं निरतिशयं बाधहीनं सुखरूपं एकं मुख्यं धाम तेजः गृहं च स्वरूपं सर्वसूर्यादितेजःप्रकाशकत्वात् सर्वब्रह्मादिजीवानां निवासभूतत्वाच्च प्रविशति स एव भवतीत्यर्थः ॥ ११ ॥

**अन्वयः**—यस्य कस्य अपि पुंसः श्रीसद्गुरूणां अतुलितकरुणापूर्णपीयूषदृष्ट्या तद्ब्रह्म एव अहं अस्मि इति अनुभवः उदितः चेत् भ्रमविधुरमनाः ( अत एव ) नष्टसंदेहवृत्तिः सन् जीवन्मुक्तः ( भवति ) स एव अनाद्युपाधौ निर्गते सति परमं नित्यानंदैकधाम प्रविशति ।

**अर्थः**—कोणाही एकाद्या पुरुषाला श्रीसद्गुरूंच्या अप्रतिम करुणेनें पूर्ण अशा अमृत दृष्टीनें 'तें ब्रह्मच मी आहें' असा अनुभव जर आला तर त्याचें मन भ्रमरहित होतें त्यामुळेंच त्याचे सर्व संशय नष्ट होतात व तो जीवन्मुक्त होतो. त्याची अनादि उपाधि नष्ट झाली असतां श्रेष्ठ व नित्य आनंद हेंच रूप आहे ज्याचें, अशा आत्म्यामध्यें तो प्रवेश करितो.

**विवरणः**—मागच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें प्रकाशरूप आत्म्याचा अनुभव आला असतां जीवन्मुक्ति हें फल मिळतें असें येथें सांगतात. कोणाही अधिकारी पुरुषाला श्रीगुरूंच्या निरुपम करुणेनें भरल्यामुळें अमृततुल्य ( मरणाची निवृत्ति करणाऱ्या ) दृष्टीनें प्राप्त झालेल्या ब्रह्मविद्येच्या योगानें 'मी ब्रह्म आहें' असा अनुभव आला असतां ( म्ह० गुरूंनी सांगितलेल्या लक्षणाचें. देश, काल, वस्तु इत्यादिकांनी होणाऱ्या परिच्छेदानें रहित व महावाक्यस्थ तत् पदाचें लक्ष्य ब्रह्मच मी त्वंपदलक्ष्य कूटस्थ आहें, त्याहून भिन्न नाहीं असा निश्चयात्मक साक्षात्कार झाला असतां ) तेव्हांच त्या पुरुषाचें मन विपरीत ज्ञानरहित होतें. ( म्ह० प्रारब्धाप्रमाणें जीवन्मु-

त्यवस्थेमध्यें व्यवहार करण्यास योग्य असें तें होतें.) अंतःकरण भ्रमशून्य झाल्यामुळेंच त्याच्या संशययुक्त वृत्ति नाहींशा होतात. असें झालें असतां पुरुष (साधक) जीवन्मुक्त होतो. 'स एव' या पदांनीं त्या जीवन्मुक्तालाच विदेहमुक्ति हें फल मिळतें असें सांगतात. तो जीवन्मुक्तच प्रारब्ध कर्माचा क्षय झाला असतां व मायारूपी उपाधि समूळ नष्ट झाली असतां, पुनर्जन्माचें बीज जीं संचितादि कर्में तीं पूर्वीं आत्मज्ञानकालींच नष्ट झाल्यामुळें, कार्यकारणभाव शून्य (म्ह० निरुपाधिक) व निरतिशय आनंदरूप अशा मुख्य गृहामध्यें (स्वरूपा–तेजामध्यें) प्रवेश करितो. धाम म्ह० तेज किंवा गृह असें स्वतःचें रूप. तें सर्व सूर्यादि तेजांना प्रकाशित करितें म्हणून तेज व आब्रह्मस्तंभपर्यंत सर्वांचें तें वसतिस्थान असल्यामुळें गृह होय. अशा त्या तेजांत किंवा गृहांत (म्ह० स्वतःच्या रूपांत) तो लीन (तद्रूप) होतो. ह्या श्लोकाच्या प्रथम चरणांत 'यस्य कस्यापि' हीं पदें योजून व्यवहारसिद्ध मनुष्य, पशु, इत्यादि जाति, ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम, बाल्यादि वयोवस्था, स्त्री, पुरुष, उच्च, नीच इत्यादि भेद शास्त्रीय ज्ञानाला प्रतिबंधक नाहींत असें सुचविलें आहे. लोक भ्रमानें कांहींना अधिकार आहे व कांहींना नाहीं असें मानतात. पण अमुक अमुक लक्षणांनीं युक्त असलेला कोणीही पुरुष मोक्षाचा अधिकारी आहे असें प्रतिपादन करणाऱ्या वाक्यांनीं त्यांचें निराकरण केलें आहे. 'पुंसः' असें पद श्लोकांत योजून मोक्षाचें मुख्य साधन जें तत्त्वज्ञान तें प्राप्त होण्याकरितां गुरुशुश्रूषा व तद्द्वारा श्रवणादिसाधनें यांचें अनुष्ठान मुमुक्षूनें प्रयत्नपूर्वक करावें, असें सुचविलें आहे. **श्रीसद्गुरूणां**—म्ह० मुक्ति व श्री (संपत्ति) यां सहवर्तमान असणारे व सद्रूप ब्रह्माचा ज्यांना साक्षात्कार झाला आहे अशा उपदेशक गुरूंचा. आत्मज्ञानी गुरु श्रीयुक्त असतात. ह्याविषयीं 'भद्रैषां लक्ष्मी निहिताधिवाचि' 'अस्ति ब्रह्मेति चेद्वेद०' इत्यादि अनेक श्रुति प्रमाण आहेत. ॥ ९१ ॥

नो देहो नेन्द्रियाणि क्षरमतिचपलं नो मनो नैव बुद्धिः ।
प्राणो नैवाहमस्मीत्यखिलजडमिदं वस्तुजातं कथं स्याम् ॥
नाहंकारो न दारागृहसुतसुजनक्षेत्रवित्तादिदूरं ।
साक्षी चित्प्रत्यगात्मा निखिलजगदधिष्ठानभूतः शिवोऽहम्

टीका—इदानीं तस्यैव ज्ञानिनो यावत्प्रारब्धं सर्वं व्यवहारप्रतिबंधकत्वेन जीवन्मुक्तिसुखमनुभवितुं सर्वदेहाद्यसत्त्वानुसंधानमाह—नो देह इति । देहः पंचीकृतपंचभूतकार्यः अन्नविकारः स्थूलदेहः अहं न मम चिद्रूपत्वात्म-त्वाच्च । देहस्तु क्षरं अतिचपलमिति हेतुगर्भितविशेषणद्वयं क्षरत्वाद्यसाध-र्मित्वात् अन्यथान्यथापरिणामत्वेनातिचंचलत्वाच्च । आत्मा तु सद्रूपत्वेन स्थिरश्चिद्रूपश्च अनुभूयते । अतो वैलक्षण्यादहमात्मा देहो न भवामि किंतु देहस्तु नास्त्येवेत्यर्थः । किंच अहं आत्मा इंद्रियाणि क्रियासाध-नानि ज्ञानसाधनानि चेत्युभयात्मकानि तान्यपि न भवामि । इंद्रियाणाम-न्वयान्वयव्यावृत्त्या असत्त्वप्रतीतेः । विषयाणामसत्त्वेनेंद्रियाणामसत्त्वस्यानुभू-यमानत्वाच्चंचलत्वाच्च नान्यदहं न भवामि पूर्वविशेषणद्वयमप्यत्रानुवर्तनाच्च बोध्यं । किंच अहं मनः संकल्पात्मकं न भवामि नापि कामादिवृत्ति-मत्त्वमात्मत्वादिमत्त्वेन च विकारवत्त्वादसत्त्वाच्च मनो नास्त्येव अहं तु मनो-विकाराणां उत्पत्तिविनाशयोश्च प्रकाशकत्वेन साक्षिरूपेण प्रकाशमान-त्वादसौ मनो नाहमित्याशयः । किंच बुद्धिः निश्चयात्मिकांतःकरणवृत्तिरपि अहं न भवामि जाग्रदाद्यवस्थात्वेनोत्पत्तिविलयदर्शनात् अहं तु आत्मा-ऽवस्थात्रयवत्बुद्धिसाक्षी सद्रूपः स बुद्धिः कथं स्यामहं न स्यामित्यर्थः । किंच प्राणः पंचवृत्त्यात्मकः शारीरो वायुः अहं नैवास्मि नैव भवामि । इदं मम कूटस्थस्यात्मनो प्रकाश्यं अखिलं जडमिदं सर्वं अनित्यं देहादिवस्तुजातं पदार्थसमूहः । अहं कूटस्थः सच्चिदानंदः कथं स्यां केन प्रकारेण भवामि अनात्मनोऽहंकारस्य सर्वस्य दृश्यमानत्वात् अहमात्मतत्त्वाद्विकारित्वाच्च अहं-कारस्यापि तथात्वात्तस्य अहंकारः अहं द्रष्टा सच्चिदानंदः कूटस्थः इत्यतीव वैलक्षण्यात् न भवामि । अतएव दाराः स्त्री गृहं सद्म सुताः पुत्राः सुजनाः संबंधिबांधवमित्रभृत्यादयः क्षेत्रं भूमिः वित्तं द्रव्यं आदि-शब्दं यस्य जातिकुलवर्णाश्रमधर्मादि तत्सकलमपि देहादिसंबंधीनीति कृत्वा दूरं अत्यंतमनात्मनोऽस्मि । अहं तु एतस्य देहादिजडवस्तुजातस्य साक्षाद्द्रष्टैव प्रकाशकत्वात्साक्ष्यस्मि । प्रकाशकत्वादेव ज्ञानं सर्वांतर-त्वेन स्वतः प्रकाशमानत्वात्प्रत्यक् आनन्दात्मस्वरूपः आत्मा यं विना सर्वा-रोपाधिष्ठानस्य सकलप्रपंचस्याधिष्ठानत्वेन निखिलस्य समस्तजगतो वि-श्वस्याधिष्ठानभूतः अधिष्ठानत्वेनोक्तः शिवः सुखरूपः अस्मि ॥ १२ ॥

**अन्वयः**—अहं देहः नो इंद्रियाणि क्षरं अतिचपलं मनः च नो बुद्धिः न एव प्राणः न एव अस्मि । इति इदं अखिलजडं वस्तुजातं कथं स्याम् । अहंकारः न दारागृहसुतसुजनक्षेत्रवित्तादि दूरं न ( अस्मि ) साक्षी चित्प्रत्यगात्मा निखिलजगदधिष्ठानभूतः शिवः अहं अस्मि ।

**अर्थः—मी देह नव्हे, इंद्रियें नव्हे, क्षयि व अत्यंत चपल मन नव्हें बुद्धीही नव्हे, प्राणही नव्हे, मग मी हें सर्व जड वस्तुजात कसें असेन? मी अहंकार नव्हे; ( देहापासून ) दूर असणारी स्त्री, गृह पुत्र, बांधव, शेत, द्रव्य, इत्यादिही मी नव्हे. तर मी साक्षी ज्ञानरूप, सर्वान्तर्यामी व सर्व जगाला आधार होणारा शिव आहें.**

विवरणः—आतां येथें त्याच ज्ञान्याच्या प्रारब्ध कर्माचा क्षय होईतों व्यवहाराला तर प्रतिबंध न येतां जीवन्मुक्तीचें सुखही त्याला घेतां यावें म्हणून देहादि सर्वांविषयीं सर्वदां दृढ असत्त्व भावना ठेवून स्वतःच्या आत्मरूपाकडे त्यानें अनुसंधान ठेवावें; असें सांगतात. पंचीकृत पंचभूतांचें कार्य व अन्नाचा विकार असा हा स्थूल देह मी नव्हें. कारण मी सच्चिद्रूप आहें; व देह क्षय पावणारा व प्रतिक्षणीं निरनिराळ्या रूपाचा होणारा आहे. आत्मा तर सद्रूप असल्यामुळें स्थिर व चिद्रूप आहे. असा सूक्ष्मदृष्टि पुरुषाला अनुभव येतो. अर्थात् त्या उभयतांमध्यें मोठेंच अंतर असल्यामुळें मी देह नव्हें. तसेंच मी ( आत्मा ) क्रियेचीं व ज्ञानाचीं साधनें जीं इंद्रियें तींही नव्हे. तीं परस्पर पृथक् असल्यामुळें असत्त्वरूप आहेत हें उघडच आहे. शिवाय विषयांच्या असत्त्वानेंच त्यांचें असत्त्व प्रतीतीला येत असल्यामुळें व तीं चंचल असल्यामुळें तीं मी नव्हें. इंद्रियें आत्मा नव्हे असें सिद्ध करण्याकरितां पूर्व विशेषणें येथेंही घ्यावीं. मी संशयात्मक मन नव्हें. काम, क्रोध इत्यादि वृत्तीनीं युक्त असल्यामुळें मन विकारी आहे असें सिद्ध होतें. व तें. असद्रूप असल्यामुळें, वस्तुतः नाहींच. पण मी मनोविकारांची उत्पत्ति व नाश यांना प्रकाशित करितों व सच्चिद्रूपानें प्रकाशमान आहें म्हणून मी मन नव्हें. निश्चयात्मक अंतःकरणवृत्तीही मी नव्हें. कारण ती बुद्धि जाग्रदादि अवस्थेमध्यें उत्पन्न होते व सुषुप्तींत लय पावते; व मी आत्मा तर तिन्ही अवस्था व जाग्रत्स्वप्नांतील बुद्धि यांचा साक्षी, व सद्रूप असतों; म्हणून मी बुद्धि नव्हे. शिवाय शरीरांतील प्राणापानादि पांच वृत्तींचा प्राणवायु मी

नव्हें. हें सर्वही देहादि जड (चैतन्यशून्य) पदार्थजात माझें प्रकाश्य (मजकडून प्रकाशित–ज्ञात–होणारें, माझ्यामुळें अस्तित्वांत येणारें) आहे; व मी विकृतिशून्य सच्चिदानंदरूप आहें. तेव्हां आम्हां उभयतांचें ऐक्य कसें होणार? त्यामुळेंच मी अहंकारही नव्हें. कारण अहंकाराला विषय होणारे सर्व पदार्थ दृश्य, जड, निस्तत्त्वरूप व विकारी असल्यामुळें अहंकारही निस्तत्त्वादि धर्मयुक्तच आहे. अर्थात् माझ्यापेक्षां पृथक् आहे. अगदीं निकट असणारा देह व देहधर्मसुद्धां जर मी नव्हे तर स्त्री, गृह, पुत्र, आप्त, इष्ट, बांधव क्षेत्र (शेत) द्रव्य इत्यादि मजपासून धडधडीत निराळे असणारे पदार्थ मी कसा होईन. मी ह्या देहादि जड पदार्थांना साक्षात् प्रकाशित करितों (जाणतों) म्हणून मी साक्षी आहें. ज्ञानरूप असल्यामुळें मी चित् (चैतन्य), बुद्ध्यादि सर्वांच्याही आंत असून स्वयंज्योति असल्यामुळें मी प्रत्यक्, सर्वांचा स्वतःमध्यें लय करीत असल्यामुळें व सद्रूप असल्यामुळें मी आत्मा, व ज्याच्या वांचून सर्गभ्रमाला अधिष्ठान होणाऱ्या शबल ब्रह्माचीही सिद्धि होत नाहीं, तो गौणरीतीनें सर्व जगाचें अधिष्ठान होणारा मी (आत्मा) कल्याणरूप आहें.

दृश्यं यद्रूपमेतद्भवति च विशदं नीलपीताद्यनेकं।
सर्वस्यैतस्य दृग्वै स्फुरदनुभवना लोचनं चैकरूपम्॥
तद्दृश्यं मानसं दृक् परिणतविषयाकारधीवृत्तयोपि।
दृश्या दृग्रूप एव प्रभुरिह स तथा दृश्यते नैव साक्षी॥९३॥

टीका:—एवं जीवन्मुक्तस्यात्मानुसंधानमुक्त्वेदानीं प्रकारान्तरेण तदेव पुनराह—दृश्यमिति। एतत् इदंतया प्रतीयमानं रूपं रूप्यते प्रकाश्यते इति रूपं प्रकाशितं तत्सर्वं दृश्यं दृग्विषयमनेकरूपं नीलपीतादि नीलं श्यामं पीतं गौरं इत्यादिविविधगुणत्वात् एतस्य प्रतीयमानस्य सर्वस्य अनेकविधस्य रूपस्य दृक् दृश्यते अनयेति सा वृत्तिः वै निश्चयेन स्फुरदनुभवना स्फुरन्ति प्रतीयन्ते अनुभवरूपाणि स्फुरणानि यस्यां सा तथोक्ता। सा लोचनं रूपालोकसाधनत्वात्। सर्वैकरूपं एकधैव प्रतीयते किंच तल्लोचनमपि दृश्यं प्रतीतिविषयं अतो जडं तस्यापि दृक् दर्शनसाधनं मानसं मनः अस्ति तस्यापि मानसस्य दृश्यत्वेनानुभूयमानत्वात् तस्य दृक् वृत्तिः धीर्निश्चयात्मकमन्तःकरणं। तस्या अपि अनुभूयमानत्वात्

परिणतविषयाकारधीवृत्तयोपि परिणामेन विषयाकृतित्वेन अनेकविध-त्वात् विकारत्वात धियां वृत्तयो दृश्या एव । सर्वस्यैतस्य जडविकारित्वेनाना-त्मत्वं निश्चेयं । इह जडसमूहे सर्वस्मिन् प्रभुः सर्वप्रकाशनसमर्थः साक्षी अव्यवधानेन सर्वप्रकाशकः आत्मा दृग्रूप एव सर्वप्रकाशसाधनभूतोपि तथा विषयत्वम् नैव दृश्यते अनुभवविषयो नैव भवतीत्यर्थः ॥ १३ ॥

अन्वयः—दृश्यं यत् रूपं तत् नीलपीताद्यनेकं च विशदं भवति । सर्वस्य एतस्य दृक् वै स्फुरदनुभवता तच्च लोचनं एकरूपम् । तत् दृश्यं मानसं दृक् ( तस्य धीः दृक् ) परिणतविषयाकारधीवृत्तयः अपि दृश्याः । ( तस्मात् ) इह प्रभुः साक्षी दृग्रूपः एव । स तथा नैव दृश्यते ।

**अर्थः—दृश्य ( नेत्रविषय ) जें रूप तें नीळें, पिवळें इत्यादि अनेक रूपांनीं स्पष्ट भासतें. ह्या सर्वांचें दर्शनसाधन प्रतीतीला येणारा अनुभवपणाच आहे. तोच नेत्र होय; व तो एकरूपाचाच असतो. पण तोही दृश्य ( अनुभवविषय ) आहे. त्याचें दर्शनसा-धन मन आहे. मनाचा प्रत्यय बुद्धीला येतो. विषयांप्रमाणें परिणाम पावलेल्या ( त्यांच्या सारख्या आकाराच्या ) बुद्धिवृ-त्तीसुद्धां दृश्य आहेत ( तस्मात् ) या सर्वांत, सर्वांचा नियामक व साक्षी जो आत्मा तोच ज्ञानरूप आहे. व विषयांप्रमाणें त्याचा अनुभव कोणालाच येत नाहीं.**

विवरण—पूर्व श्लोकांत जीवन्मुक्त पुरुष आत्मानुसंधान कसें टेवितो तें सांगितलें आतां येथें तेंच पुनः निराळ्या प्रकारानें सांग-तात. हें प्रत्यक्ष अनुभवाला येणारें रूप निळें, काळें, पांढरें, पिंवळें, इत्यादि अनेक प्रकारांनीं भासत असल्यामुळें दृश्य ( अनुभवाला योग्य ) आहे. ह्या प्रतीत होणाऱ्या सर्व रूपांचें ग्रहण करणारी व जीच्यामध्यें अनुभवरूप स्फुरणें भासतात अशी दृष्टिच नेत्र होत. कारण ते नेत्र रूपदर्शनाचें साधन आहेत. पण त्यांची प्रतीति एकरूपानेंच येते म्ह० रूपामध्यें जसे नीलादि अनेक भेद दिसतात तसे नेत्रांत कोठेंच भेद दिसत नाहीं. ते नेत्रही दृश्य आहेत; कारण नेत्रांचा मनाला अनुभव येतो; ह्मणून ते जडही आहेत. पुढें तें मन दृश्य आहे असा अनुभव येतो. कारण त्याला निश्चयरूप अंतःकरण ( बुद्धि ) पाहतें ( विषय करितें. ) ती बुद्धिही दृश्य आहे. कारण विषयरूप झालेल्या अंतःकरणवृत्तींचाही भोक्त्याला अनुभव येत असतो. ह्मणून भोक्त्याच्या अनुभवाला येणारें हें सर्व पदार्थजात जड व विकारी असल्यामुळें आत्म्याहून पृथक् आहे, असा निश्चय

करावा; व ह्या सर्व जड पदार्थांत गूढ राहून सर्वांचाही अनुभव घेणारा प्रभु व सर्वांच्या निकट राहून त्यांना साक्षात् पाहणारा साक्षी आत्माच ज्ञानरूप आहे. सर्व पदार्थांना जरी हा आपल्या ज्ञानसामर्थ्यानें प्रकाशित (व्यवहार योग्य) करितो व सर्वांचा अनुभव घेतो. तरी याला प्रकाशित करणारा व याचा अनुभव घेणारा दुसरा कोणीही नाहीं. तात्पर्य विषयांचा नेत्रादि इंद्रियें. नेत्रांचा मन. मनाचा बुद्धि व बुद्धीचा आत्मा अनुभव घेतो; पण त्याचा अनुभव घेणारा दुसरा कोणीही प्रतीत होत नाहीं. म्हणून हाच स्वप्रकाश, स्वयंज्योति, अनुभवरूप, व ज्ञान (ज्ञेय नव्हे) आहे. सारांश व्यवहारांत आम्ही सर्व प्राकृत लोक बुद्धिस्थ संस्कारांनाच ज्ञान म्हणून समजतों. पण तें खरें ज्ञान नसून ज्ञेय आहे. कारण त्याचाही अनुभव दुसरा कोणी घेत असतोच; पण आम्हां विषयी जनांना तें समजत नाहीं. ॥१३॥

रज्ज्वज्ञानाद्भुजंगस्तदुपरि सहसा भाति मंदान्धकारे।
स्वात्माज्ञानात्तथासौ भृशमसुखमभूदात्मनो जीवभावः॥
आप्तोक्त्याहिभ्रमांते स च खलु विदितारज्जुरेका तथाहं।
कूटस्थो नैव जीवो निजगुरुवचसा साक्षीभूतः शिवोहम्॥

टीका:—इदानीं तस्यैव जीवन्मुक्तस्य स्वरूपं स्वगुरुवचनविश्वासपूर्वकं युक्त्या स्वजीवत्वबाधेन स्वात्मानुसंधानमाह—रज्ज्वज्ञानादिति। यथा मंदांधकारे ईषदंधकारावृते आलोके रज्ज्वज्ञानात् रज्जुरूपानवलोकनात् तदुपरि तत्सदृशाज्ञानरज्ज्वामित्यर्थः। सहसा अकस्मात् भुजंगः सर्पः भाति भासते तथा तेनैव प्रकारेण स्वात्माज्ञानात् स्वस्वरूपानवलोकनात् स्वसदृशेऽनवलोकिते आत्मनि असौ समस्ताज्ञानेऽनुभूयमानः भृशं अत्यंत असुखं दुःखरूपः आत्मनः सदाधारं निरवधिपापस्थितः। आत्मसंबंधी जीवभावः जीवत्वं भाति प्रकाशत इत्यर्थः। स भ्रांतिभांत भावः। यथा रज्जुसर्पदृष्टांते आप्तोक्त्या प्रामाणिकपुरुषवचनाद्भाषणेन अहिभ्रमांते सर्पभ्रांतिनिवृत्तौ सत्यां सः सर्पप्रत्ययः पुरः स्थिता ज्ञाता सती एका रज्जुरहितैव रज्जुः रज्जुनामप्रत्यय एव अभूत् जाता। तथा तेन प्रकारेण निजगुरुवचसा निजः स्वकीयः गुरुर्बोधकः तस्य वचसा युक्त्या तत्त्वमसीत्यादिवाक्यार्थबोधनरूपा तेन कृत्वा जीवत्वभ्रमांते जीवत्वभ्रमे नष्टे सतीत्यर्थः। अहं जीवः सुखी दुःखी जननमरणकर्तृभोक्तृरूपः नैव नास्म्येव अहं साक्षिभूतः जीवत्वाद्यखिलप्रकाशत्वात्साक्षित्वोपचारवान् वस्तुतस्तु कूटस्थः निर्विकारः शिवः आनंदरूपः अस्मि ॥ १४ ॥

**अन्वयः**—( यथा ) मंदान्धकारे रज्ज्वज्ञानात् तदुपरि सहसा भुजंगः भाति तथा स्वात्माज्ञानात् असौ आत्मनः जीवभावः भृशं असुखं (भाति । यथा) आप्तोक्त्या अहिभ्रमान्ते स च खलु विदिता रज्जुः एव एका अभूत् तथा निजगुरुवचसा ( जीवत्वभ्रमान्ते ) अहं जीवः न एव अस्मि अहं साक्षीभूतः कूटस्थः शिवः अस्मि ।

**अर्थः--ज्याप्रमाणें मंद अंधकारामध्यें दोरीचें ज्ञान न झाल्यामुळें तिच्या ठिकाणीं सर्प भासतो, तसाच स्वात्म्याच्या अज्ञानानें हा आत्म्याला अत्यन्त दुःखरूप जीवभाव प्राप्त होतोसें भासतें. आप्ताच्या सांगण्यावरून सर्पभ्रम नष्ट झाला असतां ज्ञात झालेली ती एक रज्जूच तो जसा होतो, तसाच आपल्या गुरूंच्या वचनानें जीवभ्रम नष्ट झाला असतां मी जीव नव्हेंच तर मी सर्वसाक्षी, निर्विकार व कल्याणरूप आहें. ( असा बोध होतो. )**

**विवरणः**—आतां येथें त्या जीवन्मुक्ताचें स्वरूप सांगतात व साधकानें गुरुंवर विश्वास ठेऊन त्यांनी सांगितलेल्या वचनानुरूप तर्क करून युक्तिनें स्वतःच्या जीवत्वाचा बाध करून आत्मानुसंधान कसें करावें हेंही सांगतात. जसें अति अंधारही नाहीं व अति प्रकाशही नाहीं अशा वेळीं रस्त्यांत पडलेल्या दोरीचें यथार्थ ज्ञान न झाल्यानें म्ह० तिच्या स्वरूपाच्या अज्ञानानें तो मोठा सर्प आहे असें पहाणाराला एकाएकीं वाटतें, तसेंच स्वतःच्या आत्म्याचें यथार्थ रूप न समजल्यानें म्ह० आत्म्याचें आत्मरूपानें ज्ञान न झाल्यामुळें त्याच्याच जागीं हा सर्व प्राकृतांच्या प्रत्ययाला येणारा आत्मसंबंधी अत्यन्त दुःखरूप जीवभाव भासतो. सर्पभ्रमाला रज्जूचें ज्ञान न होणें हें कारण असून जशी तीच त्याला आधार असते, तसेंच जीवभ्रमाला आत्म्याचें अज्ञान कारण व तोच आधार आहे. पण ज्याच्यावर आपला विश्वास असतो अशा एखाद्या पुरुषानें 'अरे तो सर्प नव्हे दोरी आहे' असें सांगितलें असतां व त्याप्रमाणें आपणाला अनुभव आला असतां जसा भ्रम नष्ट होतो व पूर्वी भासलेला सर्पच केवळ एक दोरी होऊन राहतो म्ह० दोरीचें ज्ञान झाल्यानें तद्विषयक अज्ञान व तदज्ञानकार्य नष्ट

होतें व रज्जुरूपानें ज्ञात झालेली एकटी रज्जूच अवशिष्ट राहते. त्या प्रमाणें स्वगुरूंच्या ( आत्मज्ञोनापदेशकांच्या ) वचनानें ह्म० त्यांनीं सांगितलेल्या 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यांच्या अर्थद्वारा व युक्तीनें जीवत्वभ्रम नष्ट झाला असतां. सुख, दुःख, जन्म, मरण. कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि धर्मांनी युक्त होणारा जीव मी नव्हें तर मी जीवादिकांचा साक्षात् अनुभव घेणारा आहें. त्यामुळेंच आत्मज्ञानी मला साक्षी ह्मणतात. पण वस्तुतः मी निर्विकार व कल्याणरूप आहें, असें जीवन्मुक्त पुरुषानें सर्वदा आत्मानुसंधान ठेवावें. सारांश सर्पभ्रम जसा आप्तोपदेशानें नष्ट होतो. तसाच जीवत्वभ्रमही गुरूपदेश, शास्त्रवचन. तदनुसारी तर्क व स्वतःचा अनुभव यांच्या योगानें निःशेष घालवून सर्वदा आत्मस्वरूपचिंतनांत अवशिष्ट आयुष्य घालवावें ९४

किं ज्योतिस्ते वदस्वाहनि रविरिह मे चंद्रदीपादि रात्रौ ।
स्यादेवं भानुदीपादिकपरिकलने किं तव ज्योतिरस्ति ॥
चक्षुस्तन्मीलने किं भवति च सुतरां धीर्धियः किं प्रकाशे
तत्रैवाहं ततस्त्वं तदसि परतकं ज्योतिरस्मि प्रभोऽहम् ॥९५

टीका:—इदानीं तस्यैव जीवन्मुक्तस्य स्वस्य गुरुशिष्यभावं प्रकल्प्य संवादेन तस्य परमज्योतिरूपानुसंधानमाह—किंज्योतिरिति । हे शिष्य ते तव अहनि दिवसे घटपटादिप्रकाशव्यवहारे रात्रौ च निशि किं ज्योतिः तेजः किमस्ति तद्वदस्व कथय येन दिनरात्रिव्यवहारः सिध्यति इति पृष्टे गुरुणा शिष्यः चक्षुः नेत्रं स्यात् येन लोके प्रकाशकं सूर्यचंद्रादिरूपं प्रकाशकं द्रव्यं तत्प्रकाश्यं द्रव्यं च दृश्यते इयता चक्षुरेव ज्योतिरित्यर्थः । एवमुक्ते शिष्येण ततो गुरुः पृच्छति तन्मीलन इति तन्मीलने चक्षुषः निमीलने कृते सति किंज्योतिः पश्चात्सूर्यचंद्रादिप्रकाशकतत्प्रकाश्यघटादिस्फुरणस्य किंप्रकाशसाधकं तेजः ते अस्ति इति पृष्टः शिष्य आह नेत्रनिमीलनानंतरं सर्वव्यवहारस्फुरणसाधनं ज्योतिः [illegible] मत्प्रकाशकं धीर्बुद्धिः अस्तीत्युक्ते ततः गुरुः पृच्छति धिय इति । धियोऽपि बुद्धेः नेत्रप्रत्यक्षादिप्रकाशत्वेनानुभूयमानायाः तत्प्रकाशे ज्ञेयत्वव्यवहारे ते तव किंज्योतिस्तेजः इति पृष्टः शिष्य आह अहमिति । मम बुद्ध्यनुभवितृत्वात् । मम बुद्धिप्रकाशव्यवहारे साधकं अहं ज्योतिरस्मि एवमुक्ते शिष्येण गुरुः

पृष्ठानि भवंति । तथापि अहंत्वस्यापि अनुभूयमानत्वव्यवहारे साधकं तव किं ज्योतिः किं प्रकाशकं तेजः अस्ति इति पृष्टः शिष्य आह अहमिति अहंत्वप्रकाशक आत्मास्तीत्यर्थः । एवमुक्तो गुरुराह ततस्त्वमिति । त्वत्स्वरूपस्य कस्यापि प्रकाशद्रव्यस्याभावात् । प्रकाशद्रव्यस्यापि तत्प्रकाशाविनुमशकत्वात् स्वयंज्योतिष्ट्वेन प्रकाशमानत्वात् तत्परमेकं ज्योतिः कार्यकारणप्रकाशद्वयप्रकाशकत्वाद्यत्पृष्टं तेजः त्वं त्वंपदलक्ष्य आत्मा असि भवसि । अतस्तज्ज्योतिः प्रकर्षभानरूपः अस्मीत्यनुभवः अथार्थेबृहदारण्यकीश्रुतिरपि "आत्मैवास्य ज्योतिरित्यादिका" ॥ १९ ॥

**अन्वयः**—ते किं ज्योतिः वदस्व इह अहनि मे रविः रात्रौ चंद्रदीपादि स्यात् । एवं भानुदीपादिकपरिकलने तव किं ज्योतिः अस्ति । चक्षुः । तन्मीलने च किं भवति । पुनरपि धीः । धियः प्रकाशे किं ( अहं ) तत्र एव किं अहं ततः त्वं तत् असि । हे प्रभो अहं परमकं ज्योतिः अस्मि ।

**अर्थः—प्रश्न हे शिष्या तूं कोणत्या तेजानें ( प्रकाशानें ) व्यवहार करितोस तें सांग. उत्तर-या व्यवहारांत दिवसां सूर्य व रात्रीं चंद्र, दीप इत्यादि माझीं तेजें आहेत. प्रश्नः-ठीक आहे. पण सूर्य, चंद्र, दीप इत्यादिकांचें ग्रहण तूं कोणच्या ज्योतीनें करितोस? उ०-नेत्रानें. प्र०-आणि नेत्र मिटल्यावर कोणत्या तेजानें व्यवहार करितोस? उ०-सर्व प्रकाशक बुद्धीनें. प्र०-बुद्धीचा प्रकाशक कोण? ( उ० मी अहंकार. प्र०-तुझा प्रकाशक कोण?) उ०-मी शुद्ध चिद्‌घन आत्मा. गु०-तस्मात् तूं तें आहेस. शिष्य-हे प्रभो मी सर्वश्रेष्ठ तेज आहें.**

**विवरणः**—आतां येथें तोच जीवन्मुक्त स्वतःच्या अंतःकरणांत गुरुशिष्यांची कल्पना करून त्यांच्या संवादद्वारा परम ज्योतिरूप आत्म्याकडे अनुसंधान कसें ठेवितो तें आचार्य सांगतात. गुरु प्रश्न करितातः—हे शिष्या, दिवसां जो तूं सर्व पदार्थांशीं व्यवहार करितोस व रात्रींही जो तुझा दिवसाप्रमाणेंच व्यवहार होतो तो कोणत्या प्रकाशानें तें मला सांग. शिष्यः—महाराज दिवसां सूर्यप्रकाशानें व रात्रीं चंद्र, दीप इत्यादि प्रकाशानें मी व्यवहार करितों. गु०—त्या चंद्रसूर्यादि वस्तुप्रकाशकांचें तरी तुला ज्ञान कसें होतें? शिष्य—महाराज मी माझ्या नेत्रांनीं त्यांचें ग्रहण करितों; व माझे नेत्र त्या प्रकाशाच्या सहायानें सर्व पदार्थ पहातात. गु०—पण तूं तुझे नेत्र मिटतोस तेव्हां, किंवा निद्रेमध्यें तुझे डोळे आपोआप मिटतात

तेव्हां सूर्यादि प्रकाशक व घटादि प्रकाश्य यांचा अनुभव घेणारें कोणतें तेज असतें ? शि०—नेत्र मिटले असतां अत्यन्त प्रकाशक जी बुद्धि तिच्या योगानें माझा सर्व व्यवहार होतो. गु०—बरें बुद्धीचा प्रकाशक कोण ? कारण चंद्रसूर्यांप्रमाणेंच तीही प्रकाशमय आहे असा अनुभव येत असतो; तर तिचा अनुभव घेणारा कोण ? शि०-मी ( अहंकार ) कारण मी बुद्धीच्या सर्व चेष्टा जाणतों. ह्या प्रमाणें शिष्यानें गुरूंना उत्तर दिलें असतां पुनः गुरु ह्मणतातः— पण त्या अनुभवास येणाऱ्या अहंतेचा व्यवहार तूं कोणच्या ज्योतीनें करितोस ? असा प्रश्न केला असतां शिष्याला स्वस्वरूपाहून अन्य तेज न दिसल्यामुळें पुनः अहंकाराला प्रकाशित करणारा मीच ( आत्मा ) आहें; असें त्यानें सांगितलें. हें ऐकून गुरु ह्मणतात—तर मग तुझ्याहून अन्य दुसरा कोणताच पदार्थ स्वरोस्वर प्रकाशरूप नसल्यामुळें, व जे सूर्यादि व्यावहारिक प्रकाशरूप पदार्थ आहेत तेही त्या आत्म्याला, तो स्वयंज्योति व ह्मणूनच प्रकाशरूप असल्यामुळें, प्रकाशित करूं शकत नाहींत. ह्मणून ती श्रेष्ठ ज्योतिच ( ह्म० कार्यकारण, प्रकाश्यप्रकाशक इत्यादि व्यावहारिक भावांशीं यत्किंचितही संबंध न ठेवणारें तेज ) तूं ( त्वंपदाचा लक्ष्यार्थ आत्मा ) आहेस. असा कृपाळु गुरूंनीं उपदेश केला असतां, शिष्य त्या विषयीं स्वतःशीं एकान्तांत विचार करून स्वतःचा अनुभव सांगतो— हे प्रभो मीच ती श्रेष्ठ ज्योति आहें. याच अर्थी ‘ आत्मैवास्य ज्योतिः’ इत्यादि बृहदारण्यक श्रुति आहे. या श्लोकांत गुरुशिष्यसंवादरूपानें विचाराची दिशा फार मार्मिकपणें आचार्यांनीं श्रुतीच्या आधारानें दाखविली आहे ॥ ९५ ॥

कंचित्कालं स्थितः सौ पुनरिह भजते नैव देहादिसंघं।
यावत्प्रारब्धभोगं कथमपि स सुखं चेष्टते संगबुद्ध्या॥
निर्द्वंद्वो नित्यशुद्धो विगलितममताहंकृतिर्नित्यतृप्तो
ब्रह्मानंदस्वरूपः स्थिरमतिरचलो निर्गताशेषमोहः॥९६॥

टीकाः—एवंभूतानुभववतो जीवन्मुक्तस्य व्यवहारमाह—कंचिदिति । सः ब्रह्मवेत्ता जीवन्मुक्त इत्यर्थः । कंचित्कालं कतिचित्कालपर्यंतं यथालोकं यथाधिकारित्वशक्तिपरिच्छेदकालपर्यंतमित्यर्थः । कौ स्थूलदेहापेक्षया पृथिव्यां वस्तुतस्तु ब्रह्मवसिष्ठादीनामपि अन्यलोकेषु स्थितिश्रुत्या कौ क्षेत्रवाच्यत्वाच्चांऽतःकरणे स्थितः वर्तमान इव लक्षितोपि इह पृथिव्यां क्षेत्रे च पुनः देहसंभावितसत्त्वनिवृत्तेः पश्चात् देहादिसंघं स्थूलदेहस्त्रीपुत्रमित्रादिसमूहं नैव भजते नैवांगीकरोति । सत्त्वेनात्मनि तत्संबंधवत्त्वप्रतीतिं न करोतीत्यर्थः । किंच क्षेत्रस्थूलदेहादिसंघं च यावत्प्रारब्धभोगं प्रारब्धभोगपर्यंतं कथमपि ब्रह्मवेत्तुः ईश्वरत्वेन मायाप्रारब्धयोरधीनत्वाभावात् महिमा च कर्तृत्वभोक्तृत्वानुपपत्तेर्भोक्तृत्वान्यथानुपपत्त्या प्रारब्धभोगस्य ब्रह्मज्ञानां ब्रह्मयोगीनां कर्तृभोक्तृव्यवहारस्यापि दृश्यमानत्वात्सर्वव्यवहारस्य मायामात्रत्वेनानिर्वचनीयो ब्रह्मवेतृव्यवहार इतिभावः । असंगबुद्ध्या असंगब्रह्मात्मबोधेन सुखं यथा भवति तथा निःसंशयत्वान्निर्दुःखमित्यर्थः । चेष्टते चेष्टावत्त्वेन प्रतीतो भवतीत्यर्थः । तस्यासंगबोधमेवांतराधेन विशेषणैर्विशदयति निर्द्वंद्वः सुखदुःखादिद्वंद्वहीनः तत्र हेतुः नित्यशुद्धः जीवत्वस्य काल्पितत्वकृताद्ब्रह्मणोऽभेदं प्राप्तस्य ज्ञानिनः कालत्रयेपि पुण्यपापहीनत्वान्नित्यशुद्धत्वमिति भावः । अतएव विगलितममताहंकृतिः अत्यंतमुत्पन्नबोधमहिम्नेन नष्टा ममता अन्यत्र पुत्रादौ देहादौ चाहंकृतिस्तादात्म्यं यस्य स अतएव नित्यतृप्तः निरंकुशसंतोषवान् । तत्र हेतुः ब्रह्मानंदस्वरूपः अपरिच्छिन्नानंदरूपः स्थिरमतिः स्थिरे ब्रह्मणि मतिर्यस्य स्वतश्च ब्रह्मरूपत्वादचलः स्थिरः तत्र हेतुः निर्गताशेषमोहः निःशेषनिवृत्तः अशेषः मूलाज्ञानपर्यन्तः अज्ञानसमूहः विपरीतज्ञानसहितो यस्य । अतो ज्ञानिनि चेष्टा या प्रतीयते सा मायाया इति भावः ॥ ९६ ॥

**अन्वयः**—कंचित्कालं कौ स्थितः इह पुनः देहादिसंघं न एव भजते । यावत्प्रारब्धभोगं कथमपि असंगबुद्ध्या सः निर्द्वंद्वः नित्यशुद्धः विगलितममताहंकृतिः नित्यतृप्तः ब्रह्मानंदस्वरूपः स्थिरमतिः अचलः निर्गताशेषमोहः सन् सुखं चेष्टते ।

**अर्थः**—( तो ) कांहीं कालपर्यंत पृथ्वीवर राहिला तरी पुनः येथें देहादि समूहावर आस्था ठेवीत नाहीं तर प्रारब्धकर्मभोग संपेपर्यंत कसा तरी निःसंग ब्रह्मच आत्मा आहे अशा ज्ञानानें सुखदुःखादि द्वंद्वरहित, सर्वदा शुद्ध, ज्याची अहंता व ममता नष्ट झाली आहे, ज्याची बुद्धि स्थिर आहे, जो अचल

**आहे व ज्याचा सर्व मोह नष्ट झाला आहे, असा तो जीवन्मुक्त पुरुष मोठ्या आनंदानें व्यवहार करितो.**

**विवरणः**—आतां या श्लोकांत आचार्य, पूर्वी सांगितल्याप्रमाणें ज्याला अनुभव आला आहे असा जीवन्मुक्त जगांत कसा व्यवहार करितो तें सांगतात. कांहीं कालपर्यंत (म्ह० प्रारब्ध कर्मांचा क्षय होईतों) तो ब्रह्मवेत्ता पुरुष या पृथ्वीमध्यें रहात असल्यासारखा वाटतो. कु म्ह० पृथ्वी असा जरी रूढ अर्थ आहे तरी या ठिकाणीं कु म्ह० अंतःकरण असा अर्थ करणें योग्य आहे. कारण ब्रह्मदेव, वसिष्ठ इत्यादि आत्मज्ञानी सिद्ध, अन्य लोकांमध्यें रहातात असें पुष्कळ ठिकाणीं सांगितलेलें आहे. म्हणून 'कु' या शब्दाचा क्षेत्र (अंतःकरण) असा व्यापक अर्थ करावा. सारांश अंतःकरणांत तो पुरुष रहात असल्यासारखा वाटतो खरा, पण तो तेथें राहूनही स्थूल देह, स्त्री, पुत्र, मित्र इत्यादि विषयसमूहाचे ठिकाणीं आस्था ठेवित नाहीं. कारण देहादि सर्व पदार्थ निस्तत्त्व आहेत, अशी त्याची दृढ समजूत झालेली असते; व त्यामुळें ते सत्य आहेत किंवा आत्म्याचा व त्यांचा कांहीं संबंध आहे असें तो मुळींच मानीत नाहीं. तो या स्थूलसूक्ष्मदेहामध्यें प्रारब्ध कर्माचा क्षय होई तों कसा तरी रहातो. ब्रह्मवेत्ता स्वतः ईश्वर असल्यामुळें तो वस्तुतः माया व प्राक्तन यांच्या अधीन रहात नसतो. पण त्यांच्या अधीन झाल्यावांचून कर्तृत्व, भोक्तृत्व, सिद्ध होत नाहीं. म्हणून तो प्रारब्धकर्मक्षयापर्यंत देहांत यदृच्छेनें रहातो. तात्पर्य भोक्तृत्वादिकांची अन्य तऱ्हेनें उपपत्ति लागत नसल्यामुळें व देवादिकांच्या ठिकाणींही कर्तृत्वादि दिसत असल्यामुळें सर्व व्यवहार मायामय आहे असें सिद्ध झालें. व्यवहार मायारूप असल्यामुळें ब्रह्मवेत्त्याचा व्यवहारही अनिर्वचनीय आहे असेंच म्हटलें पाहिजे; आणि हें सुचविण्याकरिताच 'कथमपि' असें श्लोकांत म्हटलें आहे. तो जीवन्मुक्त, कोठेंही सक्त न होणारें ब्रह्मच माझा आत्मा आहे अशा

सतत भावनेनें मोठ्या आनंदानें व्यवहार करीत रहातो. कारण त्याचे आत्मविषयक सर्व संशय नष्ट झालेले असतात. त्याला असंगबोध कसा होतो व त्याचा परिणाम त्याच्यावर कसा घडतो हें पुढच्या अर्धातील विशेषणांनीं स्पष्ट करितात. निर्द्वंद्व ह्म० तो नित्य शुद्ध असल्यामुळें सुखदुःख, शीतोष्ण, इत्यादि द्वंद्वरहित होतो. नित्यशुद्धः—जीव पापपुण्यवान् असल्यामुळें त्याला सर्वदां शुद्ध रहातां येत नाहीं, तर पापामुळें बुद्धिद्वारा तो बहुतेक अशुद्धच असतो; आणि पुण्यामुळें केव्हां केव्हां शुद्ध होतो. पण आत्मज्ञानी पुरुष ब्रह्मच होत असल्यामुळें त्रिकालींही तो पापपुण्यहीन असतो. ह्मणून तो नित्य शुद्ध होय. तो नित्यशुद्ध असतो ह्मणूनच त्याचा देहेंद्रियादिकांविषयीं अहंकार व देहाहून पृथक् असणाऱ्या पुत्रादिकांविषयीं ममता हीं नष्ट होतात. अहंममभाव नष्ट झाल्यामुळें तो सर्वदां तृप्त असतो. त्याच्या तृप्तीला कधींच प्रतिबंध होत नाहीं. कारण तो अपरिमित आनंदरूप होतो. त्याची बुद्धि ब्रह्माच्या ठिकाणीं स्थिर होते; व तो स्वतः ब्रह्मरूप होत असल्यामुळें अचल होतो. कारण त्याचा मोह मूल अविद्यारूप कारणांसह नष्ट झालेला असतो. तात्पर्य जीवन्मुक्त व्यवहार करीत असल्यासारखा जो सर्वांना प्रत्यय येतो तो मायिक होय खरा नव्हे. कारण तो पुरुष मायामय देहादिकांनीं जरी व्यवहार करीत असला तरी तो अंतःकरणांत आत्मस्वरूपाविषयीं सर्वदां सावध असतो ॥ ९६ ॥

जीवात्मब्रह्मभेदं दलयति सहसा यत् प्रकाशैकरूपं ।
विज्ञानं तच्च बुद्धौ समुदितमतुलं यस्य पुंसः पवित्रम् ॥
माया तेनैव तस्य क्षयमुपगमिता संसृतेः कारणं या ।
नष्टा सा कार्यकर्त्री पुनरपि भविता नैव विज्ञानमात्रात् ९७

टीकाः—इदानीं ज्ञानिनोऽपि प्रतीयमानस्य चेष्टामात्रस्य संसारजनकत्वाभावं सहेतुकं प्रपंचयति—जीवात्मेति । यत् महावाक्यजन्यत्वे सति गुरुमुखमुख्या स्वतो युक्तिपूर्वकसंभावितत्वेन निश्चितं ज्ञानं चरमवृत्त्याख्यं

प्रकाशैकरूपं प्रकाश एवैकं मुख्यं रूपं यस्य तादृशं सहसा अकस्मात् तत्कालमित्यर्थः । जीवात्मब्रह्मभेदं जीवात्मनः त्वंपदलक्ष्यस्य कूटस्थस्य ब्रह्मण तत्पदलक्ष्यस्य च भेदं भिन्नत्वं कारणेन मूलाज्ञानेन सह दलयति नाशयति । तथाभूतं पवित्रं रागद्वेषादिवासनारहितसर्वमलनिवर्तकत्वात्पावनं "न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते" इति भगवदुक्तेः । अतुलं निरुपमं यत्साधिकारिगुणेनस्य पुंसः पुरुषप्रवरस्य बुद्धौ शुद्धान्तःकरणे समुदितं संशयविपर्ययराहित्यमापन्नं अभूत तस्य पुरुषस्य तेनैवान्यवरणानभि-रपेक्षेण ज्ञानेन कर्त्री या संसृतेः कारणं संसारस्य हेतुरूपा माया अत एव कार्य-कारणदर्शनसामर्थ्यशून्या अकर्तृत्वपर्यवसाना अथ नाशं उपगमिता प्रापिता विज्ञानमात्रात् ज्ञानमात्रबलेन सा माया पुनरपि नाशप्राप्तेः पश्चादित्यर्थः । अविद्यादशापूर्वमपि कार्यस्य कर्तृ ज्ञाननिवृत्या नासीत् । किंपुनर्ज्ञानानन्तरमित्यर्थः । नष्टा नाशं प्राप्ता सती कार्यकर्त्री कार्यं भ्रमः तस्य कर्त्री जनका नैव भविता न भविष्यतीत्ययं निश्चय एव ॥ १७ ॥

**अन्वयः**—यत् प्रकाशैकरूपं विज्ञानं सहसा जीवात्मब्रह्मभेदं दलयति तत् च पवित्रं अतुलं यस्य पुंसः बुद्धौ समुदितं ( अभूत ) तस्य या संसृतेः कारणं माया सा तेन एव क्षयं उपगमिता । विज्ञानमात्रात् सा नष्टा पुनरपि कार्यकर्त्री न एव भविता ।

**अर्थः**—प्रकाश हेंच मुख्य रूप आहे ज्याचें असें तें ज्ञान तत्क्षणींच जीव, आत्मा व ब्रह्म यांतील भेद घालवितें; व तें पवित्र व निरुपम ज्ञान ज्या पुरुषाच्या बुद्धींत उत्पन्न होतें त्याची संसाराला कारण होणारी ती माया त्या ज्ञानानेंच क्षय पावते. ( तरी तिचें भान असतें. ) पण केवळ भानानेंच ती नष्ट झालेली माया पुनःही भ्रम करणारी होत नाहीं ( जीवभ्रम उत्पन्न करीत नाहीं. )

**विवरणः**—ज्ञानी पुरुष जरी क्रिया करीत असल्यासारखा वाटतो, तरी त्याची ती क्रिया अज्ञानी पुरुषाच्या क्रियेप्रमाणें सुख-दुःखादि संसार उत्पन्न करीत नाहीं; असें आचार्य सकारण येथें प्रतिपादन करितात. आत्मज्ञान वेदांतील महावाक्यांपासून उत्पन्न होत असतें. पण त्यांच्या अर्थाचा बोध गुरुमुखापासून करून घेतला पाहिजे; व गुरूपदेशानंतर स्वतः युक्तिप्रयुक्तीनें तोच वाक्यार्थ सत्य आहे अशाविषयीं आपला दृढ निश्चय केला पाहिजे. या निश्चित ज्ञानाला 'चरमवृत्ति' म्ह० शेवटची बुद्धिवृत्ति असें म्हणतात. कारण 'मी

ब्रह्म आहे ' अशी एकदां वृत्ति झाली कीं तो पुरुष अंतःकरणवृत्ति-शून्य होत असतो. प्रकाश ( अनुभव, साक्षात्कार ) हेंच मुख्य रूप आहे ज्याचें असें हें परंपराप्राप्तज्ञान उत्पन्न होतांच तें जीव, त्वंपद-लक्ष्य कुटस्थ आत्मा व तत्पदलक्ष्य ब्रह्म यांतील भेद तत्क्षणींच नष्ट करितें. तें राग, द्वेष इत्यादि दोषांच्या वासनांसह मनाचा सर्व मल घालवितें ह्मणून पवित्र व निरुपम आहे. असें श्रेष्ठ ज्ञान ज्या दृढ प्रयत्न करणाऱ्या उत्तम अधिकाऱ्याच्या शुद्ध अंतःकरणांत उत्पन्न होतें, त्याच्या त्या ज्ञानानें संसारोत्पत्तीला कारण होणारी माया नष्ट होते. ज्ञानाला मायेचा नाश करण्यास अन्य कोणत्याच साधनाची अपेक्षा नसते. कार्यकारणभावरहित असल्यामुळें ती निस्तत्त्वरूप माया, प्रकृति या नांवानें शास्त्रांत प्रसिद्ध आहे. मूळ अज्ञान नष्ट झालें तरी तो ज्ञानी व्यवहार करीत असल्यासारखा भासतो, पण त्या केवळ भासानेंच एकदां नष्ट झालेली माया पुनः कधींच भ्रमरूप कार्य करूं शकत नाहीं; ही गोष्ट अगदीं निश्चित आहे ॥ ९७ ॥

विश्वं नेति प्रमाणाद्विगलितजगदाकारभानस्त्यजेद्वै ।
पीत्वा यद्वत्फलांभस्त्यजति च सुतरां तत्फलं सौरभाढ्यम् ।
सम्यक् सच्चिद्घनैकामृतसुखकवलास्वादपूर्णो हृदासौ ।
ज्ञात्वा निःसारमेवं जगदखिलमिदं स्वप्रभःशांतचित्तः ॥ ९८

टीकाः—इदानीं भासमानायामपि संसृतौ ज्ञानिनि तत्त्यागं दृष्टांतेन संभावयन्नाह—विश्वमिति । असौ ज्ञानी विश्वं जगत् न नास्ति इति प्रमाणात् एवंविधस्वतःप्रमाणभूतात् " नेहनानास्ति किंचनेति " श्रुतिवाक्यादित्यर्थः । विगलितजगदाकारभानः विगलितं बीजसहितं नष्टं जगतः आकार इव आकृतिमज्ञानं भासनं यस्य किंच हृदा सर्वापवादेन सम्यक् चिद्घनैकामृतसुखकवलास्वादपूर्णः समीचीनतया चिद्रूपं यद्घनं निबिडं अज्ञानजगदादिप्रवेशात्सम्यक् यच्छिद्रहीनमित्यर्थः । एकं स्वगतसजातीयभेदहीनं अमृतं नाशहीनं सुखमानंदः तस्य कवलो ग्रासः यथा ग्रासः हस्तेन मुखे क्रियते तद्वत्सांख्ययोगहस्तेनांतःकरणस्य विद्यारूपमुखे कृतः ग्रासस्तेनोक्तः तस्यास्वादोऽनुभवः यद्वत् मुखे क्षिप्तस्य ग्रासस्य जिह्वयेव तेन पूर्णः नित्यतृप्तः सन् एवं उक्तरीत्या अखिलं समस्तं

सयत् विश्वं निःसारं सत्त्वसुखत्वहीनं अतएवेदं दृश्यते न प्रतीयमानस्याविस्व-रहितं ज्ञात्वानुभूय शांतचित्तः शांतं भर्जितबीजत्वेनोपरतं चित्तं चेतो यस्य सः सज्जगत्त्यजेत् विसृजेत् तत्र दृष्टांतः यद्वदिति। लोके यद्वत् यथा कोपि फलांभः नारिंगाम्रादेः फलस्य अंभः रसं सुतरां अत्यंतं निःशेषमित्यर्थः। पीत्वा माद्य तत्फलं पीतरसफलं सौरभाढ्यं सुगंधभरितमपि वै निश्चयेन फलगतसौगंध्यस्य तृप्तिहेतुत्वाभावात् तृप्तस्य तृप्त्यपेक्षाभावाच्च त्यजति तद्वदिति संबंधः

**अन्वयः**—यद्वत् फलाम्भः सुतरां पीत्वा तत् फलं सौरभाढ्यं वै त्यजति (तद्वत्) असौ विश्वं न इति प्रमाणात् विगलितजगदाकारभानः हृदा सम्यक् चिद्घनैकामृतसुखकवलास्वादपूर्णः च(सन्) एवं अखिलं इदं जगत् निःसारं ज्ञात्वा स्वप्रभः शांतचित्तः त्यजेत्।

**अर्थः**—ज्याप्रमाणें आम्रादि फलांतील रस निःशेष पिऊन तें फल उत्तम वासानें परिपूर्ण असलें तरी (प्राणी) टाकितो; त्याचप्रमाणें 'विश्व नाहीं' ह्या प्रमाण वाक्याच्या योगानें ज्याचें जगद्रूपी भान नष्ट झालें आहे व जो सूक्ष्म दृष्टीनें चैतन्यपूर्ण, एक, व नाशरहित अशा सुखाचा अनुभव घेऊन नित्य तृप्त झाला आहे अशा त्या शांतचित्त व स्वयंज्योति ज्ञानी पुरुषानें ह्याप्रमाणें सर्व जग निःसार आहे असें जाणून टाकावें.

**विवरणः**—ज्ञानी पुरुष संसार करित असल्यासारखा जरी दिसतो तरि त्याचा तो त्याग करितो (म्हणजे त्यांत आसक्त होत नाहीं), असें येथें दृष्टान्त देऊन सांगतात. हा ज्ञानी 'जग नाहीं' 'अन्य कांहीं नाहीं' असें प्रतिपादन करणाऱ्या स्वतःप्रमाण श्रुतिवाक्यांच्या दृढानुसंधानानें निःशंक होतो.त्यामुळें जगदाकारभ्रमाणें सर्वांच्या अंतःकरणांत असणारें जें जगद्रूप भान तें त्याच्या ठिकाणीं नसतें,तर तें कारणासह नष्ट होतें. सर्वही दृश्य पदार्थांचें परीक्षण करून प्रत्येक पदार्थाला उद्देशून'हें नव्हे' 'हें नव्हे' असा सर्वांचा बाध केल्यामुळें अवशिष्ट रहाणारा चैतन्यपूर्ण, स्वगतादि भेदरहित, व नाशहीन असा जो आनंद त्याचा तो ग्रास करितो. म्ह० त्या परमानंदाचा यथेच्छ अनुभव घेतो. जसे मनुष्य अन्नाचे ग्रास हातानें तोंडांत घालितो, तसाच हा त्या पूर्ण आनंदरूप अन्नाचे सांख्यशास्त्र व योगशास्त्र ह्या हस्तांनीं अंतःकरणाच्या विचाररूप मुखामध्यें ग्रास घेतो. जिह्वेनें कांहीं काल रसास्वाद घेतला असतां जसा प्राणी तृप्त होतो तसा त्या आनंदानुभवानें हा ज्ञानी नित्य तृप्त होतो; व हें

सर्व जग असार आहे म्ह० यांत सत्त्व किंवा सुख नाहीं असा त्याचा निश्चय होतो; आणि असा निश्चय झाला असतां चित्तविक्षेपाचें कारणच नष्ट झाल्यामुळें त्याचें अंतःकरण शांत होतें. त्यामुळें भाजलेल्या बीजाप्रमाणें तें चित्त संसारोत्पत्तीच्या निरुपयोगीं झालें असतां ज्ञान्यानें ह्या जगाचा त्याग करावा. याविषयीं एक लौकिक दृष्टान्त देतात. जसा व्यावहारिक पुरुष आंबा, नारिंग इत्यादि फलांतील सर्व रस पिऊन अवशिष्ट राहिलेला नीरस भाग सुवासिक असला तरि, त्याला त्याची गरज नसल्यामुळें, टाकून देतो, तसाच मुमुक्षूनें ज्ञानानंतर हा संसार टाकावा. ॥ ९८ ॥

क्षियंते चास्य कर्माण्यपि खलु हृदयग्रंथिरुद्भिद्यते वै ॥
छिद्यंते संशया ये जनिमृतिफलदा दृष्टमात्रे परेशे॥
तस्मिंश्चिन्मात्ररूपे गुणमलरहिते तत्त्वमस्यादिलक्ष्ये ॥
कूटस्थे प्रत्यगात्मन्यखिलविधिमनोगोचरे ब्रह्मणीशे ९९

टीकाः—इदानीं ज्ञानिनि बाधिताहंकारादिजगत्प्रतीतावपि बंधकत्वं कर्मणां न भवतीत्यस्मिन्नर्थे " भिद्यते हृदयग्रंथिः" इत्यादिकां श्रुतिं प्रमाणयति क्षीयंत इति । तस्मिन्सर्ववेदांतोक्तलक्षणलक्षिते तान्येव लक्षणान्याह । विशेषणैः चिन्मात्ररूपे चेत्यरहितचिन्मात्रे तत्र हेतुः गुणमलरहिते गुणकृता रागद्वेषादयः गुणरूपाश्च मलाः बंधनलेपहेतवस्तैः रहिते हीने । तत्त्वमस्यादिलक्ष्ये तत्त्वमस्यादिमहावाक्यैर्भागत्यागलक्षणयैव केवलं लक्षितं योग्ये ब्रह्मणि अपरिच्छिन्ने ईशे तं विना मायातत्कार्ययोरनिर्वाहान्नियंतृत्वाद्युपचारिते अखिलाविधिमनोगोचरे समस्तविधिवाक्यानामानियोज्यविषये च मनसां चाविषये कूटस्थे निर्विकारे प्रत्यगात्मनि अंतर्मुखवृत्त्यैवाज्ञानमात्रनिरसने जाते स्वयमेव प्रकाशमाने आत्मनि वस्तुनि स्वस्मिन् परेशे परेषां ब्रह्मादीनां मायायाश्च नियंतृत्वोपचारिते तमात्मानं विना तेषां तत्कार्याणां चासिद्धेः दृष्टमात्रे[1] केवलमनुभूतएव अस्य कूटस्थब्रह्मरूपभूतांतःकरणवृत्तिमतः कर्माणि संचितप्रारब्धक्रियमाणाख्यानि सर्वाण्यपि क्षीयंते नष्टानि भवंति तत्र हेतुमाह खल्विति । अस्येत्यनुवृत्त्या कूटस्थब्रह्मसाक्षात्कारवतः पुरुषस्य हृदयग्रंथिः हृदंतःकरणं तस्य यः प्रकाशकः आत्मा तयोर्ग्रंथिः स्वात्माज्ञानरूपं अन्योन्यतादात्म्यरूपेणैक्य

---

१ प्रारब्ध० इति चिन्त्यं. अनारब्धकार्ये एव तु पूर्वे तदवधेः (ब्र०मी०४।१।१५।१९) इति सूचितत्वात्.

रूपः संश्लेषः सः निश्चयेन खलु उद्भिद्यते तयोरंतःकरणचिदात्मनोर्भेदप्रतीत्या छिन्नो भवति तल्लिंगमाह छिद्यंत इति । सर्वसंशयाः देहादात्मा भिन्नो वाऽभिन्न इत्यादयः अज्ञानग्रंथिमूलत्वात्तेषां तन्निवृत्तौ ते छिद्यंते नश्यंति तत्फलं चाह विशेषणेन जनिमृतिफलदा इति । जन्ममरणफलप्रदाः अतस्तन्निवृत्तौ जन्ममरणनिवृत्तिर्ब्रह्मज्ञानफलमित्यर्थः ॥ ११ ॥

**अन्वयः**—तस्मिन् चिन्मात्ररूपे गुणमलरहिते तत्त्वमस्यादिलक्ष्ये कूटस्थे प्रत्यगात्मनि अखिलविधिमनोऽगोचरे ब्रह्मणि ईशे परेशे दृष्टमात्रे सति अस्य च कर्माणि क्षीयन्ते खलु हृदयग्रंथिः अपि उद्भिद्यते ये जनिमृतिफलदाः संशयाः ते छिद्यन्ते वै ।

**अर्थः**—**केवल चैतन्यरूप, सत्त्वादि गुणकृत मलानें रहित, तत्त्वमसि इत्यादि महावाक्यांचा लक्ष्यार्थ, निर्विकार, सर्वान्तर्यामी सर्व वैदिकविधि व मन यांना अगोचर, निरतिशय श्रेष्ठ, व ईश अशा त्या परमेश्वराचें दर्शन होतांच साधकाचीं सर्व कर्में नष्ट होतात; हृदयग्रंथि तेव्हांच तुटते; व जन्ममरणरूप फल देणारे जे आत्मविषयक संशय तेही नष्ट होतात.**

**विवरणः**—आतां येथें–ज्ञानी पुरुषाच्या ठिकाणीं ज्ञानानें मिथ्या ठरलेल्या अहंकारादि सृष्टीची प्रतीति येत असून जरि तो तद्द्वारा कर्में करितो तरि त्यांच्यामुळें त्याला बंध उत्पन्न होत नाहीं;–अशाविषयीं 'भिद्यते हृदयग्रंथि०' इत्यादि मुंडकश्रुतीचें प्रमाण देतात. वेदान्तामध्यें सांगितलेल्या सर्व लक्षणांनी ज्ञात होणारें केवल चैतन्यरूप ( म्ह० केवल विषयी अहंकारादिकांप्रमाणें विषय नव्हे ) केवल ज्ञान (ज्ञेय नव्हे) व निर्विकार असें जें ब्रह्म, तद्रूप ज्याची अंतःकरणवृत्ति झाली आहे त्याला परमेश्वराचें दर्शन ( ज्ञान, साक्षात्कार ) झालें असतां तत्क्षणींच त्याचीं सर्व संचित व क्रियमाण कर्में क्षीण होतात. ह्या ब्रह्मसाक्षात्कारवान् पुरुषाची हृदयस्थ-चित् व जड यांचें ऐक्यरूप–अज्ञानग्रंथि ( गांठ ) निःसंशय सुटते. म्ह० अहंकारादि सर्व भाव जड आहेत व आत्माच एक चैतन्ययुक्त आहे असा निश्चय झाल्यानें पुनः पूर्वीप्रमाणें तो भ्रमानें जडचैतन्यांचें तादात्म्य करीत नाहीं. आतां असा ग्रंथिभेद होतोच म्हणून कशावरून असें कोणी विचारतील म्हणून सांगतात–देहाहून आत्मा पृथक् आहे कीं

ते दोघे एकच ? अशातऱ्हेचे त्याचे सर्व संशय नष्ट होतात; कारण हे संशय त्या अज्ञानग्रंथीपासून उद्भवणारे असल्यामुळें अज्ञानग्रंथि नष्ट झाली असतां तिचें कार्य ( संशय ) ही नष्ट होतें. हे आत्म्याविषयींचे संशयच पुनः पुनः जन्ममरणरूप फल देत असतात. म्हणून संशय नष्ट झाले असतां जन्ममरणपरंपराही नाहींशी होते. सारांश ब्रह्मज्ञानानें सर्व अनर्थ टळतात. द्वितीयार्धांत अनेक विशेषणें योजून वेदान्तोक्त सर्व ब्रह्मलक्षणें सुचविलीं आहेत. रज व तम ह्या गुणांपासून उत्पन्न होणारे रागद्वेषादि मल ज्याच्या ठिकाणीं नाहींत; जो 'तत्वमसि' 'अहं ब्रह्मास्मि' 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' 'प्रज्ञानघन एव' 'प्रज्ञानं ब्रह्म' इत्यादि महावाक्यांनीं केवळ जहदजहल्लक्षणेनेंच लक्षित होतो; जो सर्वव्यापी आहे; माया व मायाकार्य अहंकारादि, यांचा त्याच्या वांचून निर्वाहच होत नसल्यामुळें जो ईश (नियन्ता) आहे; जो वेदांतील कोणत्याच विधींनी प्रेरित न होणारा असून मनालाही ज्याच्या विषयीं संकल्प करितां येत नाहीं; जो निर्विकार आहे; अंतःर्मुख शुद्ध वृत्तीनें अज्ञानाचा नाश होतांच स्वतःच जो प्रकाशित होतो; व्यवहारामध्यें ब्रह्मादिकांचें व मायेचें नियमन करणारा असें ज्याला उगीच म्हणत असतात; ह्म० ज्याच्यावांचून त्यांचें किंवा त्यांच्या कार्यांचें अस्तित्वच सिद्ध होत नाहीं; तो परमेश होय. अशा त्या परमेशाचेंच दर्शन झालें असतां परमपुरुषार्थ प्राप्त होतो. ॥ ९९ ॥

आदौ मध्ये तथांते जनिमृतिफलदं कर्ममूलं विशालं ॥
ज्ञात्वा संसारवृक्षं भ्रममदमुदिताशोकतानेकपत्रम् ॥
कामक्रोधादिशाखं सुतपशुवनिताकन्यकापक्षिसंघं ॥
छित्त्वासंगासिनैनं पटुमतिरभिताश्चिंतयेद्वासुदेवं ॥१००॥

टीकाः—इदानीमेतादृशज्ञानिनो ब्रह्मात्मसाक्षात्कारवृत्तेः वासनाजनकपर्यंतं दृढीकरणाय ध्यानं तत्पूर्वावश्यकर्तव्यसहितमाह—आदाविति । आदौ उत्पत्तेः प्राक् तथांते नाशानंतरं मध्ये प्रतीतिकाले असत्यपि जनि मृतिफलदं जनिर्जन्म मृतिर्मरणं ते एव फले प्रसवे तयोर्दातारं । कर्ममूलं कर्म क्रिया तत् मूलं यस्य

विशालं महांतं भ्रमो विपरीतज्ञानं मदः स्वश्रेष्ठत्वज्ञानं मुदिता हर्षवृत्तिः शोकः खेदवृत्तिः इत्यादीनि अनेकानि अनंतानि पत्राणि पर्णानि इव यस्य कामक्रोधादिशाखं कामः प्रियविषयिणीच्छा क्रोधः तत्प्रतिबंधे रोषवृत्तिः आदिपदेन लोभादिवृत्तयस्ता एव शाखा इव यस्य सुतपशुवनिताकन्यकापक्षिसंघं सुताः पुत्राः पशवः गोवृषादयः वनिताः स्त्रियः कन्यकाः दुहितरः ते पक्षिणः पतत्रिणस्तेषां संघो यस्मिन् संसारवृक्षं संसरणस्वभावं वृश्चनीयत्वाद्वृक्षं "ऊर्ध्वमूलोऽवाक्शाख" इत्यादिश्रुतेः । "ऊर्ध्वमूलमधःशाखम्' इत्यादिस्मृतेश्च अश्वत्थापरपर्यायं ज्ञात्वा असत्वेन प्रतीय अनुभूयेत्यर्थः। तत एनं उक्तलक्षणं संसारवृक्षं पटुमतिः कुशला पट्वी मतिः मननवती वृत्तिर्यस्य स पुमान् असंगासिना स्वासंगत्वानुभव एवासिः खड्गः तेन छित्त्वा विनाश्य अभितः सर्वदा वासुदेवं वा विकल्पेन असूनां प्राणेंद्रियादीनां देवः प्रकाशकः आत्मा तं चिंतयेत् अनुभवेत्प्राणादीनां सत्वासत्वेन प्रकाशकेन त्वयि विकल्पइति भावः ॥ १०० ॥

**अन्वयः**—आदौ मध्ये तथा अंते (असन्नपि) जनिमृतिफलदं कर्ममूलं विशालं भ्रममदमुदिताशोकतानेकपत्रं कामक्रोधादिशाखं सुतपशुवनिताकन्यकापक्षिसंघं संसारवृक्षं ज्ञात्वा एनं असंगासिना छित्त्वा पटुमतिः अभितः वासुदेवं चिंतयेत्।

**अर्थः—उत्पत्तीपूर्वी, उत्पत्तीनंतर व तसेंच नाशानंतर (असद्रूप असूनही) जन्ममरणरूप फल देणारा; कर्मापासून उत्पन्न होणारा; महान्; भ्रम, मद, हर्ष, शोक, इत्यादि अनेक पर्णांनीं युक्त असणारा; काम, क्रोध, इत्यादि शाखावान् व पशु, स्त्री, कन्या, इत्यादि पक्षीसमुदाययुक्त असा हा संसार वृक्ष (निस्तत्त्व आहे असें) जाणून शहाण्या पुरुषानें त्याला असंग शस्त्रानें तोडून सतत वासुदेवाचें चिंतन करावें.**

**विवरणः**—आतां अशा ज्ञान्याची 'ब्रह्मच आत्मा आहे' अशी सतत वृत्ति (शेवटची वासना) उत्पन्न होईतों ती दृढ करण्यास्तव त्यानें ध्यान, व ध्यानापूर्वींही अवश्य कर्तव्य कृत्य करावें असें येथें सांगतात. हा संसार वृक्ष तिन्हीं कालीं खोटा असून जन्ममरण फल देणारा आहे. प्राण्यांचें कर्म हेंच त्याचें मूळ आहे. तो फार विस्तीर्ण आहे. विपरीतज्ञान, मी श्रेष्ठ आहें असा गर्व, हर्षवृत्ति, खेदवृत्ति इत्यादि त्या वृक्षाला जणुं काय अनेक पर्णें (पानें) आहेत. काम, (प्रिय विषयांविषयीं इच्छा) क्रोध (इच्छेला प्रतिबंध झाला अ-

सतां उत्पन्न होणारी रोषवृत्ति ) लोभ ( विषयसंरक्षणमति ) इत्यादि जशा कांहीं त्याला शाखा ( खांद्या ) आहेत. पुत्र, गायी, बैल इत्यादि पशु, स्त्रिया, कन्या, हेच कोणी त्यावर रहाणारे पक्षी आहेत. हा संसार ज्ञानानें नष्ट होत असल्यामुळें किंवा व्यवहारांतही तो क्षणिक असल्याचें सर्वांच्या प्रत्ययाला येत असल्यामुळें त्याला वृक्ष असें ह्मटलें आहे. 'ऊर्ध्वमूलोऽवाक्‌शाख०' ही कठश्रुति व 'उर्ध्वमूलमधःशाखं० ह्या संसारवृक्षाचें मूल वर असून शाखा खालीं आहेत' ही स्मृति या रूपकाला प्रमाण आहे. अशा अश्वत्थ( क्षणिक )संज्ञक संसारवृक्षाचें यथार्थ ज्ञान करून घेऊन मननादि अनुष्ठानानें ज्याची बुद्धि सूक्ष्म झाली आहे, अशा मुमुक्षूनें, मी असंग आहें (मी कोठेंच आसक्त होत नाहीं) असा अनुभव हेंच असंगशस्त्र घेऊन त्याच्या योगानें या वृक्षाचा छेद करावा. ( संसाराचा क्षय करावा. ) आणि नंतर सतत वासुदेवाचें चिंतन करावें. वासुदेव ह्मणजे भगवान् गोपालकृष्ण अथवा वा+असु+देवः ह्मणजे **वा**—विकल्पानें, पर्यायानें. **असूनां** प्राण व इंद्रियें यांचा. **देवः** प्रकाशक.–सर्व प्राणेंद्रियांना प्रकाशित करणारा आत्मा असा अर्थ करावा. ॥ १०० ॥

**जातं मय्येव सर्वं पुनरपि मयि तत्संस्थितं चैव विश्वं॥**
**सर्वं मय्येव याति प्रविलयमिति तद्ब्रह्म चैवाहमस्मि॥**
**यस्य स्मृत्या च यज्ञाद्यखिलशुभविधौ सुप्रयातीह कार्यं॥**
**न्यूनं संपूर्णतां वै तमहमतिमुदैवाच्युतं सन्नतोस्मि १०१॥**

टीकाः—इदानीं सर्वोत्पत्तिस्थितिलयाधारत्वेन स्वस्मिन्ब्रह्मत्वानुसंधानपूर्वकं स्वात्मज्ञानस्यैवाखिलकर्मसमाप्तित्वं द्योतयन्नात्मानं नमस्करोति—जातमिति । सर्वं समस्तं द्वैतजातं मय्येव ब्रह्माभिन्नकूटस्थात्मसहितेज्ञाते ब्रह्मात्मनि एवकारेणान्यः कोऽपि आधारोनास्तीति सूचितं जातं आविर्भूतं पुनरपि पश्चादुत्पत्त्यंनतरमपि तत्समस्तं विश्वं जगत् मयि शबले ब्रह्मात्मनि संस्थितं सम्यक् स्थितिं प्राप्तं । किंच तत्सर्वं समस्तं जगत् मय्येव शबले ब्रह्मण्येव प्रविलयं मिथ्याप्रलयसमये सबीजं शुद्धे मयि च

ज्ञानेन अत्यंतनाशं तिरोधानमित्यर्थः याति प्राप्नोति इत्यतोहेतोः तत् "यतोवाइमानिभूतानिजायंत" इत्यादिकया "तद्ब्रह्मेति" इत्यंतया श्रुत्योत्पत्तिस्थितिलयाधारवत्त्वोपलक्षितोपादानत्वेन निर्दिष्टं ब्रह्म देशकालवस्तुकृतपरिच्छेदरहितं वस्तु अहं अहंपदलक्षितः कूटस्थः प्रत्यगात्मा अस्मि भवामि च पुनः यस्य ब्रह्माभिन्नप्रत्यगात्मनः स्मृत्या अनुसंधानेन यज्ञाद्यखिलशुभविधौ यज्ञोश्वमेधादिर्यस्य वाजपेयादेस्तादृशे समस्तशुभंकर्मणि विधाने कार्ये कर्तव्यविधिः न्यूनं मंत्रतंत्रादिभिर्न्यूनमपि वै निश्चयेन संपूर्णतां समाप्तिफलप्रदत्वमित्यर्थः सुप्रयाति प्राप्नोति अहं ब्रह्माभिन्नकूटस्थात्मसाक्षात्कारवान् अतिमुदैव अत्यंतमानंदसाक्षात्कारवृत्त्यैव केवलं तं ब्रह्माभिन्नं प्रत्यगात्मानं अच्युतं अच्युतस्वभावं सन्नतः अष्टांगभूताष्टप्रकृतिसहितस्तत्र लीनः अस्मि भवामि ॥ १०१ ॥ ॥ इतिश्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमच्छंकरभगवत्पूज्यपादकृतशतश्लोकीभाष्यमानंदगिरिकृतंसमाप्तम्॥

**अन्वयः**—सर्वं मयि एव जातं पुनः अपि च तत् विश्वं मयि संस्थितं । तत् सर्वं मयि एव प्रलयं याति । इति च ब्रह्म एव अहं अस्मि च यस्य स्मृत्या यज्ञाद्यखिलशुभविधौ न्यूनं कार्यं वै संपूर्णतां सुप्रयाति तं अच्युतं एव अहं अतिमुदा सन्नतोस्मि ।

**अर्थः—सर्व द्वैतजात माझ्या ठिकाणींच उत्पन्न झालें आहे. आणि पुनः तें विश्व माझ्यामध्येंच स्थित आहे तें सर्व माझ्यामध्येंच लीन होतें; यास्तव तें ब्रह्मच मी आहें. शिवाय ज्याच्या स्मरणानें यज्ञादि सर्व कृत्यांत न्यून कर्मही निश्चयानें संपूर्ण होतें, त्या अच्युताला(स्वात्म्याला)च मोठ्या आनंदानें मी शिरसाष्टांग प्रणाम करितों.**

**विवरणः**—आतां ह्या उपसंहारात्मक शेवटच्या श्लोकांत भगवान् आचार्य 'सर्वांच्या उत्पत्तिस्थितिलयाला ब्रह्म आधार आहे' असें स्वतःच्या आत्म्यामध्यें ब्रह्माचें अनुसंधान करावें ह्म० माझा आत्माच सर्वाधार ब्रह्म आहे अशी सर्वदा चित्ताची भावना ठेवावी, व स्वात्मज्ञान झालें असतांच सर्व कर्में समाप्त होतात, असें येथें स्पष्टपणें दाखवून स्वात्म्याला नमस्कार करितात. हें सर्व द्वैतजात ब्रह्मरूप कूटस्थ जो मी आत्मा त्या माझ्यामध्यें ( माझ्या आधारानें ) उत्पन्न झालें आहे ह्म० ब्रह्म व आत्मा एक आहेत असें मला ज्ञान झालें आहे. एवशब्दानें येथें ब्रह्मीभूत आत्म्याहून सृष्टीला अन्य कोणीही आधार नाहीं, असें सुचविलें आहे. या ठिकाणीं

उत्पन्न होणें ह्म० नामरूपानें व्यक्त होणें असा अर्थ आहे. उत्पत्ती-नंतरही हें सर्व जगत् माझ्या ( शबल-कारण- ब्रह्माच्या ) आधारानें असतें आणि निद्रा व प्रलयकालींही तें माझ्या मध्येंच लीन होतें. प्रलय-कालीं तें पुनरुत्पत्तीला कारण होणाऱ्या संस्कारांसह लीन होत असल्या-मुळें त्याला प्रविलय, व मुक्तिकालीं आत्मज्ञानानें कारणासह द्वैताचा नाश होत असल्यामुळें त्याला मोक्ष असें ह्मणतात. "यतो वा इमा-नि०-तद्ब्रह्मेति" ह्या तित्तिरिश्रुतिप्रतिपादितलक्षणयुक्त ब्रह्म, सृष्टीला तीन्ही कालीं कारण होत असल्यामुळें तें तिचें उपादान कारण होय. तसेंच देश, काल, वस्तु इत्यादिकांच्या योगानें ज्याला किंचित्‌ही गौणत्व येत नाहीं असें तें ब्रह्मच मी ( महावाक्यस्थ अहंपदाचा लक्ष्यार्थ ) आहें. ह्मणून ज्या ब्रह्मरूप प्रत्यगात्म्याचें स्मरण केल्यानें यज्ञादि सर्व शुभविधींत एकादें कर्म ( मंत्रतंत्रादिकांनीं ) न्यून असलें तरि निःसंशय पूर्ण होतें ( इष्टफल देण्यास समर्थ होतें ), त्या स्वप्रभा-वापासून कधींच भ्रष्ट न होणाऱ्या ब्रह्मरूप आत्म्याला मी ( ब्रह्मात्म-ज्ञानी ) मोठ्या आनंदानें शिरसाष्टांग नमस्कार करितों. ( ह्म. आठ अंगांच्या आठ प्रकृतींसह मी त्यांत लीन होतों. ) ॥ १०१ ॥

ह्याप्रमाणें श्रीमच्छंकराचार्यकृत शतश्लोकीचें विष्णुकृत मराठी सान्वयार्थ विवरण संपूर्ण झालें.

श्रीकृष्णार्पणमस्तु.



# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | २७ | गुरूला | गुरूंना |
| ३ | ३ | यद्रुछ्री० | यद्रुच्छ्री० |
| ३ | ८ | ,, | ,, |
| ४ | ५ | आल्हाद | आह्लाद |
| ,, | ८ | तारतम्य भाव | तारतम्यभाव |
| ,, | १८ | ०नात्मप्रतीति | ०नात्मप्रतीतिः |
| ६ | ३ | मीच ब्रह्म आहें | " मीच ब्रह्म आहें " |
| ,, | १८ | देहबाह्य | देहबाह्ये |
| ,, | २३ | अनित्यहेहात्म० | अनित्यदेहात्म० |
| ७ | ५ | येते | येतें |
| , | ९ | घेतो | येतो |
| ७ | १० | प्राण्याला | प्राण्याला त्याचा |
| ७ | ११ | पूरुष | पुरुष |
| ९ | १३ | भुमाव० | भूमावभ्ये० |
| ९ | २३ | असतो-त्याच | असतो; त्याच |
| ,, | २४ | सुद्धां | सुद्धां |
| १० | १ | हाणाऱ्या | होणाऱ्या |
| ,, | १७ | सनरपशुमुखान् | स नरपशुमुखान् |
| ,, | ३१ | ,, | नरपशुमुखान् |
| ११ | २ | आत्माः | आत्मा |
|  |  | साक्षीः | साक्षी |
| ,, | ,, | इत्यादिकांसह० इतर प्राण्यांना | इत्यादि प्राण्यांना |
| ,, | ५ | बाल | बाल- |
| १२ | २३ | उपाय योजिले | उपाय सांगितले |
| १३ | १४ | अपत्य, व | अपत्य, वित्त व |
| १४ | १४ | प्रिय | प्रियः |
| १७ | ३ | जवळें | जेवढें |
| १७ | ५ | ,, | ,, |
| १७ | ७ | त्याच्या | त्यांची |
| १८ | १४ | वल्याम् | वल्लयाम् |
| १९ | ४ | समुद्राच्या | समुद्राच्या, |
| २१ | १४ | आत्मानुसंधान | परात्मानुसंधान |
| २२ | २१ | सुद्धां | सुद्धां |
| २४ | ७ |  |  |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २४ | २१ | सांगून | सांगितलें |
| २७ | २४ | यतें | येतें |
| २८ | ३१ | देहाचा | देहस्थितीचा |
| २९ | १६ | करीतो | करितो |
| ,, | १९ | ,, | ,, |
| ३१ | १३ | दानमिमि | दानमिति |
| ३४ | ७ | शिजवितो, तें | शिजवितो ते मूर्तिमंत असुर व त्याचें तें |
| ३६ | १० | ( 'सख्ये' ) | 'सख्ये' |
| ,, | १८ | स्तो । | स्तो |
| ३९ | १७ | असत् ( कांहीं काल भासणारें ) | असत् ( कधींही नसणारें) |
| ४३ | ३ | आलेल्या, तसेच अना ...... लेल्या, | आलेल्या (ह्म॰ अना...... लेल्या ) |
| ४३ | ७ | जगाची उत्पत्ति | जगाची अज्ञानाच्या आश्रयानेंच उत्पत्ति |
| ४७ | ११ | प्रविष्टो । | प्रविष्टो |
| ५३ | २६ | चक्षु ॅसि | चक्षू ॅषि |
| ५७ | १० | कारण सूर्याच्या प्रकाशा॰ | कारण प्रकाशा॰ |
| ५८ | १ | भूयो । | भूयो |
| ६१ | २१ | स्प्रांत | स्वप्रांत |
| ७७ | ६ | रध्रांत | रंध्रांत |
| ८३ | २० | कांहा | कांहीं |
| ,, | २१ | इत्यादि रूप | इत्यादिरूप |
| ८७ | १८ | अत:करण | अंत:करण |
| ९७ | ६ | य | यं |
| ९९ | २९ | तो उत्पन्न | तो विश्वाबरोबर उत्पन्न |
| ११३ | १७ | आब्रह्मदेवलोक | आदेवब्रह्मलोकं |
| ११५ | ४ | नियम गिर: | निगमगिर: |
| ११७ | २३ | स्थर्य | स्थैर्य |
| १२७ | १७ | नाहा | नाहीं |
| १४० | १४ | वायुचेंही | वायूचेंही |
| १४४ | ७ | कार्यकारणभाव | कार्यकारणभाव– |
| १४४ | २६ | लक्ष्मी निहि॰ | लक्ष्मीर्निहि॰ |
| १४७ | १९ | तद्दश्यं | तद्दृश्यं |
| १४९ | १५ | विदितारज्जुरेका | विदिता रज्जुरेका |
| ,, | १६ | साक्षीभूत: | साक्षिभूत: |
| १५१ | २ | आत्मज्ञोनाप॰ | आत्मज्ञानोपदेशकांच्या |

## ह्या ग्रंथांतील पारिभाषिक शब्दांचें
# स्पष्टीकरण.

**अणिमादि अष्टसिद्धि**--योगाभ्यासानें आकाशादि भूतांना पराभूत केलें असतां प्राप्त होणाऱ्या अणिमा ( परमाणूप्रमाणें सूक्ष्म रूपानें रहाणें. ) महिमा ( सर्व व्यापित्व ) लघिमा ( कापसाप्रमाणें हलकें होणें ) गरिमा ( मेरुपर्वतासारखें जड होणें ) प्राप्ति ( चंद्रालाही अंगुलीस्पर्श करितां येणें ) प्राकाम्यं ( सत्य संकल्पता) वशित्वं ( सर्व प्राण्यांचें नियमन करण्याची शक्ति ) ईशित्वं ( सर्व भूतांना उत्पन्न करण्याची शक्ति ) ह्या आठ सिद्धि.

**अनुषंग**—साहचर्य, संबंध.

**अन्वयव्यतिरेकन्याय**--जें ( कार्य ) असतां जें ( कारण ) असतेच त्याला अन्वय व जें ( कारण ) नसतां जें ( कार्य ) नसतेच त्याला व्यतिरेक ह्मणतात. उदाहरण-धूर असल्यास अग्नि असतोच हा धूमाग्नीचा अन्वय व अग्नि नसल्यास धूरही नसतोच हा त्यांचा व्यतिरेक होय. यावरून धूम व अग्नि यांचे साहचर्य नित्य आहे असें ठरतें. तसेंच जों पर्यंत दुःख होत असतें तों विषय असतात; व विषय नष्ट झाले की तत्कार्य दुःखही नष्ट होतें. तात्पर्य विषय व दुःख यांचें साहचर्य सिद्ध झालें.

**उपलक्षण**--ज्या शब्दाच्या निमित्तानें लक्षणा करावयाची असेल त्याचा अर्थ न सोडतां तज्जातीय अन्य शब्दांचेही तेथें ग्रहण करणें. उदाहरणार्थ-१०२ पृष्ठांत अघात शब्दाचा प्रहार असाच वाच्य अर्थ न घेतां त्या ठिकाणीं वाऱ्यांची सर्व साधनें घ्यावीं असें सुचविलें आहे. ही आघातशब्दाची उपलक्षणा होय.

**उपादान कारण**—उत्पत्तीपूर्वी, उत्पत्तीनंतर व क्षय झाला असतां कार्य ज्या द्रव्याच्या आश्रयानें रहातें तें द्रव्य त्या कार्याचें उपादान कारण होय. उदा० मृत्तिकेचा घट तिन्ही कालीं मृण्मय असतो ह्मणून मृत्तिका हें त्याचे उपादान कारण होय.

**कार्यकरणसंघात**—देह ( कार्य ) व इंद्रियें ( करणें, साधनें ) यांचा समुदाय ह्मणजे स्थूल व सूक्ष्म शरीर.

**कार्यकारणभाव**—निमित्तनैमित्तिकपणा. दोन पदार्थांतून जो एक दुसऱ्याला निमित्त होतो तो पदार्थ कारण व त्यामुळें ज्या दुसऱ्याची उत्पत्ति होते तो पदार्थ कार्य होय. व यांच्या ह्या स्वभावाला कार्यकारणभाव ह्मणतात. **उदाहरणः**-वासना हें निमित्त व त्यामुळे प्राप्त होणारा पुनर्जन्म

हें कार्य. अग्निस्पर्श हें कारण व शरीरदाह हें कार्य होय. कारणें तीन प्रकारचीं आहेत. पण येथें त्यांचा विस्तार करणें अप्रस्तुत आहे.

**क्रियाशक्ति**—प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पांच प्राण व वाक्, हस्त, पाद, पायु, उपस्थ हीं पांच कर्मेंद्रियें यांना क्रियाशक्ति असें ह्मणतात. आत्म्याच्या एकंदर ज्ञानशक्ति, इच्छाशक्ति व क्रियाशक्ति अशा तीन शक्ति आहेत. त्यांचे विस्तृत वर्णन ' वेदान्तसार ' ग्रंथांत पहावें.

**चर्वितचर्वण**—पुनः पुनः तेंच तें सांगत बसणें. यालाच पिष्टपेषणही ह्मणतात.

**जहदजहल्लक्षणा**—लक्षणेंत शब्दाच्या वाच्य ( प्रसिद्ध, रूढ ) अर्थांतील कांहीं भाग टाकून कांहीं घेणें याला जहदजहल्लक्षणा ह्मणतात. **उदाहरणः**- ' तो हा देवदत्त ' ह्या वाक्यांतील ' तो ' यांतील परोक्षत्व व ' हा ' यांतील अपरोक्षत्व टाकलें ह्मणजे देवदत्तच रहातो. तसेंच 'तत्त्वमसि' या वाक्यांतील तत्पदांतील सर्वज्ञत्वादि व त्वंपदांतील किंचिज्ज्ञत्वादि हा वाच्य अर्थाचा भाग टाकिला असतां चैतन्य हा उभयतांतील अविरुद्ध अर्थ राहतो.

**तदितर**—त्याहून निराळा, पृथक्

**तारतम्यभाव**--न्यूनाधिकता, कमजास्तपणा, सरसकटपणा

**त्रिविधताप**--तीन प्रकारचे ताप. आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हे ते तीन प्रकार होत. मस्तक दुखणें, ज्वर येणें इत्यादि दैहिक तापांना आध्यात्मिक; अनावृष्टि, वावटळ, वीज अतिवृष्टि इत्यादि देवताप्रयुक्त आधिदैविक; व कांटा लागणें, तरवारीनें हात कापणें इत्यादि भूत( सृष्टपदार्थ ). प्रयुक्त आधिभौतिक ताप होत.

**धारातीर्थ**—रणांगण, युद्ध, तरवारीची धारा हेंच तीर्थ.

**नामरूपात्मक**--राम, गोविंद, गाय, व्याघ्र, हंस, काक, मत्स्य, कच्छ, वृक्ष, पाषाण इत्यादि नांवें व काळें, तांबडें, पांढरे, पिंवळें, हिरवें पिंगट, चित्रविचित्र हीं रूपें हेंच स्वरूप आहे ज्याचें असें [ जग. ]

**नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव**--सर्वदां शुद्ध स्वभावाचा, सर्वदां ज्ञानस्वभावाचा व सर्वदां मुक्तस्वभावाचा परमात्मा. येथें स्वभाव ह्म० रूप किंवा प्रकृति असा अर्थ करावा.

**निरतिशय**—अतिशयरहित. ज्याच्यापेक्षां अधिक असें कांहीं नाहीं. जगांतील सर्व पदार्थ कमिअधिक योग्यतेचे आहेत. पण निरतिशय पदार्थ सर्वांत अधिक असतो

**निरुपाधिक**—उपाधिरहित. [ उपाधि ह्म० मूळरूपांत कमीपणा आणणारी एक शक्ति ] शुद्ध, केवल

**तुस्तस्वरूप**—असार, निःसार, तुच्छ, तत्त्वशून्य

**पंचीकृत पंचमहाभूतें**--पंचीकरणनियमानें एकमेकांत मिश्र झालेलीं आकाशादि पांच भूतें. पंचीकरण नियमवेदान्तसारांत पाहावा.

**परिच्छेद**--परिमाण

**पाक**--परिणाम, पक्कावस्था.

**प्रातिभासिक**--केवल कांहींकाल भासणारें.

**बाधहोणें**--यथार्थ ज्ञानानें मिथ्या ठरणें.

**विषयजात**—यच्चयावत् सर्व विषय. जात हा प्रत्यय ज्या शब्दापुढें लागतो त्याची तो सर्व जाति दाखवितो व तो शब्द नपुंसकलिंगी होतो. उदाहरण–मनुष्यजात. ह्म० यच्चयावत् सर्व मनुष्यें.

**शरीरोपाधिक आत्मा**--शरीर ही उपाधि आहे ज्याला असा आत्मा, शरीरावच्छिन्न आत्मा, देही.

**शुक्तिकारजत**--शींपेवर भ्रमानें भासणारें रुपें.

**सजातीयादि भेद**--सजातीय, विजातीय, स्वगत असे तीन भेद. वृक्षाचे-आम्रवृक्ष, बकुलवृक्ष, पनसवृक्ष हे सजातीय भेद; पाषाण, माती, उदक इत्यादि हे विजातीय भेद व पानें, फांद्या, खोड हे स्वगत भेद होत.

**समष्टि**--एकरूप झालेले सर्व पदार्थ ( हिरण्यगर्भ ).

**संस्कार**—कोणत्याही पदार्थाचा अनुभव आल्यानंतर त्याच्या स्मृतीला कारण होणारा भावनानांवाचा गुण.

**सुषुप्ति**—जेथें कोणत्याही प्रकारचें स्थूल किंवा सूक्ष्म ज्ञान होत नाहीं अशी जीवाची अज्ञानावस्था.

## श्लोकसूची।